॥ श्रीगुरुगणेश ॥

# प्रस्तुत पुस्तकासंबंधानें चार शब्द

महाराष्ट्रामध्यें सायनगणनेप्रमाणें अर्थात् ग्रहाचे भोग वसंतसंपातापासून कुंडल्यामध्यें घेऊन त्यावरून फलज्योतिषशास्त्रामध्यें कसा काय अनुभव मिळतो हें पाहण्याचें प्रयत्नचें कार्य गुरुवर्य कै. जीवन त्र्यंबक चिटणीस ह्यानीं केलें. त्यानीं सन १८८० ते १८९० ह्या सुमारास म्हणजे ज्या काळीं महाराष्ट्रामध्यें सायन निरयन गणनेसंबंधानें जोरानें वादविवाद सुरू होता, त्या काळीं फलज्योतिषशास्त्रावरील जुन्या ग्रंथामध्ये दिलेलीं फलें सायन पद्धतीप्रमाणें भाव व ग्रहस्थिति, वगैरे घेतलेल्या कुंडल्यामध्ये फारच उत्तम तऱ्हेनें अनुभवास येतात, अशी त्याची पूर्ण खात्री झाली, तेव्हा हें मत महाराष्ट्रमध्यें प्रसृत करण्याकरिता त्यानीं १८ डिसेंबर, १८९२ सालीं **मुंबई ज्योतिर्विद् मंडळ** ह्या नावाची संस्था स्थापन करून त्याप्रमाणें शिक्षण देण्याच्या कार्याचा आरंभ मुंबई येथें सुरू केला व पुढें हेंच मत प्रतिपादन करण्याकरिता १८९६ सालामध्यें **ज्योतिर्माला** नावाचें मासिक सुरू केलें व त्या कार्याकरिता लागणारी ग्रंथसंपत्ति पण निर्माण करण्यास सुरुवात केली. परंतु त्या काळीं झालेल्या प्लेगच्या उपद्रवानें व आश्रयाभावामुळें पुढें कार्य करण्यात अडचणी येऊन तें कार्य तेथेंच थांबलें.

गुरुवर्य चिटणीस ह्यानीं 'मेदिनीय ज्योतिष' ह्या नावाचें पुस्तक तारीख ९ नोव्हेंबर, १९०० ह्या दिवशीं सकाळीं ११ वाजून ५ मिनिटानीं लिहिण्यास सुरुवात केली व त्याप्रमाणें त्यानीं कांहीं प्रकरणें लिहून पण काढिलीं, परंतु संपूर्ण पुस्तक त्याच्या हातून लिहिलें गेलें नाहीं. पुढें त्याच्या

मृत्यूनंतर त्यांची ग्रथसंपत्ति, कागदपत्रें वगैरे जीं आमच्या ताब्यात आलीं त्यात ह्याही लिखाणाची चोपडी आम्हास प्राप्त झाली ह्या विषयासंबधानें आम्हास त्यांनीं माहिती देऊन कोण कोणत्या आंग्ल भाषेमधील ग्रथाचें ह्या विषयाकरिता अध्ययन करावें, ह्याच्या सूचना, वगैरे दिलेल्या असल्याकारणानें आम्हीं जेव्हा त्यांच्या 'ज्योतिर्माला' मासिकाची अभिनवावृत्ति सुरू करण्याचें ठरविलें, त्याच सुमारास आम्हास आंग्ल व आर्य ग्रथामधून प्राप्त झालेल्या ज्ञानाप्रमाणें मराठीमध्यें आमचे सहाध्यायी कै. शालाराम नारायण शृगारपुरे (जे ज्योतिर्माला मासिकामध्यें **रामनारायण** ह्या टोपण नावानें लिहीत असत) ह्यांच्याबरोबर विचारविनिमय करून मराठीमध्यें **मेदिनीय** ज्योतिष किंवा **राष्ट्रीय** ज्योतिष नावाचें लहानसे पुस्तक तयार करून तें सन १९१६ मध्यें त्याच्या नावावर प्रसिद्ध केलें.

ह्या पुस्तकाची प्रथम आवृत्ति केव्हाच संपून गेली असून आता तें पुस्तक जवळ-जवळ दुर्मिळ झालेलें आहे प्रस्तुतचें पुस्तक फक्त पहिल्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति नसून, आजच्या पुस्तकामध्यें गेल्या पन्नास वर्षांच्या काळामध्यें आम्हास व इतर आंग्ल ग्रथकाराना नवीन संशोधनानें व अनुभवानें ह्या विषयासंबधानें प्राप्त झालेली माहिती थोडक्यात व सहज समजेल अशा रीतीनें ज्योतिर्विद्यार्थ्यांपुढें मांडण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे

आज प्रसिद्ध होत असलेल्या पुस्तकानें ज्या ज्योतिर्विद्यार्थ्यांनीं फल ज्योतिषशास्त्राचें अध्ययन व्यवस्थित केलेलें असेल किंवा ज्यानीं आमचीं बालबोध ज्योतिष, भाग १ ला व २ रा व जातकमार्गोपदेशिका, खड १ ला हीं पुस्तकें अभ्यासिलीं असतील त्याना ह्या पुस्तकामधील विषय सहज

आक्रमन करिता येऊन त्यांना राष्ट्रीय भविष्यें सशास्त्र पद्धतीनें करण्याचें ज्ञान सहज प्राप्त होईल व त्यांना ह्यापुढील विषयाचें अध्ययन करण्यास हें पुस्तक खात्रीनें पुष्कळच मार्गदर्शन करील.

मेदिनीय ज्योतिषशास्त्राचें पूर्वभूमिकेचें अवश्य असणारें ज्ञान ह्या प्रस्तुतच्या पुस्तकामध्यें देण्यात आलेलें आहे ह्यापुढें ज्योतिषशास्त्रदृष्ट्या वातावरणामध्ये होणारे फेरफार, वादळें, हिमवृष्टि, पर्जन्य, अतिवृष्टि, अवर्षणें, रोगराई, पिकाची हानि, त्यावर पडणारे रोग, पूर, देशामध्ये होणारे प्रलय, भूकंपादि उत्पात, इत्यादिकांचा तसेंच देशांतर्गत व्यापाररूपी समुद्रामध्यें कश्या तऱ्हेची खळबळ उडेल, देशातील उद्योग-धंदे सांपत्तिक दृष्टीनें कमें राहतील, आपल्याजवळील भांडवल कोणत्या धंद्यामध्यें केव्हा गुंतवावें किंवा कोणत्या उद्योग-धंद्याचे भाग विकत घ्यावे किंवा विकावे, कोणत्या पदार्थाचा संग्रह केव्हा करावा किंवा तो संग्रह केव्हा विकावा, इत्यादि व्यापारविषयक ज्योतिषशास्त्र, ज्यांत वस्तूंच्या किंमतीचा चढ-उतार केव्हा व कश्या रीतीनें होईल, इत्यादि विषयांचा सांग विचार ह्यापुढील दोन खंडामध्ये केला असता मेदिनीय ज्योतिषविषयाचे संपूर्ण विवेचन ज्योतिर्विद्यार्थ्यांपुढें मांडिल्यासारखें होईल. परंतु हें कार्य सांप्रतची परिस्थिति, मनःस्थिति व प्रकृति ह्यामुळें आमच्या हातून होईलच असें आम्हांस वाटत नाहीं. परंतु शास्त्राच्या प्रगतीकरिता व स्वतःची मनीषा म्हणून पुढें येणाऱ्या ग्रंथामध्यें काय काय असावें व त्यांत कोणते विषय चर्चिले जावेत, ह्याची रूपरेखा येथें आमच्या अल्प समजुतीप्रमाणें मांडिली आहे. हे दोन ग्रंथ आमच्या हातून लिहून झाले तर ती परमेश्वराची कृपा, परंतु न झाले तर ते दुसऱ्या कोण्या ज्योतिर्विद्यार्थ्यांच्या हातून व्हावेत, म्हणून आमच्या मनांत घोळत असलेले

# अनुक्रमणिका

॥ श्रीगुरुगणेश ॥

# मेदिनीय ज्योतिष मार्गोपदेशिका

## भाग पहिला

## राष्ट्रीय ज्योतिष



प्रकरण पहिलें

## विषयप्रवेश

"A most unfailing experience of the course of human events in harmony with the changes occurring in the heavens *has instructed and compelled my unwilling belief*

—केप्लर

"आकाशस्थ ज्योतींच्या किंवा ग्रहांच्या दैनंदिन भ्रमणानें त्यांचेमध्यें जे फरक होतात त्यांचा मानवी जीवनामध्यें किंवा सृष्टीमध्यें होणाऱ्या घटनांचा पुष्कळच निकटचा संबंध आहे, असें जेव्हां माझ्या अनुभवास आलें, तेव्हां ज्या गोष्टींवर माझा मुळींच विश्वास नव्हता, त्या गोष्टींमध्यें सत्यता आहे व आकाशस्थ ग्रह मानवी जीवनावर व सृष्टीमध्यें होणाऱ्या घटनांवर परिणाम करितात ह्या नग्न सत्याचा मला साक्षात्कार झाला"

—केप्लर

आकाशस्थ ग्रहादिकांचा जो परिणाम प्राणिमात्रावर घडतो त्या संबधानें जें शास्त्र सोपपत्तिक विचार करतें त्या शास्त्रास **'फलज्योतिष'** असें म्हणतात. अध्ययनाचे सोयीसाठीं या फलज्योतिषशास्त्राचे खालील प्रमाणें विभाग केले आहेत.

**(१) होरा** किंवा **जातक स्कंध, (२) मुहूर्त स्कंध, (३) प्रश्नज्योतिष, (४) वैद्यकीय ज्योतिष, मेदिनीय ज्योतिष, (५) वर्षाज्योतिष** किंवा **वादळें हवामान इत्यादींचा विचार करणारें ज्योतिष** आणि **(६) व्यापार ज्योतिष.** व्यक्तीच्या जन्मकालीन किंवा आधानकालीन ग्रहस्थितीवरून सुखदुःखादिकांचा किंवा लाभहानी इत्यादिकांचा विचार कसा करावा याचें विवेचन **जातक स्कंधामध्यें** केलेलें आहे विवक्षित वेळीं विचारलेल्या प्रश्नावरून व्यक्तिविषयक सुखदुःखादिकांचा किंवा मनामध्ये उद्भवलेल्या प्रश्नाचा विचार कसा करावा याचें विवेचन **प्रश्नज्योतिषामध्यें** केलेलें असतें कार्याच्या आरंभकाळाच्या ग्रहस्थितीप्रमाणें कार्याचा शेवट, शुभ किंवा अशुभ होतो असें ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनानें समजून आल्यामुळें विवक्षित कार्ये कोणत्या योगावर करावीं याचा विचार **मुहूर्त स्कंधामध्यें** केलेला असतो. मानवी प्राण्याच्या शरीरामध्यें जे रोगोद्भव होतात त्याचें योग्य निदान जन्मकालीन किंवा प्रश्नकालीन कुंडलीवरून कसें करावें व निरनिराळ्या रोगावर ज्योतिषशास्त्राचें सहाय्य घेऊन उपचार कोणत्या प्रकारचे करावे याचा विचार **वैद्यकीय ज्योतिषामध्यें** केला जातो. याच वैद्यक ज्योतिषशास्त्राचा दुसरा एक विभाग आहे त्यांत ग्रह अनिष्ट आले असता कोणत्या प्रकारची उपासना करावी, कोणतीं रत्नें धारण करावीं, कोणत्या प्रकारचीं दानें द्यावीत किंवा कोणत्या प्रकारची औषधीयोजना करावी,

आहारामध्यें कोणते पदार्थ घ्यावेत किंवा वर्ज करावेत इत्यादिसंबंधानें ज्ञान देणारा दुसरा एक महत्त्वाचा विभाग आहे. ज्याप्रमाणें व्यक्तींच्या उन्नति-अवनति व सुखदुःख ह्यांचें विज्ञानजातकावरून होतें त्याचप्रमाणें व्यक्तिसमूह, देश किंवा राष्ट्र ह्यांच्या उन्नति–अवनति व सुखदुःख ह्यांचा विचार **मेदिनीय ज्योतिषांत** केला जातो. राष्ट्रामध्यें किंवा देशामध्यें वर्षा कसा होईल, हवेमध्यें वादळें, तुफानें, भयंकर उष्णता किंवा भयंकर थंडी केव्हां होईल इत्यादिसंबंधानें ग्रहांचे योगानें जे हवामानासंबंधीं अंदाज बांधितां येतात त्या सर्व गोष्टींचा विचार **हवामान विवेचन ज्योतिष-शास्त्राधारें** करण्याची प्रथा आहे (Meteorological Astrology किंवा Weather Predicting Astrology ). देशामध्यें उत्पन्न होणारीं धान्यें, खनिज पदार्थ किंवा ते ते पदार्थ पैदा करणाऱ्या कंपन्यांचे शेअरचें मूल्य किंवा देशामधील आर्थिक परिस्थिति कशी राहील व त्याचा व्यापारी जगामध्यें काय परिणाम होईल, सांपत्तिक स्थिरता किंवा व्यवहार कसे काय राहातील, वस्तूंची पैदास कमी होईल किंवा जास्त होईल, त्यांच्या किंमती बाजारामध्यें वाढतील किंवा घटतील इत्यादि गोष्टींचा विचार **व्यापार ज्योतिष** ह्या विभागांत केला जातो. **वैद्यक ज्योतिष** ह्या विभागामधील अरिष्ट-निवारण होण्याकरितां कोणत्या प्रकारची उपाययोजना करावी ह्या विभाग आमचे मतें स्वतंत्र **फलज्योतिषशास्त्रदृष्ट्या अरिष्टनिवारण उपाययोजना खंड** *असा ह्या शास्त्राचा सातवा निराळा विभाग घेणें.* ह्याप्रमाणें फलज्योतिषशास्त्राचा पूर्ण अभ्यास करून त्यांत प्राविण्य मिळवि-ण्याकरितां ज्योतिषशास्त्राच्या विद्यार्थ्याला ह्या सातही अंगांचें ज्ञान असण्याची अत्यंत जरूरी आहे. ह्यावरूनच ज्योतिषशास्त्राचें अध्ययन दोनचार वर्षांमध्यें पूर्णपणें करतां येईल असें आम्हांस तरी वाटत नाहीं. फलज्योतिष-

शास्त्राची प्रत्येक शाखा महत्त्वाची आहे. त्या प्रत्येक शाखेचे अध्ययन करून नंतर त्यातील तत्त्वाचा साक्षात्कार करून घेणें आहे व हें काम सहज चुटकीसारखें होणारें नाहीं, ह्याची खात्री प्रत्येक विद्यार्थ्याला सहज पटण्यासारखी आहे. ह्या शास्त्रामधील **मेदिनीय ज्योतिष विभाग** हा सर्वापेक्षा अधिक महत्त्वाचा आहे. कारण उघडच आहे कीं इतर शाखांचा संबंध विवक्षित व्यक्तीशीं असतो तसे मेदिनीय ज्योतिषशाखेचे नाहीं. व्यक्तिसमूह, देश किंवा राष्ट्र ह्यांचा विचार येथे करावयाचा असतो. इतक्या महत्त्वाच्या शाखेचा योग्य विचार आजपर्यंत मराठी भाषेत केल्हाच झालेला दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर हिंदी, गुजराती वगैरे भाषामध्ये पण ह्या विषयासंबधात शास्त्रीय रीतीने उहापोह करणारी ग्रंथरचना अद्याप आमचे आढळण्यात आली नाहीं; म्हणून आम्ही ह्या पुस्तकामध्ये जिज्ञासु व आर्त विद्यार्थ्यांकरिता **मेदिनीय ज्योतिष**संबधानें पद्धतशीर माहिती संकलित करण्याचें योजिलें आहे. फलज्योतिषशास्त्राचें अध्ययन करण्याकरिता क्रमिक पाठ्य पुस्तकाची जी उणीव आहे ती दूर करण्याचे धोरणानें जी आमचीं इतर पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत, त्याच धोरणानें हें लहानसें पुस्तक प्रसिद्ध करून आम्हीं ह्या शाखेचें अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्याचं काम करणार आहोत

**मेदिनीय ज्योतिष** शिकण्यास आरंभ करण्यापूर्वी विद्यार्थ्याने जातकाचा अभ्यास चांगलाच केलेला असला पाहिजे व त्याकरिता त्यानें आमचें **बालबोध ज्योतिष भाग पहिला, भाग दुसरा व जातक मार्गोपदेशिका खंड पहिला,** ह्याचें चांगलें अध्ययन करावें व नंतर ह्या शाखेच्या अध्ययनाकडे वळावें फलज्योतिषशास्त्राच्या मूल तत्त्वाचा उत्तम अभ्यास झाल्याखेरीज ह्या शाखेंत प्रवेश होण्याचा

यत्किंचित् सुद्धा समज नाहीं मेदिनीय ज्योतिष शिकणाऱ्या विद्यार्थ्यानें फलज्योतिषशास्त्राचें प्राथमिक शिक्षण घेतलें आहे असें गृहीत धरूनच पुढील प्रकरणें लिहिलीं आहेत परंतु हीं प्रकरणें सौकर्यानें लक्षात यावीं म्हणून प्रस्तुत प्रकरणामध्यें फक्त विहंगमदृष्टीनें फलज्योतिषाच्या परिभाषेचें व सामान्य तत्त्वाचें अवलोकन करणें अवश्य आहे

## ज्योतिषशास्त्राची परिभाषा

### (१) ग्रह

**१ रवि, २ चंद्र, ३ बुध, ४ शुक्र, ५ मंगळ, ६ गुरु, ७ शनि, ८ हर्शल-प्रजापति, ९ नेपच्यून-वरुण, १० प्लूटो-इन्द्र.** हें नाव आम्हीं आमचे जातकमार्गोपदेशिका पुस्तकामध्यें सुचविलें आहे मद्रासकडील एका ज्योतिर्विदानें रुद्र हें नाव सुचविलेलें आहे

**गुरु, शुक्र** व **रवि**–शुभग्रह

**चंद्र** व **बुध**–शुभसंबंधित असल्यास शुभ व अशुभसंबंधित असल्यास अशुभ

**मंगळ, शनि, हर्शल, नेपच्यून** व **प्लूटो**–अशुभग्रह

**राहु** व **केतु** हे वास्तविक ग्रह नसून त्यांचा ग्रहांमध्यें समावेश झाला आहे. हे पातबिंदु आहेत व जेव्हा अमा किंवा पौर्णिमा अंत ह्या पात बिंदूजवळ होतात तेव्हाच आपल्या पृथ्वीवर ग्रहणें होतात

## (२) राशि

१ मेष
२ वृषभ
३ मिथुन
४ कर्क
५ सिंह
६ कन्या
७ तूळ
८ वृश्चिक
९ धनु
१० मकर
११ कुंभ
१२ मीन

## (३) राशींचे गुणधर्मानुरूप वर्गीकरण

| राशीचें नाव | तत्त्व | स्वभाव | पुरुष अगर स्त्री |
|---|---|---|---|
| मेष | अग्नि | चर | पुरुष |
| वृषभ | पृथ्वी | स्थिर | स्त्री |
| मिथुन | वायु | द्विस्वभाव | पुरुष |
| कर्क | जळ | चर | स्त्री |
| सिंह | अग्नि | स्थिर | पुरुष |
| कन्या | पृथ्वी | द्विस्वभाव | स्त्री |
| तूळ | वायु | चर | पुरुष |
| वृश्चिक | जल | स्थिर | स्त्री |
| धनु | अग्नि | द्विस्वभाव | पुरुष |
| मकर | पृथ्वी | चर | स्त्री |
| कुंभ | वायु | स्थिर | पुरुष |
| मीन | जल | द्विस्वभाव | स्त्री |

## (४) ग्रहांच्या स्वगृहादि राशि

| ग्रह | स्वगृह | उच्चराशि | नीचराशि | दुर्बलराशि |
|---|---|---|---|---|
| रवि | सिंह | मेष | तूळ | कुंभ |
| चंद्र | कर्क | वृषभ | वृश्चिक | मकर |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| बुध | मिथुन-कन्या | कन्या | मीन | धनु |
| शुक्र | वृषभ-तूळ | मीन | कन्या | वृश्चिक-मेष |
| मंगळ | मेष वृश्चिक | मकर | कर्क | तूळ-वृषभ |
| गुरु | धनु-मीन | कर्क | मकर | मिथुन-कन्या |
| शनि | मकर-कुंभ | तूळ | मेष | कर्क-सिंह |

**हर्शल**–प्रजापति वायुराशीमध्ये बलवान् असतो व कुंभ त्याची स्वगृहराशि मानतात; **नेपच्यून** जलराशिमध्यें बलवान् असतो व मीन ही राशि त्याची स्वगृहराशि मानतात आणि **प्लूटो-इन्द्र** हा मेष व वृश्चिकेमध्यें बलवान असतो

## (५) ग्रहांच्या दृष्टि

प्राचीन आर्य ग्रंथकाराच्या मतें प्रत्येक ग्रह आपल्या सप्तमस्थानीं पूर्ण दृष्टीनें पाहातो, **मंगळ** चार, सात व आठ ह्या स्थानीं पूर्ण दृष्टीनें पाहातो. **शनि** तीन, सात व दहा या स्थानीं पूर्ण दृष्टीनें पाहातो आणि **गुरु** पाच, सात व नऊ ह्या स्थानीं पूर्ण दृष्टीनें पाहातो ह्याखेरीज पाव, अर्धा व पाऊण इतक्या दृष्टीनें सुद्धा ग्रह पाहातात असें आर्य ज्योतिष ग्रंथकाराचें मत आहे व पाहाणाऱ्या ग्रहाच्या शुभाशुभत्वावर दृष्टिफल अवलंबून असतें. हा दृष्टिसंबंधींचा विचार निखाल्स चुकीचा अगर टाकाऊ आहे असें जरी नाहीं तरी त्यामध्ये पुष्कळच अनुभवानुरोधानें सुधारणा केली पाहिजे कारण तो अत्यंत स्थूल आहे. कोणत्या तत्वावर दृष्टियोगाची उभारणी झालेली आहे हें जाणून आपण सूक्ष्म म्हणजे अंशात्मक दृष्टिसंबधानें विचार केला पाहिजे. जेव्हा दोन ग्रहामध्ये विशिष्ट कोणात्मक अंतर असतें तेव्हाच विशिष्ट प्रकारचीं फळें उत्पन्न झालेलीं

पाहावयास मिळतात असें आपल्या अनुभवास येतें आणि ह्याच तत्त्वानर दृष्टियोग पाहाणें शास्त्रशुद्ध आहे. दृष्टियोगाचा संपूर्ण खुलासा आमच्या बालबोध ज्योतिष, भाग पहिला व दुसरा व जातकमार्गोपदेशिका खंड पहिला ह्यामध्यें आम्हीं केलेला आहे, तो वाचकानीं पाहावा. येथे आम्हीं थोडक्यात मेदिनीय ज्योतिषशास्त्रामध्यें कोणकोणत्या दृष्टियोगाचीं फळें स्पष्टपणानें अनुभवास येतात त्याचाच विचार करणें आहे.

(१) दोन ग्रहामध्यें ४५ अशाचें अतर असता **अर्धकेन्द्रयोग** नावाचा दृष्टियोग होतो व त्याचा अशुभ परिणाम स्पष्ट पाहावयास मिळतो.

(२) दोन ग्रहामध्यें ६० अशाचें अतर असता **द्विराश्यंतर** नावाचा दृष्टियोग घडतो व ह्याचीं शुभ फळें अनुभवास येतात.

(३) दोन ग्रहामध्यें ९० अशाचें अंतर असता **'केन्द्र'** दृष्टियोग – चतुर्थ – दशम – दृष्टियोग होतो. हा दृष्टियोग अत्यंत तीव्रतेनें अशुभ फळ दर्शवितो.

(४) दोन ग्रहामध्यें १२० अशाचें अतर असता **'त्रिकोण'** दृष्टियोग किंवा **नवपंचम** नावाचा दृष्टियोग घडतो; हा दृष्टियोग अत्यंत शुभ फळदायी आहे.

(५) दोन ग्रहामध्यें १३५ अशाचें अतर असता **'सार्धचतुष्टय राश्यंतर'** किंवा **'सार्धकेन्द्रयोग'** होतो. हा अशुभ आहे. व ह्या दृष्टियोगाचीं फळें अर्धकेन्द्र किंवा केन्द्रयोगाप्रमाणेंच अशुभ अशींच अनुभवास येतात.

( ६ ) दोन ग्रहामध्यें १५० अंशाचें अंतर असतां **'षडष्टक'** योग होतो. हा साधारण अशुभ आहे. दोन शुभ ग्रहामध्यें हा योग होत असतां शुभ फळें मिळतात हा योग अर्धवट शुभ आहे.

( ७ ) दोन ग्रहामध्यें १८० अंशाचें अंतर असतां **'प्रतियोग'** होतो. हा अशुभ आहे दोन अशुभ ग्रहामध्यें हा दृष्टियोग होत असतां ह्याचीं फळें फार तीव्रतेनें अशुभ व अनिष्ट अशीं पाहाण्यास मिळतात.

( ८ ) ज्यावेळीं दोन अथवा अधिक ग्रह एकाच राशींत, एकाच अंशात असतात तेव्हा **'युतियोग'** नावाचा दृष्टियोग होतो हा योग शुभ ग्रहामध्यें होत असल्यास शुभफलदायक असतो व अशुभ ग्रहामध्यें होत असल्यास अशुभफलदायक असतो ह्यावेळीं दोन ग्रहामधील पूर्वपश्चिम अंतर शून्य असतें. परंतु उत्तरदक्षिण अंतर शून्य असावें लागत नाहीं

( ९ ) दोन ग्रहाच्या जेव्हा क्रांति दक्षिण अगर उत्तर सारख्या असतात तेव्हा **समक्रांति दृष्टियोग** होतो व ह्याचें शुभाशुभत्व युतियोगाप्रमाणें आहे. शुभग्रहाच्या क्रांति सारख्या असतां होणारा सम क्रांति दृष्टियोग शुभफलदायी घेणें, परंतु दो ही ग्रह अशुभ असून त्याच्या-मध्यें समक्रांति दृष्टियोग घडत असतां तो अशुभ फळ देणारा असतो एक शुभ व एक पापग्रह असे समक्रांति दृष्टियोगामध्यें असतां शुभ ग्रहाचें फळ मिळत नाहीं पापग्रहानें शुभग्रह युतियोगाप्रमाणेंच बिघडला जातो.

( १० ) ह्याखेरीज ३० अंश, ३६ अंश, ७२ अंश व १४४ अंश अंतराचे दुसरे साधारण कमी महत्त्वाचे दृष्टियोग आहेत व हे सर्व शुभ-फलदायी आहेत.

हे वर दर्शविलेले ग्रहांचे दृष्टियोग अंशात्मक असावे लागतात. **पूर्ण दृष्टियोग ( प्रतियोग )** किंवा **युति दृष्टियोग** त्यांस ८ ते १० अंशांपर्यंत दीप्तांश देण्यास हरकत नाहीं व बाकीच्या दृष्टियोगांना ४।५ अंश दीप्तांश द्यावेत व १० वा जे कमी महत्त्वाचे दृष्टियोग सांगितले आहेत त्यांस २।३ अंश दीप्तांश देणें. परंतु समक्रांतियोगाला एकच अंश दीप्तांश देणें.

ग्रहदृष्टियोग करण्यास येण्यापूर्वी व दृष्टियोग पूर्ण करून सुटून जाण्यास जें अंतर लागतें त्यास **दीप्तांश** असें नांव आहे. दीप्तांशामध्यें जेव्हां दोन ग्रह असतात, तेव्हांच दृष्टियोगांचीं फळें अनुभवास येतात. हें तत्त्व केव्हांही विद्यार्थ्यानें ध्यानाबाहेर जाऊं देऊं नये. स्थिर ग्रह, प्लुटो, नेपच्यून, हर्शल व शनि हे स्थिर ग्रह जेव्हां कोणताही दृष्टियोग करतात त्यावेळीं ते दीप्तांशामध्यें फार काळ राहातात व त्यामुळें त्यांचा शुभ अगर अशुभ फलाचा काल दीर्घकालपर्यंत राहातो.

प्रकरण दुसरें

# कुंडली कोणत्या काळाची मांडावयाची ?

जातकामध्यें जन्मकाळाची, प्रश्नज्योतिषामध्यें प्रश्न विचारलेल्या वेळेची किंवा प्रश्न जेव्हां उद्भवला तो काळ प्रश्नकर्त्यानें सांगितला तर त्या काळाची कुंडली मांडतात; त्याचप्रमाणें मेदिनीय ज्योतिषामध्यें महत्वाच्या काळाच्या कुंडल्या' काढून त्यांचा विचार करतात. हे महत्वाचे काळ कोणते ह्यासंबंधानें प्रस्तुत प्रकरणांत विचार करावयाचा आहे. **जातका**मध्ये नक्की जन्मकाळ न मिळाल्यामुळे निराशाजनक स्थिति होते. **प्रश्न**ज्योतिषामध्यें प्रश्न विचारण्याचा काळ किंवा प्रश्न उद्भवणारा जननकाळ खात्रीनें मिळतो व तशीच स्थिति हल्लींच्या शास्त्रीय युगांत ज्योतिर्गणिताच्या सूक्ष्मत्वामुळें आणि परिणतावस्थेमुळें **मेदिनीय ज्योतिष**शास्त्रामध्यें आहे, ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. विवक्षित ग्रहयोग, ग्रहणें, युतियोग इत्यादि कोणत्या वेळेस होतात ह्याचें सूक्ष्मज्ञान आपणांस प्रस्तुतच्या परिस्थितांत 'नाविक' Nautical Almanack किंवा रॅफेलच्या दर वर्षाचे पंचांगावरून करून घेता येते.

मेदिनीय ज्योतिषामध्यें खालीं लिहिलेल्या महत्वाच्या वेळेच्या कुंडल्या ज्या पृथ्वीवरील विशिष्ट प्रदेशांचा विचार करावयाचा असतो तेथील राजधानीच्या शहरांच्या अक्षांशरेखांशावरून तयार करून विचारामध्यें घ्यावयाच्या असतात.

## १. सूर्यसंक्रमणें —

दर महिन्यास सूर्य विशिष्ट राशीमध्यें प्रवेश करतो म्हणजे वर्षामध्यें त्याचीं बारा संक्रमणें होतात. ह्या बारा संक्रमणांमध्यें **मेष** संक्रमण

अत्यंत महत्वाचें आहे. ज्योतिषशास्त्राप्रमाणें नूतन वर्षप्रवेश ह्याच संक्रमणापासून होतो. येथूनच देवाच्या दिवसाचा आरंभ होतो. म्हणून दरवर्षाचा भावी फलादेश राष्ट्रीयदृष्टीनें जाणणें झाल्यास दरवर्षी रवि **मेष** राशीमध्ये ततोतंत ज्यावेळीं प्रवेश करतो त्यावेळीं त्या त्या देशाच्या राजधानीच्या शहराची कुंडली मांडावी लागते. **मेषसंक्रमण** म्हणजे वर्षाचा आरंभ होय आणि म्हणूनच हें संक्रमण अत्यंत महत्वाचें आहे. ह्या संक्रमणाच्या खालोखाल महत्वाचीं संक्रमणें म्हटलीं म्हणजे **कर्क, तुला** व **मकर** हीं आहेत. भारतवासियांनीं **मकरसंक्रमणाला** विशेष महत्व दिलेलें आहे व तें भारताच्या दृष्टीनें योग्यच आहे असें आम्हास वाटतें. **कर्कसंक्रमणावरून** भारतवर्षामध्यें होणाऱ्या वर्षाकाळाचा चांगला बोध होतो व हें संक्रमण भारतवर्षामध्ये होणारें पीकपाणी ह्याचा चांगला बोध करतें. म्हणूनच पीकपाण्याच्या परिस्थितीसंबधानें विचार करतेवेळीं हें संक्रमण व मेषसंक्रमण ह्या दोघांचा समन्वय करून नंतर पीकपाण्यासंबधानें अंदाज बांधणें श्रेष्ठ व युक्त आहे. साधारणपणें वरील दरेक चार संक्रमणाचा अंमल तीन तीन महिने असतो. म्हणून वर्षामध्ये होणाऱ्या ह्या चार महत्त्वाच्या संक्रमणकाळाच्या कुंडल्या प्रथम काढल्या पाहिजेत.

वर्षारंभाच्या मेषसंक्रमणाच्या कुंडलीचा परिणाम सर्वसाधारणपणें सर्व वर्षभर असतो हें जरी खरें आहे तरी मेषसंक्रमणसमयीं जर पूर्वक्षितिजावर **स्थिर** राशि (वृषभ, सिंह, वृश्चिक व कुंभ) उदय पावत असेल तर ह्या **मेष**संक्रमणकाळच्या कुंडलीचा अमल वर्षभर असतो; **द्विस्वभाव** राशि (मिथुन, कन्या, धनु व मीन) उदय पावत असेल तर सहा महिने अमल असतो व **चर** (मेष, कर्क, तुला व मकर)

राशि उदय पावत असेल तर ह्या संक्रमणाचा अमल फक्त तीनच महिने असतो असें काहीं ज्योतिर्विदांचें मत आहे. परंतु हा नियम सर्वांशीं खरा आहे असें आम्हास वाटत नाहीं. **मेषसंक्रमणाच्या** वेळेच्या कुंडलीचें बलाबल लक्षात घेऊनच त्या कुंडलीचा वर्षभर अमल राहील किंवा कमी राहील हें ठरवावयाचें असतें. मेषसंक्रमणाच्या व्यतिरिक्त वर सांगितलेल्या कर्क, तूळ व मकर ह्या तीन संक्रमणाचा अमल तीन महिन्यापेक्षा फारकरून जास्त असत नाहीं असें पाहाण्यात येतें. परंतु काहीं प्रसंगीं एखाद्या संक्रमणाची कुंडली इतकी बलवत्तर असते कीं तिचा अमल तीन महिन्यांपेक्षा अधिक काळ राहू शकतो, असा आमचा अनुभव आहे. मेष, कर्क, तूळ व मकर ह्या चार **चर राशींच्या** संक्रमणाखेरीज बाकी राहिलेलीं आठ संक्रमणेंही कमी महत्वाचीं आहेत. दर महिन्याचा फलादेश घेण्याकरितां त्या त्या महिन्यामध्यें येणाऱ्या राशीच्या संक्रमणकाळचे कुंडलीचा विचार करण्याची प्रथा आंग्ल ज्योतिर्विदामध्यें नाहीं. त्याकरितां ते **रविचंद्रसंयोग** किंवा शुक्ल-प्रतिपदा आरंभ किंवा अमांत काळची कुंडली त्या त्या महिन्यामध्यें विचारामध्यें घेतात. आमच्या गेल्या पन्नास वर्षांच्या अध्ययनकाळामध्यें आम्हीं वर दर्शविल्याप्रमाणेच चार संक्रमणकाळच्या कुंडल्या व त्या त्या महिन्यामध्ये होणाऱ्या रविचंद्रसंयोग किंवा शुक्लप्रतिपदा आरंभ-काळच्याच कुंडल्या विचारामध्ये घेऊन राष्ट्रीय फलादेश वर्तविला आहे. इतर आठ संक्रमणकाळच्या कुंडल्या त्या त्या महिन्याचें रविचंद्रसंयोग काळचे कुंडलीला पूरक किंवा काहीं विशिष्ट गोष्टींकरितां त्या त्या राशींच्या संक्रमणकुंडल्या खात्रीनें मदतरूप होणें शक्य आहे. आम्हीं जें अनुभविलें तें प्रांजळपणें ह्या पुस्तकामध्ये प्रसिद्ध करीत आहों.

## २. रविचंद्रसंयोगकाळ – अमांतकाळ – किंवा शुक्लप्रतिपदाआरंभ :–

सूर्यसंक्रमणाप्रमाणेंच रविचंद्रसंयोगकाळ महत्त्वाचा आहे. ज्या वेळीं रविचंद्र ह्यांचेमध्यें अंतर शून्य असतें, त्यावेळीं इष्ट क्षेत्राची कुंडली माडावी. अशा कुंडल्या एका वर्षामध्यें १२ किंवा १३ माडाव्या लागतील. मेषसंक्रमणानंतरचा पहिलाच रविचंद्रसंयोगकाळ अतिशय महत्त्वाचा असतो. रविचंद्रसंयोगकाळाप्रमाणेंच कांहीं ज्योतिर्विद ज्यावेळीं चंद्र पूर्ण होतो – रविचंद्रप्रतियोग पौर्णिमांत किंवा कृष्णप्रतिपदा आरंभकाळचे इष्टस्थळाची कुंडली माडतात. ह्यावरून कित्येक वेळां त्या त्या कालमर्यादेंतील विशेष घटनांचा बोध होतो. परंतु रविचंद्रसंयोगकाळची कुंडली ही त्या महिन्याकरितां प्रथम श्रेणीची असते व ह्या कुंडलीला पूरक ह्या दृष्टीनें कृष्णप्रतिपदेच्या आरंभकाळची कुंडली घेणें श्रेयस्कर ठरेल.

## ३. सूर्यग्रहणें :–

दरवर्षी बहुधा एक दोन सूर्यग्रहणें होतात. ह्या ग्रहणकाळीं ज्या वेळेस रवि व चंद्र संतोतंत युतिमध्यें येतात त्यावेळेची कुंडली माडतात. ग्रहणारंभकाळची किंवा मोक्षकाळची कुंडली एखादेशाचा विचार करतेवेळीं लक्षांत घेण्याचें कोठेंच कोणत्याही जुन्या ग्रंथकारानीं प्रतिपादन केलेलें आम्हास तरी आढळलें नाहीं. हीं ग्रहणें ज्या देशांत दृश्य असतात त्या देशांत त्याचा विशेष परिणाम दिसून येतो असा अनुभव आहे. सूर्यग्रहण म्हणजे रविचंद्रसंयोगकाळ होय, परंतु दुसऱ्या संयोगकाळापेक्षा ग्रहणकाल अधिक विचारणीय व महत्त्वाचा आहे.

## ४. चंद्रग्रहणें :-

पृथ्वीच्या ज्या भागात हीं चंद्रग्रहणें दृश्य असतात त्या भागामध्ये त्याचा परिणाम फार स्पष्टपणानें दृष्टोत्पत्तीस येतो चंद्रग्रहणकाळीं ज्यावेळीं चंद्र रविबरोबर अंशात्मक ततोतंत प्रतियोग करतो किंवा **कृष्णप्रतिपदेचा** आरंभ ज्यावेळीं होतो त्यावेळची कुंडली मांडावी असा दंडक आहे अर्थात् जे ज्योतिर्विद् दर महिन्याचे पौर्णिमाकाळाची कुंडली मांडतात त्यास चन्द्रग्रहणाकरिता निराळी कुंडली मांडावी लागत नाहीं अमान्त व पौर्णिमान्ताच्या कुंडल्या मांडल्या असता त्यातच सूर्यग्रहण व चंद्रग्रहणाच्या कुंडल्या सहजासहजीं येतात रविचंद्रसंयोग किंवा रविचंद्रप्रतियोग ह्या काळच्या कुंडल्यापेक्षा ग्रहणकाळच्या कुंडल्याचा अमल पुष्कळ काळापर्यंत असतो ग्रहणासंबधानें विवेचन पुढील प्रकरणामध्ये येईल त्यावरून अमान्त किंवा पौर्णिमान्त ह्यापेक्षा ग्रहणाच्या कुंडल्या कशा व कोणत्या तऱ्हेनें जास्त महत्वाच्या आहेत व त्याचा मेदिनीय ज्योतिषामध्ये कसा उपयोग करतात इत्यादि सभग्रानें त्या ठिकाणीं सविस्तर विवेचन केलेलें पाहण्यास मिळेल.

## ५. ग्रहांचे युतियोग व प्रतियोग :-

रविचंद्र याचे संयोगकाल (युतिकाल) व प्रतियोगकाल (पौर्णिमान्त काळ) ह्यापैकीं कोणत्या महत्वाच्या काळच्या कुंडल्या विचारात घेतल्या पाहिजेत ह्याचा जास्त विचार केला, तसाच मुख्य ग्रहांचे युतिकाळ व प्रतियोगकाळ ह्याचा विचार करणें जरूर आहे मंगळ, गुरु, शनि, हर्षल आणि नेपच्यून ह्या ग्रहांपैकीं जेव्हा दोन ग्रह युतियोग करीत असतात तो काळ मेदिनीय ज्योतिषात महत्त्वाचा गणला जातो ग्रहाच्या युतियोग-काळापेक्षा प्रतियोगकाळ थोडा कमी महत्वाचा असतो ग्रहाचे युतियोग

किंवा प्रतियोग ज्यावेळीं ततोतत राशिचक्राच्या विशिष्ट अश कला-विकला मध्यें होतात त्या वेळेच्या कुडल्या इष्ट स्थळाच्या तयार केल्या पाहिजेत कोणत्या ग्रहाचे युतियोग विशिष्ट महत्त्वाचे आहेत इत्यादि सबधानें 'पुढें येणाऱ्या ग्रहाचे युतियोग' ह्या प्रकरणामध्यें सविस्तर विवेचन केलेलें आहे.

ज्या वर्षाचें भविष्यज्ञान करून घ्यावयाचें असेल त्या वर्षातील मेष, कर्क, तूळ व मकर ह्या चार महत्त्वाच्या सक्रमणाच्या कुडल्या, रविचद्र-सयोगकाळच्या कुडल्या (ह्यामध्यें सूर्यग्रहणाच्या कुडल्याचा अतर्भाव होतो), चद्रग्रहणाच्या कुडल्या आणि मुख्य ग्रहाचे युतियोग किंवा प्रतियोग होत असल्यास त्याच्या कुडल्या तयार करून त्याचा विचार केला पाहिजे

मेदिनीय ज्योतिषामध्ये देशातील मुख्य किंवा राजधानीच्या शहराच्या अक्षाश-रेखाशाची कुडली तयार करावी लागते देश मोठा असल्यास एकाहून अधिक स्थळाच्या कुडल्या तयार करणें जरूरीचें असतें भारतवर्षाचा विचार करता भारतवर्षाचें राजधानीचें शहर जें दिल्ली तेथील अक्षाश रेखाशावरील कुडली माडावी लागेल व भरतवर्षामधील जे प्रत्येक निरनिराळे प्रात किंवा प्रदेश आहेत त्या त्या ठिकाणच्या राजधानीच्या स्थळाच्या कुडल्या माडून घेऊन त्या त्या स्थळाचा विचार करावा लागेल मुबई अक्षाश-रेखाशाची कुडली माडली असता लग्नात किंवा दशमात जी ग्रहस्थिति असेल तीच ग्रहस्थिति कलकत्त्याच्या अक्षाश-रेखाशाच्या कुंडलीच्या त्याच स्थानात राहाणार नाहीं महाराष्ट्राचा विचार करतेवेळीं मुंबई अक्षाश रेखाशाची कुडली उपयोगी

पडेल, परंतु तीच कुंडली आसाम किंवा ओरिसा येथील प्रदेशाच्या फलादेशाचे निदानास चालणार नाही दिल्ली अक्षांश-रेखांशावर काढलेली कुंडली स्वतंत्र भारताचा बोध करील परंतु पाकिस्तानसंबधानें विचार करणें असता पश्चिम पाकिस्तानात पूर्वी कराची, हल्ली रावळपिंडी व पूर्व पाकिस्तान याचा विचार करणें असता ढाका येथील अक्षांशावरील कुंडली मांडावी लागेल पुढें परिशिष्टमध्यें भारतवर्षामधील निरनिराळ्या प्रांताकरिता व इतर प्रदेशाकरिता कुंडल्या कशा मांडाव्यात याची त्रोटक माहिती दिलेली आहे त्यावरून इष्ट स्थळाचे अक्षांश-रेखांश घेऊन इष्टस्थळाच्या कुंडल्या कशा सहज तयार करता येतात हें कळेल प्रथम प्रथम विद्यार्थ्याने दरेक ठिकाणच्या निरनिराळ्या कुंडल्या मांडण्याचा अभ्यास केला म्हणजे सवयीनें कोणत्याही एका इष्ट स्थळाची कुंडली मांडून घेतली असता त्या कुंडलीमधील ग्रहस्थिति अन्य स्थळाच्या अक्षांश रेखांशाप्रमाणें कोणत्या स्थानामध्ये यते हें निरनिराळ्या अक्षांशाच्या भावसाधन कोष्टकाच्या सहाय्यानें सहज कळेल कारण निरनिराळ्या स्थळाच्या भिन्नभिन्न अक्षांश रेखांशामुळें कुंडलींतील स्थानाचे भावाचे—अंश मात्र बदलतात परंतु ग्रहस्थिति तीच राहाते

# मेदिनीय कुंडलीच्या द्वादशस्थानांवरून कळणाऱ्या गोष्टी

जातकामध्यें ज्याप्रमाणें कुंडलीच्या द्वादशस्थानावरून विचार करतात त्याप्रमाणेंच मेदिनीय ज्योतिषामध्यें द्वादशस्थानाचा विचार केला जातो व्यक्तीसंबंधानें अनेक गोष्टींचा विचार जसा फक्त द्वादशस्थानावरून होतो, तसाच देशातील किंवा राष्ट्रातील अनेक घडामोडींचा विचार द्वादशस्थानावरून व कारकग्रहावरून करतात. राष्ट्रीय ज्योतिषात द्वादशस्थानाचा विचार करताना देशाच्या किंवा राष्ट्राच्या परिस्थितीचें थोडेंबहुत ज्ञान असणें अवश्य आहे. त्याशिवाय सर्वस्वीं खात्रीलायक असें भविष्य वर्तवितां येणार नाहीं चार संक्रमणकाळच्या अमान्त किंवा पौर्णिमान्त अथवा दोन ग्रहांच्या युतिकाळाच्या कुंडल्यांमधील द्वादशस्थानें खालीं दर्शविल्याप्रमाणें त्या त्या गोष्टींचा बोध करतात.

**प्रथम स्थान:**— या स्थानावरून देशामधील प्रजाजन, सामान्य जनता, देशामधील आरोग्य व शांतता आणि देशाच्या राज्यकारभारांतील अंतर्व्यवस्था, त्या त्या देशामधील लोकांचे उद्योगधंदे व देशाला उन्नत अगर अवनत स्थितीप्रत नेणाऱ्या चळवळी, त्या त्या देशामधील सर्वसाधारण लोकांची मनोवृत्ति व उद्योगधंद्याची प्रगति याचा विचार या स्थानावरून करतात सर्वसाधारणपणें देशामधील सर्व जनताजनार्दनाचा बोध हें स्थान करतें या स्थानाचा परदेशाबरोबर असणारे संबंध किंवा व्यवहार याशीं कोणत्याच प्रकारचा संबंध नाहीं

**द्वितीय स्थान :—** या स्थानावरून देशाची सापत्तिक स्थिति, व्यापार, देशामधील आयात, जमाबंदी, देशातील बँका, पैशाचे देवघेवीचे व्यवहार, पेढ्या, सरकारी जमाबंदी खातें, सरकारी वसूल आणि कर, देशामधील सोनें नाणें, व्यापारामधील देणेंघेणें ( बिल्स ऑफ एक्स्चेंज ), व्यापारासंबधीं ताळेबंद, सरकारी कर्जरोखे, बॉंडस्, ट्रेझरी सर्टिफिकेट्स्, कॅश सर्टिफिकेट्स्, इत्यादींचा विचार करतात

**तृतीय स्थान —** या स्थानावरून रेल्वे, मोटारगाड्या, वगैरे प्रवासाचीं साधनें, तारखातें, पोष्टखातें, देशामधील खुष्कीचे मार्ग, रस्ते, रेल्वेचे रस्ते, पूल, सर्व प्रकारचीं दळणवळणाचीं साधनें, देशामधील ग्रंथकार, लेखकवर्ग, ग्रंथ, पुस्तकें, वर्तमानपत्रें, नियतकालिकें, साप्ताहिकें, दैनिकें, वाङ्मयविषयक कामें, बौद्धिक चळवळी, शेजारचे देश किंवा प्रदेश याचा विचार या स्थानावरून करतात

**चतुर्थ स्थान .—** या स्थानावरून शेती, पिकें, खाणी, देशामधील घरें, सार्वजनिक इमारती आणि राजकारणामध्ये अधिकारारूढ पक्षास विरोध करणारा पक्ष, जमीनजुमला, खाणीमधून उत्पन्न होणारे सर्व प्रकारचे पदार्थ, बागबगीचे, पाण्याचीं तळीं, विहिरी, सरोवरें, देशामधील पिण्याचें पाणी पुरवठा करणारी योजना, देशामधील नदी, नाले, जलाशय, शेतीचे कालवे, हवापाणी, राहण्याचीं घरें, इत्यादि गोष्टींचा विचार या स्थानावरून करतात

**पंचम स्थान —** या स्थानावरून नाटकगृहें, गायन, वादन, शिकण्याच्या शाळा, शर्यती, जुगारगृहें, सट्टेबाजी, रेसकोर्स, विद्यालयें, विद्यार्थीवर्ग, देशामधील लहान मुलें, जन्मनोंद करणारें खातें व

देशामधील विद्यापीठे, जमिनीवी किंवा तीमध्ये होणाऱ्या पिकाची किंमत, शेअरबाजार, सट्टे करण्याची स्थळें, परदेशामधील एलची (वकील), शाळा, शिक्षणसंस्था, देशामधील जननसंस्था इत्यादींचा बोध हें स्थान करते

**षष्ठ स्थान :**— या स्थानावरून देशामधील रोगराई, देशातील सैन्य, आरमार आणि सामान्यतः नोकरीचाकरी करणारे लोक, मजूर वर्ग, आरोग्यखातें, या स्थानाचा अन्न व वस्त्र यावरोबर बराच संबंध असल्याकारणानें देशामधील कापड तयार करण्याचे उद्योगधंदे, तसेंच संसाराला लागणारें सामानसुमान, फर्निचर वगैरे तयार करणारे लोक, धान्य दळण्याच्या गिरण्या किंवा तांदूळ वगैरे सडून तयार करण्याचे कारखाने, या स्थानावरून पोलिस, संरक्षणखातें व राष्ट्रामधील सर्व प्रकारचे सरकारी खालच्या वर्गाचे लोक, रेस्टॉरंट्स, हॉटेल्स, खाद्यपदार्थ साठवून ठेवण्याच्या जागा, लहान प्राणी यांचा विचार या स्थानावरून करतात.

**सप्तम स्थान :**— या स्थानावरून परराष्ट्राबरोबर येणारे दळण-वळणाचे संबंध, परराष्ट्रीय व्यापार, विवाहसंस्था, देशात होणारे लग्नसमारंभ व घटस्फोटाचे प्रकार, देशाचे उघड शत्रू, करार, कॉन्ट्रॅक्ट्स, भागीचे व्यवहार, तहनामे, परदेशाचे नाण्याचे व्यवहार (एक्स्चेंज) या गोष्टींचा विचार होतो

**अष्टम स्थान :**— या स्थानावरून देशामध्ये होणारी मृत्युसंख्या, तोटे, नुकसान, कर्जे, मृत्युकर, प्रतिकर, इन्शुरन्सचे व्यवहार, लोकांची किंवा देशामधील राहाणाराच्या खाजगी उत्पन्नाच्या बाबी व सुप्रीम कोर्ट व देशामधील पेन्शनर लोक यांचा बोध या स्थानावरून होतो

**नवम स्थान :**— दूरदेशाबरोबर जहाजानें किंवा विमानद्वारें होणारे व्यापार व सर्व प्रकारचे व्यवहार जसे – माल नेणें, माल आणणें, प्रवाशयांना

नेणें – आणणें इत्यादि व्यवहार, वायरलेस संदेश, परराष्ट्राबरोबर होणारा ताराचा व्यवहार, रेडिओग्राफ, ब्रॉडकास्टिंग, परदेशासंबंधीं सर्व प्रकारचे व्यवहार, भूलोकातून इतरत्र असलेल्या लोकांचाही संबंध या स्थानानें दर्शविला जातो न्यायालयातें, विश्वविद्यालयें, धार्मिक ज्ञान किंवा धर्मसंबंधी व्यवहार, शास्त्रीय शोध, देशामधील शास्त्रप्रगति, धर्मोपदेशक किंवा धार्मिक क्रियाकांड करणारे लोक, न्यायाधीश, विश्वविद्यालयातील प्राचार्य, देशामधील ग्रंथाचें होणारें प्रकाशन, परदेशामध्यें पाठविला जाणारा माल, जहाजें वगैरे ठरण्याच्या गोद्या, त्यामध्ये काम करणारे लोक तत्त्वज्ञान, अध्यात्मविद्या व शास्त्रीय संशोधन करणाऱ्या संस्था इत्यादि गोष्टींचा या स्थानावरून विचार होतो

**दशम स्थान :**— या स्थानावरून देशाची कीर्ति, अब्रू, सरकार किंवा अधिकारारूढ पक्ष, अधिकारी, राजा, राजघराण्यातील लोक, सरदार, मानकरी, प्रजासत्ताक देशामधील अध्यक्ष, प्रायमिनिस्टर—मुख्य प्रधान, राज्यकारभार, सरकारी व्यवहार इत्यादि गोष्टींचा बोध हें स्थान करतें

**एकादश स्थान :**— या स्थानावरून, कायदेकौंसिल, पार्लमेंट लोकसभा, लोकसभाचे किंवा लोकनियुक्त सभासदांचा विचार होतो शहरामधील म्युनिसिपल कौन्सिल्स यांचाही विचार ह्या स्थानावरून करावयाचा असतो देशाबरोबर मित्रत्वानें संबंध ठेवणारे लोक व राष्ट्रें, परदेशामधील मित्रत्वाचे नात्यानें भरणारीं प्रदर्शनें–समारंभ, देशामधील कायदे, देशात होणारे महत्त्वाचे समारंभ व प्रदर्शनें, देशाचें धोरण व महत्त्वाकांक्षा, देशामधील सुधारणेच्या योजना व परदेशाबरोबरचे स्नेह

संबंध, परदेशांमध्यें पाठविले जाणारे वकील, इत्यादि गोष्टींचा विचार या स्थानावरून करतात.

**व्यय स्थान:—** तुरुंग, हॉस्पिटल्स, सार्वजनिक दवाखाने, रुग्णालयें, देशांतील लोकोपयोगी संस्था, कैदी, बाल गुन्हेगारांना सुधारणाऱ्या संस्था, – रेस्क्युहोम – अनाथाश्रम, देशामधील पंचमस्तंभीय लोक, तसेंच गुप्तशत्रु, हेर, देशामधील गुप्त हेरांचें खातें, गुप्तसंस्था, धार्मिक व अध्यात्म विचार करणाऱ्या–मंत्रतंत्र इत्यादि गूढ विद्यांचा अभ्यास करणाऱ्या संस्था यांचा विचार या स्थानावरून करण्याची प्रथा आहे.

मेदिनीय कुंडलीच्या द्वादशस्थानामध्यें **केंद्र** (प्रथम, दशम, चतुर्थ व सप्तम) स्थानें अत्यंत बलवान असतात व या स्थानाचे खालोखाल **फणफर** (द्वितीय, पंचम, अष्टम व एकादश) स्थानें बलवान असतात आणि **आपोक्लिम** (तृतीय, षष्ठ, नवम व व्यय) स्थानें कमी बलवान असतात. प्रथम, तृतीय व नवम या तीन स्थानांस **बौद्धिक** स्थानें म्हणतात. **प्रथम** स्थानावरून देशामधील सामान्य लोकांची मनःप्रवृत्ति दिसून येते; **तृतीय** स्थानावरून देशामधील वृत्तपत्रें, मासिकें, साप्ताहिकें यांचा बोध होतो. तसेच साधारण ज्ञान देणारें, मनरंजन करणाऱ्या वाङ्मयाचा व ग्रंथ व ग्रंथकारांचा बोध होतो. **नवम** स्थानावरून लोकांमधील धार्मिक प्रवृत्ति, शास्त्रीय संशोधन व ग्रंथप्रकाशन–धार्मिक, कायदाविषयक, तत्वज्ञानविषयक व संशोधनात्मक प्रसिद्ध होणारें लिखाण व ग्रंथ यांचा बोध होतो. विद्यालयांचा विचार पंचम स्थानावरून होतो तर विश्वविद्यालयें, युनिव्हर्सिटीचा विचार नवम स्थानावरून करतात.

दशमस्थानास **राजभुवन** अशी संज्ञा आहे. त्यामुळें ज्या देशामध्यें राजा मानण्याची प्रथा आहे तेथें हें स्थान तेथील राजा व राजकुटुंबाचा

बोध करते परंतु हल्लींच्या युगामधील राजसत्ता जाऊन ती लोकांचे हातामध्यें म्हणजे लोकप्रतिनिधि सभासदांच्या हातामध्यें आल्याकारणानें आता हें स्थान देशाचा लोकनियुक्त अध्यक्ष व मुख्यप्रधान तसें राजकारभारामधील घडामोडींचा बोध करते

राशिचक्रामधील बारा राशि व हीं कुंडलीमधील द्वादशस्थानें यांचा फारच घनिष्ट संबंध आहे. प्रथम स्थान ज्या गोष्टींचा बोध करते त्याच गोष्टींचा संबंध **मेष** या प्रथम राशिबरोबर आहे. **वृषभ** राशीचा संबंध धनस्थानाबरोबर याप्रमाणें इतर राहिलेल्या राशिसंबधानें जाणावें ज्या ज्या राशीमध्यें विशिष्ट ग्रह उच्च किंवा स्वगृहीं होतात त्याचप्रमाणें ते त्या त्या राशिद्योतक स्थानामध्यें उच्ची, स्वगृहीं, उच्ची अगर निच्ची मानावे उदाहरणार्थ, गुरु हा धनु आणि मीन राशीमध्यें असता स्वगृहीं व बलवान असतो व कर्केचा उच्च राशीमध्यें असतो त्याचप्रमाणें संक्रमण कुंडल्यामध्ये किंवा अमावास्या किंवा पौर्णिमा त कुंडल्यामध्ये गुरु चतुर्थामध्ये असता तो उच्चस्थितीप्रमाणें बलवान घेणें व नवम किंवा व्ययस्थानामध्यें असता फलादेशाकरिता तो स्वगृहीं असल्यासारखा घेणे याप्रमाणें इतर ग्रहांचे जाणावे राशि आणि स्थानें यांच्या संयोगानें तारतम्य यायानें ग्रहांच्या भावफलाचा विचार करावा त्यातले त्यात ग्रह ज्या राशीमध्यें असतो त्या राशीनें दर्शविलेला फलादेश हा सर्वसाधारण स्वरूपाचा असतो व ग्रह ज्या स्थानामध्यें असतो त्या स्थानानें दर्शविलेला फलादेश हा त्या स्थलाचा पूर्ण द्योतक त्या ठिकाणापुरता असतो हे चांगलें ध्यानात घेतलें पाहिजे उदाहरणार्थ, हर्शल अगर प्रजापति हा मकरेमध्यें असता मकर-राशि ही दशमस्थान द्योतक राशि असल्याकारणानें जगामधील राजे व राजसत्ता यांचेवर परिणाम घडवून आणून त्यामध्यें फेरफार घडवील, परंतु

ती अमूक निश्चित याच देशामधील घटना असे म्हणता येणार नाहीं परंतु ज्या देशाचे राजधानीचे शहराच्या संक्रमणकाळचे कुंडलीमध्यें किंवा अमान्त किंवा पौर्णिमान्त कुंडलीमध्यें दशमस्थानामध्यें हर्शल येईल तेथें मात्र त्याच प्रदेशामध्यें हा हर्शलचा क्रांतिकारक फेरबदल राजसत्तेमध्यें झालेला पाहाण्यास मिळेल व हा फरक हर्शलबरोबर इतर ग्रहांचे शुभ अगर अशुभ दृष्टिमरून झालेले असतील त्याप्रमाणें पाहण्यास मिळेल.

तसेच कुंडलीचे भावारंभाला किती दिप्तांश द्यावे असा प्रश्न सहज विद्यार्थ्यांपुढें उभा राहील त्यासंबधानें येथें थोडासा खुलासा करणें इष्ट आहे.

आम्हाला आमची जुनी (आरंभसंधि व विरामसंधि), भावारंभ, भावमध्य व भावान्त काढण्याची पद्धति योग्य व चांगली अनुभव देणारी वाटते **भावचलित कुंडली फलादेशाकरितां वेळीं सर्वप्रकारें श्रेष्ठ आहे. नुसती लठ्ठ ढोवळ आंकडे कुंडली घेऊन भावांचा फलादेश करणें हें शास्त्राला सोडून आहे. करितां भावफलांचा विचार भावचलित कुंडली मांडूनच करणे. कुंडलीच्या द्वादशभावावर भावमध्याचे राशि, अंश कला मांडलेल्या असनात** व म्हणूनच दोन भावावर मांडलेल्या राशि, अंश, कला याची बेरीज करून येणारी राशि अंश-कलांचे अर्धे केलें असता येणारें उत्तर भावारंभ किंवा भावाचा अंत कोठें होत आहे हें सहज ध्यानात येईल.

भावचलित कुंडली कशी मांडावी याचें पूर्ण विवेचन आमच्या **जातकमार्गोपदेशिका, खण्ड पहिला** यामध्यें दिलेलें आहे. तें वाचकांनीं पहावें

# ग्रहांचें कारकत्व

रविचंद्रादि ग्रहांपैकीं प्रत्येक ग्रहाकडे कांहीं विशेष प्रकारचें कारकत्व असतें ही गोष्ट जशी जातक किंवा प्रश्नज्योतिषामध्यें आहे, तशीच ती मेदिनीय ज्योतिषामध्यें पण मानलेली आहे रवि हा जातकामध्य किंवा प्रश्नकुंडलीमध्यें पितृकारक चंद्र मातृकारक मानतात व याप्रमाणें प्रत्येक ग्रहाकडे कोणकोणत्या गोष्टींचें कारकत्व मानलेलें आहे त्याचा आता आपण विचार करूं. भावांतील ग्रह, भावाधिपतिग्रह व कारकग्रह या सर्वांचा विचार करून त्या त्या भावासंबंधीं फलाचा विचार करावयाचा असतो

**( १ ) प्लूटो अथवा इन्द्र.**— हा ग्रह नुकताच सन १९३० मध्यें ज्योतिर्विदांना ज्ञात झालेला आहे व त्याचें फलादेशासंबंधात संशोधन चालू आहे. प्लूटो या ग्रहाला विलयक मुक्ति देणारा किंवा रूपांतर करणारा ग्रह मानतात या ग्रहाचे बरेचसे अशुभ गुणधर्म मंगळासारखे पहाण्यास मिळत आहेत या ग्रहाच्या स्वभावधर्मामध्यें वृश्चिक राशीच्या स्वभावधर्माचें बरच साम्य आहे कित्येक ज्योतिर्विद या ग्रहामध्यें अणुस्फोट केला असता जी शक्ति निर्माण होते ती असल्याचें मानतात व म्हणूनच अणुयुगाचा कारक ग्रह म्हणूनच त्याला संबोधण्याची वृत्ति वाढत आहे या ग्रहामध्यें संघटणा करून कार्य घडवून आणण्याची अशुभ प्रवृत्ति आहे व म्हणूनच धाड पाडणाऱ्या टोळ्या, तसेंच मुलें, माणसें, स्त्रिया वगैरे पळविणाऱ्या टोळ्यांचा हा ग्रह कारक मानतात हा ग्रह एकाच राशीमध्यें दीर्घकाळ राहत असल्यानें त्या राशीनें दर्शविल्या

जाणाऱ्या फलादेशाचें एक प्रकारचें नूतन युगच निर्माण झालेलें पाहाण्यास मिळतें. हा ग्रह दृष्टियोगानें अशुभसंबंधित असता ज्या ज्या स्थानामध्यें येतो त्या त्या स्थानसंबंधात बराच अशुभ फलादेश दर्शवितो; सर्व प्रकारची शक्ति तो त्या त्या स्थानामध्यें केंद्रीभूत करतो व संघटना करून तो शुभ अगर अशुभ कृत्यें तो ज्याप्रमाणें दृष्टियोगानें संबंधित असतो, त्याप्रमाणें दर्शवितो. आम्ही या ग्रहाला **इंद्र** हें नाव योजिलें होतें; परंतु दक्षिणेकडील एका ज्योतिर्विदानें त्याला **रुद्र** हें नामाभिधान केलें आहे.

**( २ ) नेपच्यून अथवा वरुण :—** हा ग्रह गुप्त कारस्थानें, राजद्रोह, पैशासंबंधीं ठकबाजकरी, सार्वजनिक चळवळी, हॉस्पिटल्स, तुरुंग, कैदखाने, भिक्षागृहें किंवा दानसंस्था, कुंटणखाने, सिनेमासृष्टि, सिनेमा किंवा कृत्रिम पदार्थ तयार करण्याचे धंदे, समाजसत्तावाद, प्रजासत्तात्मक राजकीय चळवळी, विकारी औषधें, गांजा, भांग, अफू, दारू इत्यादि निशा आणणारे पदार्थ; समुद्र, रंग, तेलें, गुंगी आणणारीं द्रव्यें किंवा औषधें, समुद्रासंबंधीं उद्योगधंदे तसेच, हा ग्रह अतींद्रिय शक्ति, दिव्य दृष्टि, दिव्य स्फुरणा होणारें उपजत ज्ञान, इत्यादि गोष्टींचा कारक आहे. राशिचक्रामधील मीन राशीचा व या ग्रहाचा विशेष संबंध आहे. म्हणून या राशीच्या द्योतक उद्योगधंद्याचा हा ग्रह बोध करतो.

**( ३ ) हर्शल-युरेनस अथवा प्रजापतिः —** हा ग्रह देशामधील रेल्वेमार्ग किंवा संस्था, शास्त्री, संशोधक, ज्योतिषि, संप, मारामाऱ्या, शास्त्रीय विषयाची प्रगति, विद्युत्‌शास्त्र, विमानशास्त्र, भौतिक क्षोभ, यंत्राची मोडतोड होऊन होणारे भीषण अपघात, मार्क्सिस्ट लोकांचे अत्याचार यांचा कारक हा ग्रह आहे. राशिचक्रामधील कुंभराशीनें दर्शविले जाणाऱ्या सर्व उद्योगधंदे यांचा बोध हा ग्रह करतो.

**(४) शनि** :– हा ग्रह देशामधील वृद्ध माणसें, जमीनदार, शेतकरी, मजूर, खाणी आणि खनिज पदार्थ, गळिताचीं तेलें, नोकरी–चाकरी करणारे लोक, लाकडाचा किंवा कोळशाचा व्यापार करणारे लोक याचा बोध करतो.

**(५) गुरु** :—हा ग्रह देशामधील देवळें, धर्मस्थळें, धर्मगुरु, आचार्य – (मग ते कोणत्याही धर्माचे किंवा पंथाचे असू शकतात), साधु, संत, तत्ववेत्ते, न्यायाधीश, बँकर्स, पेढीवाले किंवा नाण्याची किंवा पैशाची देवघेव करणारे लोक, धार्मिक क्रियाकांड करणारे लोक, धार्मिक संस्था, युनिव्हर्सिटी–विश्वविद्यालयें, इत्यादि गोष्टींचा कारक हा ग्रह आहे.

**(६) मंगळ** :— हा ग्रह सेनापति, लष्करच्ये लोक, सैन्य, डॉक्टर, सर्जन, आरमार, पोलीस, मिल्टिरी, युद्धें, मारामाऱ्या, अग्निप्रलय, भांडणें, असंतोष, चोऱ्या, दरोडे व त्यापासून त्रास, अग्निजीवी लोक—लोहार, सोनार, तसेंच शस्त्रास्त्रें, दारुगोळा वगैरे युद्धसाहित्य तयार करणारे लोक व लोखंडादि धातूंच्याबरोबर या ग्रहाचा विशेष संबंध असल्या कारणानें सर्व प्रकारचे लोखंड व पोलादाचे पदार्थ यंत्रद्वारें तयार करण्याच्या कारखान्याचा कारक हा ग्रह आहे.

**(७) शुक्र** :— हा ग्रह कलाकौशल्य, चित्रकार, गवई, बजवय्ये, स्त्रिया, नर्तनविद्या, काव्य, गायन, नाट्य, संगीत, विवाहोत्सव, समारंभ, वनभोजनें, जलविहार, सुवासिक फुलें, अत्तरें, रेशमी वस्त्रें, अलंकार रतिक्रीडा इत्यादि गोष्टी व धंद्याचा हा ग्रह कारक आहे.

**(८) बुध** :— हा ग्रह देशामधील लेखकवर्ग, ग्रंथकार, वृत्तपत्रें, संपादक, ग्रंथप्रकाशन, प्राथमिक शिक्षण व शिक्षक, कारकून, दलाल, बौद्धिक परिश्रम करणारे लोक, व्यापारी, स्टेशनरी किंवा पुस्तकें विकणारे,

पोस्ट, टेलिफोन, टेलिग्राफ, दळणवळण, रस्ते, लायनऱ्या, वक्तृत्व इत्यादि गोष्टींचा हा ग्रह कारक आहे. ह्या ग्रहाचा वक्तृत्वाबरोबर संबंध असल्या-कारणानें हा ग्रह लोकांच्या सभा किंवा वादविवाद, राजकीय अर्थात लोकसभेमध्यें होणारी चर्चा – वादविवाद, लोकसभेचा वक्ता ( स्पीकर ) इत्यादि गोष्टीचा कारक आहे.

( ९ ) **रवि :**— राष्ट्राचा मुख्य अर्थात् राजा ( पुरुष असता, परंतु स्त्री राष्ट्रावर राज्य करीत असेल तर राणी ) चाही बोध या ग्रहानें होतो. लोकसत्तात्मक राज्यामध्ये अध्यक्षाचा बोध रवीनें केला जातो. तसेंच कोणत्याही प्रकारच्या उद्योगधंद्याच्या क्षेत्रामध्यें जो सर्वांत श्रेष्ठ अधिकारी पुरुष असतो त्याचाही बोध रवीनेंच केला जातो. धंद्याच्या मालकाचा कारक हाच ग्रह आहे. अधिकारी, सत्ता धारण करणारे लोक, राजपुरुष, राजघराणें, राज्याचे प्रधान किंवा लोकसत्तात्मक राष्ट्राचा प्रधान – प्राइम-मिनिस्टर याचा कारक हा ग्रह आहे. तसेंच मोठे प्रासाद, राजगृहें, सचिवालयें, याचा व सोनें, चांदी, जवाहीर यांच्या बाजाराचा याच ग्रहानें बोध केला जातो.

( १० ) **चंद्र**'— हा ग्रह प्रजाजन, जनसमाज, सामान्य दर्जाचे लोक आणि देशामधील स्त्रीवर्ग, देशामधील पाण्याचे तलाव, नद्या, जलाशय, तसेंच जलाबरोबर येणारे धंदे, सार्वजनिक भाजीमार्केट, मासळी फिश-मार्केट, गौळीवाडे, दूधविक्री करणारे किंवा तत्सम पदार्थांची खरेदीविक्री करणारे लोक किंवा ते धंदे करणारे लोक व त्यांची केन्द्रें, देशामधील लहान अर्भकें, जमीन, पीक, स्थलांतर, राहण्याचीं घरें इत्यादि गोष्टींचा हा ग्रह कारक आहे

प्रकरण पांचवें

# ग्रहांचीं भावफळें व दृष्टियोगांचीं फळें

जातकांत, प्रश्नज्योतिषामध्यें किंवा मेदिनीय ज्योतिषामध्यें जे जे ग्रह ज्या ज्या भावामध्यें असतात त्याप्रमाणें त्या त्या भावासंबंधीं अनुकूल अगर प्रतिकूल अशा त्या त्या भावांसंबंधीं फळें दर्शवितात. ग्रहांना जशीं भावफळें आहेत तशींच ते ते ग्रह ज्या ज्या विशिष्ट राशीमध्यें असतात, तदनुरूप त्या राशीनें दर्शविलीं जाणारीं फळेंही ते व्यक्त करतात. राशिफळें हीं सर्वसामान्य स्वरूपाचीं असतात. मेदिनीय ज्योतिषामध्यें विशेषतः ज्या राशीमधून ग्रह भ्रमण करीत असतात तत्द्योतक उद्योगधंदे, रोजगार यांमध्यें ते ज्या ज्या प्रमाणें इतर ग्रहानें शुभ अगर अशुभ संबंधित असतात त्याप्रमाणें त्या त्या उद्योगधंद्यांवर परिणाम करितात. शीघ्रगतीग्रह – रवि, चंद्र, बुध, शुक्र यांचीं राशिफळें दीर्घकाळ त्या त्या उद्योगधंद्यांसंबंधानें अनुभवास येत नाहींत. परंतु मंगळ, गुरु, शनि, हर्शल, नेपच्यून व प्लूटो यांचीं फळें अनुक्रमाप्रमाणें चढत्या प्रमाणांत त्या राशीनें दर्शविल्या जाणाऱ्या उद्योगधंद्यांच्या क्षेत्रामध्यें अनुभवास येतात. स्थिर ग्रहांमध्यें होणारे दृष्टियोग हे एकदांच न घडतां वारंवार पुनः पुन्हा निरनिराळ्या त्याच त्या राशीच्या अंशामध्यें होतात ; त्यामुळें या ग्रहांचे दृष्टियोगाकडे विशेषच लक्ष दिलें पाहिजे. उदाहरणार्थ, सन १९०६ ते १९१० सालअखेरपर्यंत हर्शल व नेपच्यून यांच्यामध्यें कर्क व मकरराशीमधून ११ वेळां प्रतियोग झालेला आहे, हे दृष्टियोग दीप्तांशांमध्यें बराच काळपर्यंत राहतात. शनि, हर्शल, नेपच्यून व प्लूटो या स्थिर ग्रहांमध्यें झालेले दृष्टियोग अनेक वेळां होतात.

शनि गुरूमध्यें होणारे दृष्टियोग तेच ते पुन्हा फक्त तीन चार वेळाच झालेले आढळतात.

ग्रहाचें राशीमधून होणारें गोचर भ्रमण हें नुसतें त्या त्या राशीनें दर्शविल्या जाणाऱ्या उद्योगधंद्यावरच त्याच्या गुणधर्माप्रमाणें परिणाम करतात असेच नव्हे तर ती ती राशि ज्या ज्या शहराची किंवा प्रदेशाची, प्रांताची किंवा देशाची असते त्या त्या प्रदेशावर किंवा त्या त्या प्रांतावर ग्रहाचे गुणधर्म व दृष्टियोग ह्यानुसार परिणाम करतात. राष्ट्रीय ज्योतिषामध्यें कुंडलीच्या ज्या स्थानामध्यें ग्रह असतो, त्या ठिकाणींच तो जसा राशिगत व शुभ अगर अशुभ दृष्टियोगानें संबंधित असेल त्या प्रमाणें ज्या राजधानीच्या शहराची कुंडली मांडली असेल तेथील आजूबाजूचे किंवा त्या त्या देशासंबंधीं सर्वसाधारण फल दर्शविते राशि, स्थान व दृष्टियोग यांना धरून कोणत्या तऱ्हेचा फलादेश अनुभवाला येईल याचा सारासार विचार करूनच फल ठरवावयाचे असतें हें काम जितकें सोपें दिसतें तितकेंच तें कठीण आहे. या लहानशा पुस्तकामध्यें फक्त राशि-फलें, दृष्टिफलें इत्यादि गोष्टी विचारामध्यें न घेता ग्रहाच्या गुणधर्माप्रमाणें कुंडलीमधील निरनिराळ्या स्थानामधील त्या त्या ग्रहाचा काय फलादेश दर्शविला जाईल याचाच विचार करून दिलेलीं आहेत. ग्रहांचीं फलें ते ज्या स्थानात असतात त्याप्रमाणें व त्याचेबरोबर होणाऱ्या इतर ग्रहाच्या दृष्टियोगाप्रमाणें अनुभवास येतात ग्रहांचीं स्थानफलें व त्यामध्यें दृष्टियोगामुळें होणारे फरक याचे सूक्ष्म ज्ञान होणें हें राष्ट्रीय ज्योतिषात अत्यंत महत्त्वाचें आहे. जिज्ञासु विद्यार्थ्यांनीं या भागाकडे विशेष लक्ष द्यावें नवग्रहांचीं स्थानफलें व दृष्टियोगफलें पुढें वर्णन केलीं आहेत

## ( १ ) रवि

**रवि प्रथमस्थानांत :**— या स्थानामध्यें शुभ दृष्टियोगानें संबंधित असलेला रवि राष्ट्राची भरभराट, राजा व अधिकारारूढ पक्ष यांचे सामर्थ्य, देशांतील आरोग्य व देशाचा परराष्ट्रांत दर्जा वाढवितो. ह्या स्थानांत रवि पीडित असेल तर शुभफलें पुष्कळ अंशानें कमी होतात व देशामध्यें मालक व मजूर यांच्यामध्यें असंतोष उत्पन्न होतो व आरोग्य चांगलें राहात नाहीं. रवीला या स्थानांत फारच स्थानमहत्त्व असल्याकारणानें तो जरी अशुभसंबंधित असला तरी अल्पांशानें तरी शुभ फलें दृष्टोत्पत्तीस आणतोच.

**रवि धनस्थानांत :**— या स्थानामध्यें रवि शुभ दृष्टियोगानें संबंधित असतां देशामधील धनोत्पादक धंदे, बँका यांची सुस्थिति असते, देशामधील उद्योगधंद्यांची भरभराट होते, धनोत्पादक साधनें वाढतात, देशाची सांपत्तिक दृष्टीनें भरभराट होते ; परंतु जर का रवि या स्थानांत पीडित असेल तर राष्ट्रामधील खर्चाचें प्रमाण पण वाढतें व तो कराचा बोजा वाढवितो, देशांतील उद्योगधंद्यांस ओहोटी लागते व देशांत दिवाळीं निघण्याचा संभव असतो. शेअरबाजारमध्यें मोठ्या प्रमाणांत तोटे झाल्याकारणानें देशाची आर्थिक स्थिति खालावते.

**रवि तृतीय स्थानांत :**— रेल्वे, तार, पोस्ट, टेलिफोन, टेलीग्राफ व विद्याखातें, प्राथमिक शिक्षण-संस्था यांची भरभराट होते. देशामधील रस्ते, पूल, कॅनॉल, प्रवासाचीं साधनें यामध्यें सुधारणा होतात व प्रवास सुखकर करण्याचा प्रयत्न अधिकारीवर्गाकडून किंवा राजद्वारी साह्यानें होतो. परंतु या स्थानांत रवि पीडित असतां वरील सर्व गोष्टींमध्यें संकटपरंपरा निर्माण होते. या स्थानामध्यें रवि, मंगळहर्षलनें पीडित अर्थात् अशुभ

दृष्टियोगानें संबंधित असतां भयंकर रेल्वे अपघात होतात व त्यांत प्राणहानि होते. तसेंच देशामधील रस्त्यावरील अपघातांची संख्या वाढते. या स्थानामधील शुभसंबंधित रवि चांगलीं फळें दर्शवितो.

**रवि चतुर्थ स्थानांत** :– हा काळ जमीनमालक, खाणीचे मालक यांना भरभराटीचा असतो व देशामध्यें खनिज पदार्थ व पिकें यांची समृद्धि दर्शवितो. जमीनदारांची, घरमालकांची भरभराट करतो. देशांत इमारती, मोठीं घरेंदारें व इमले बांधण्याची प्रवृत्ति निर्माण करतो. लोकपक्ष बलवत्तर होतो. लोकांस हितावह असे कायदे होण्याचा काळ आला आहे असें दर्शवितो. या स्थानांत रवि विपुल पर्जन्य देत नाही. तो शुभ दृष्टियोगानें संबंधित असतां पीकपाणी चांगलें असतें. परंतु अशुभ दृष्टियोगानें पीडित असतां पर्जन्याची खेंच, लोकपक्ष व सरकारपक्ष ह्यांच्यामध्यें सलोखा नांदत नाहीं व या काळामध्यें एखादी मध्यंतरीं निवडणूक होण्याचा प्रसंग आला तर सरकारपक्षाचा पराजय होतो.

**रवि पंचम स्थानांत** :- या स्थानामधील शुभ दृष्टियोगानें संबंधित असलेला रवि विद्यामंदिरें, शाळाखातें व नाटकसिनेमागृहें यांची भरभराट होते. राजे, राजकुलोत्पन्न पुरुष व उच्च दर्जाचे लोक यांस हा काळ चांगला असतो. देशांत आनंदोत्सव होतात व लोकसमूह त्यांत मग्न असतो. परंतु या स्थानामध्यें रवि पापग्रहांच्या दृष्टियोगानें पीडित असतां या स्थानानें दर्शविल्या जाणाऱ्या फळांची हानी होते व वाईट अनुभव येतो. राजघराणें, मोठे लोक, प्रेसिडेन्ट यांचेवर आपत्ति दर्शविली जाते. नाटक, सिनेमा गृहें, शाळा यांना प्रतिकूळ काळ असतो. विद्यार्थी-वर्ग, शिक्षक, बालकें यांच्यासंबंधानें देशांत अपवादप्रद वातावरण

निर्माण होतें व या गोष्टीचा बराच गाजावाजा होतो. देशामधील बाल मृत्युसंख्या वाढते, अधिकारीवर्ग व अमलदार यांचे मृत्यु घडतात

**रवि षष्ठ स्थानांत** ---या स्थानामधील शुभ दृष्टियोगानें संबंधित रवि देशामधील उद्योगधंदे, रोजगार यांना अनुकूल काळ दर्शवितो व देशामधील उद्योगधंदे, रोजगार चांगले चालतात व त्यामुळें देशामधील मजूरवर्ग, नोकरवर्ग व सर्व प्रकारचीं कामें करणारे कारखान्यामधील नोकरवर्ग यांची सुस्थिति राहाते देशामधील सैन्यदळ, आरमार, सरकारी व इतर कामकाज करणारा नोकरवर्ग यांची भरभराट होते. अनुकूल व सुस्थिति प्राप्त होण्याकरिता योग्य त्या अडचणी दूर केल्या जातात; आरोग्यखातें व अन्नरक्षखातें विशेष दक्ष राहून देशामध्ये या विभागामध्यें महत्वाच्या घटना होतात व त्यामुळें प्रजाजनामध्ये पूर्ण शांतीचें वातावरण राहतें परंतु या स्थानामध्यें पीडित रवि असतां देशांत संप होण्याची धास्ती असते या स्थानामधील अशुभ दृष्टियोगानें पीडित झालेला रवि देशांतील मजूरवर्गामध्यें असंतोष निर्माण करतो व देशामधील नोकरवर्ग वगैरेमध्यें हरताळ, संप व विरोध उत्पन्न झाल्याकारणानें अधिकारीवर्ग, सरकार व मालक यांना हा काळ तीव्र जाचक व त्रासदायक होतो. रवि ज्या राशीमध्यें असतो व तो अशुभ दृष्टियोग ज्या ग्रहाबरोबर करून पीडित होतो त्या राशीनें दर्शविले जाणारे रोग किंवा आजार त्या काळामध्यें देशांत फैलावतात व देशामधील प्रजाजन रोगराईनें ग्रस्त होतें. त्याचप्रमाणें त्या राशीनें दर्शविले जाणारे प्रदेश व देश यांचेबरोबर विरोध व शत्रुत्व किंवा संकटपरंपरा निर्माण होते

**रवि सप्तम स्थानांत** :—रवि या स्थानांत शुभ दृष्टियोगानें संबंधित असतां किंवा त्याचेबरोबर इतर कोणत्याही ग्रहाचे अशुभ दृष्टियोग

झालेले नसतीउ तर देशात शातता, निरनिराळ्या पक्षामध्यें सलोखा आणि प्रजापक्ष व राजपक्ष किंवा अधिकार धारण करणारा पक्ष याचेमध्यें परस्पराविषयीं सहानुभूति उत्पन्न होते. राजकारणामध्यें लोकपक्षाचें वजन वाढतें. राजघराण्यामध्यें किंवा अधिकार धारण करणाऱ्या पक्षामध्यें लग्नसमारंभ, परराष्ट्रीय राजे किंवा प्रेसिडेन्ट, प्राइम मिनिस्टर याच्या भेटी घडतात. इतर राष्ट्रांशीं शाततावर्धक व्यापार इत्यादि सलोख्याने तहनामे होतात; परंतु या स्थानामध्यें रवि पीडित किंवा अशुभ दृष्टियोगानें संबधित झाल्यास पक्षोपपक्षामध्ये वितुष्ट वाढतें व देशात अशांतता, असंतोष व अस्वस्थता उत्पन्न होते.

**रवि अष्टम स्थानांत :—** रवि शुभ दृष्टियोगानें संबधित व बलवान् असता देशामध्यें आरोग्य वाढतें, सरकारी वसूल समाधानकारक होतो आणि सरकारी तिजोरीमध्यें परराष्ट्रीय मालावरील जकातीचें, इन्कमटॅक्सचें, डेथ-ड्यूटीचे इत्यादि कराचें उत्पन्न पुष्कळ जमा होतें. परंतु रवि या स्थानामध्यें बलहीन अशुभ दृष्टियोगानें पीडित असता देशामधील मृत्युसंख्या वाढते व देशाच्या तिजोरीमध्यें वर दर्शविलेल्या बाबतीच्या उत्पन्नात घट येते; सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशामध्यें तसेंच देशामधील पेन्शनर लोकामध्यें मृत्यु घडतात.

**रवि नवम स्थानांत :–** धर्म, कायदा, विश्वविद्यालयें आणि परराष्ट्रीय व्यापार यांस हा काळ भरभराटीचा असतो. राजघराण्यामधील किंवा देशामधील अधिकार धारण करणारे अधिकारी पुरुष परदेशाचे प्रवासास जातात. अधिकारीवर्गास हा काळ सर्वतोपरि अनुकूल असतो

**रवि दशम स्थानांत :—** राजा, प्रेसिडेन्ट, प्रधान व अधिकारीवर्ग याना हा काळ फारच अनुकूल असतो. देशाची सुधारणा होऊन

परराष्ट्रमध्यें मान वाढतो या स्थानामध्यें रवि अशुभ दृष्टियोगानें पीडित असणें फारच वाईट असतें. रवि अष्टमेशाकडून अशुभ दृष्टियोगानें पीडित असता किंवा तो अष्टमेश असून या स्थानामध्यें पीडित असता राजे, प्रेसिडेन्ट, राजघराणे यामध्यें मृत्यु घडतात

**रवि एकादशस्थानांत** —लोकसभा किंवा कायदेकौन्सिलमध्ये महत्वाचे कायदे किंवा ठराव पास होतात परराष्ट्राबरोबर स्नेहसंबंध वाढतात व मित्रराष्ट्राचे तहनामे व करार होतात जनता व अधिकारीवर्ग याचेमध्यें सलोखा राहतो, परंतु या स्थानामध्ये रवि पापग्रहाबरोबर अशुभ दृष्टियोगाने पीडित असता कायदेकौन्सिलमध्यें विरोध होतो, लोकसभा व राजसभा याचेमध्यें विरोध झालेला पाहण्यास मिळतो. किंवा राजा किंवा प्रेसिडेन्ट याचेकडून होणाऱ्या कायद्याला अनुकूल मत नसतें कायदेकौन्सिलच्या सभासदामध्यें मृत्यु घडतात

**रवि व्ययस्थानांत** —या स्थानामध्ये रवि अशुभ दृष्टियोगानें पीडित होणें केव्हाही चांगलें नाहीं कारण त्यामुळे राजकारणामध्यें अनेक भानगडी उत्पन्न होऊन देशांत अस्वस्थता प्राप्त होत, राजशकट सुरळीत चालत नाहीं व धर्मार्थ दवाखाने, इस्पितळें, तुरुंग वगैरे संबंधाने देशात समाधानकारक स्थिति राहात नाहीं या संस्थाकडे राज्यकारभार करणाऱ्या पक्षाचें दुर्लक्ष होतें परंतु या स्थानात बलवान् व शुभ दृष्ट रवि असेल तर वरील संस्थाना सरकारी मदत मिळून त्याची सुस्थिति झालेली पाहण्यास मिळते व देशाला हितकर अशा तऱ्हेचे देशात वातावरण राहातें व अधिकारीवर्ग बलवान् असतो

## कुंडलीच्या निरनिराळ्या स्थानांमध्यें रविचंद्रसंयोग कोणत्या तऱ्हेचा फलादेश दर्शवितो ?

रवि-चन्द्रयुति जेव्हा होते तेव्हा अमा पुरती होते व शुक्लप्रतिपदेस आरंभ होतो. रवि-चंद्रसंयोगकाळची स्वतंत्र कुंडली इच्छित स्थळाची मांडून तीवरून त्या चांद्रमासामध्यें कोणत्या तऱ्हेचा फलादेशाचा अनुभव येईल याचा विचार राष्ट्रीय ज्योतिषामध्यें करण्याची प्रथा आहे. या कुंडलीच्या ज्या स्थानामध्यें रविचंद्रसंयोग पडतो त्या स्थानानें दर्शविल्या जाणाऱ्या गोष्टी एकदम उत्तेजित होऊन हा रविचंद्रसंयोग ज्याप्रमाणें इतर ग्रहांच्या शुभ अगर अशुभ दृष्टियोगानें संबंधित झालेला असतो तदनुरोधानें त्या त्या स्थानानें बोध होणाऱ्या गोष्टींचीं शुभ अगर अशुभ फळें त्या महिन्यामध्यें अनुभवास येतात ; इतकेंच नव्हे तर ज्या ज्या देशाचे कुंडलीमध्ये हा रवि चंद्रसंयोग ज्या भावांत पडतो तो त्या कुंडलीचा भाव उत्तेजित झाल्याकारणानें त्याही भावाचीं फळें दृग्गोचर होऊं लागतात. तसेंच हा मासिक रवि चंद्रसंयोग पूर्वी जीं रवीचीं चार महत्वाचीं संक्रमणें सांगितलीं असून त्या काळच्या कुंडल्या मांडण्यास सांगितल्या आहेत त्या संक्रमणकाळचे कुंडल्यामध्ये ही रवि-चंद्र युति कोणत्या भावांत तेथील कोणत्या ग्रहावर पडत आहे याचा विचार करून नंतर त्या संक्रमण-कुंडलीमधील त्या भावासंबंधांत त्या महिन्यामध्यें कोणत्या तऱ्हेचा फलादेश अनुभवण्यास मिळेल याचें निदान करावयाचें असते

खालीलप्रमाणें द्वादशस्थानामध्यें घडणारे रवि चंद्रसंयोग फळें दर्शवितात

**प्रथमस्थानामध्यें** — मेदिनीय ज्योतिषामध्यें ज्या ज्या काळच्या कुंडल्या मांडण्यास सांगितल्या आहेत त्याच्या लग्नामध्यें — प्रथमस्थानामध्यें

रवि-चंद्रसयोग घडत असता, कुंडलीमधील हें स्थान इतर स्थानापेक्षा विशेष महत्त्वाचें असल्याकारणानें व या स्थानावरून त्या त्या देशामधील प्रजाजन व त्या देशामधील प्रजेच्या परिस्थितीचा बोध होत असल्या कारणानें हा रवि चंद्रमयोग त्या महिन्यामध्यें प्रजाहित किंवा अहित ह्या सबधीं होणाऱ्या महत्त्वाच्या घडामोडीचा बोध करतो व या घडामोडी सर्वसाधारण-पणें रविचंद्रमयोग ज्याप्रमाणें इतर ग्रहावरोबर दृष्टियोगानें संबंधित असतो त्याप्रमाणें अनुभवाला येतात. हा रवि चंद्रमयोग शुभ दृष्टियोगानें संबंधित असता देशामधील प्रजाजनाची सुस्थिति किंवा त्याच्या सुखाकरिता निर-निराळ्या सोई अमलात येतात. परंतु येथें रवि-चंद्रमयोग पापदृष्टियोगानें पीडित असता देशात अस्वस्थता, भाडणेतंटे व अत्याचार झालेले पाहाण्यास मिळतात. देशात रोगराईनें प्रजाजन पीडित होतात. रवि-चंद्रसयोग ज्या ग्रहावरोबर अशुभ दृष्टियोगानें पीडित होतो त्या ग्रहाचे गुणधर्माप्रमाणें अशुभ फळें अनुभवास येतात.

**धनस्थानामध्यें** —शुभदृष्टियोगानें संबंधित रवि-चंद्रसयोग पडत असता हा काळ शेअर, गव्हर्नमेंट प्रॉमिसरी नोटा, देशामधील उत्पन्न व सापत्तिक स्थिति चागली भरभराटीची असते. परंतु अशुभ दृष्टियोगानें पीडित असता देशामधील सापत्तिक स्थिति, बँका, शेअरबाजार याना प्रतिकूल काळ असतो. शुभयोगामध्यें देशाचें उत्पन्न वाढतें, नाण्याची तूट पडत नाहीं. गव्हर्नमेंट प्रॉमिसरी नोटाचे भाव चागले असतात, स्टॉक शेअरबाजार चागला राहातो.

**तृतीयस्थानामध्यें** :—रवि चंद्रमयोग या स्थानामध्यें प्रवासाचीं साधनें, पोस्ट, टेलिग्राफ, टेलिफोन इत्यादि साधनाना शुभसंबंधित असता भरभराट व त्यापासून देशाला त्या त्या महिन्यामध्यें लाभ दर्शवितो. या

महिन्यामध्यें नवीन रस्ते, नवीन पोष्ट ऑफिसें वगैरे उघडली जातात. परंतु अशुभसंबंधांत रवि-चंद्रसंयोग या स्थानामध्यें घडत असतां अपघात घडतात, अपघातानें रस्त्यांमधील मृत्युसंख्या वाढते व वर दर्शविलेल्या सर्व व्यवहारांमध्यें मानगडी उत्पन्न होतात.

**चतुर्थस्थानामध्यें** :– रवि-चंद्रसंयोग शुभदृष्टियोगानें संबंधित असतां देशामधील शेतीभाती, बागबगीचे, पीकपाणी चांगलें लाभकारक असतें व लोकांस सुख व समाधान प्राप्त होतें. परंतु या स्थानामधील अशुभ दृष्टियोगानें पीडित झालेला रवि-चंद्रसंयोग देशांतील पिकाची हानि करतो. राजकर्त्याविरुद्ध पक्ष निर्माण होऊन राजपक्षाचा पराजय होतो; चतुर्थ भावमध्यावर स्थिरराशीमध्यें वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ या राशींमध्यें रविचंद्रसंयोग अशुभ दृष्टियोगानें संबंधित होत असतां खाणीमधील अपघात किंवा भूकंपाच्या उत्पातामुळें हानि होण्याचें भय निर्माण होतें.

**पंचमस्थानामध्यें** :– हें स्थान शिक्षण, मौज-शौक, देशामधील जनन, सट्टा, रेस, बेटिंग यांचे द्योतक असल्याकारणानें अशुभ दृष्टियोगानें पीडित रवि-चंद्रसंयोग येथें वरील गोष्टीमध्यें हानि करतो व शुभ दृष्टियोगानें संबंधित असतां वरील गोष्टींमध्यें वृद्धि व लाभ दर्शवितो.

**रवि-चंद्रयुति षष्ठ स्थानांत** :— होत असून हा रवि-चंद्रसंयोग शुभ दृष्टियोगानें संबंधित असतां या स्थानानें दर्शविले जाणारे उद्योगधंदे वगैरेकरतां अनुकूल काळ असतो. देशांत आरोग्य नांदतें व उद्योगधंदे, रोजगार सुरळित चालून नोकरवर्ग-मजूर यांची सुस्थिति असते. परंतु पापदृष्टियोगानें पीडित असा रवि-चंद्रसंयोग षष्ठ-स्थानामध्यें देशांत आजार व कामकरीवर्ग, मजूर-नोकरवर्ग यांच्यामध्यें अस्वस्थता दर्शवितो.

**रवि-चंद्रसंयोग सप्तम स्थानामध्यें** -- शुभदृष्टियोगानें संबंधित या स्थानामध्ये होणारा रविचंद्र संयोग परदेशाबरोबर उत्तम स्नेहसंबंध दर्शवितो, देशाचें परराष्ट्रीय धोरण व व्यवहार देशाला प्रगतीपथावर नेणारे अनुकूल, मदत व स्नेहवर्धक असतात देशांत पुष्कळ लग्नसमारंभ होतात, परंतु अशुभ दृष्टियोगानें पीडित असलेला या स्थानामधील रवि चंद्रसंयोग हा परराष्ट्राबरोबर अनेक भानगडी व कटकटी निर्माण करतो, देशात घटस्फोटाची संख्या वाढते व देशात अस्वस्थता निर्माण करणाऱ्या चळवळींना उत्तेजन मिळतें व त्यामुळें व्यापारधंदा याच्यामध्यें कटकटी वाढतात

**रविचंद्रसंयोग नवम स्थानामध्यें** — या स्थानाचा धर्मशाळें, विश्वविद्यालयें, देशामधील परदेशाबरोबर जहाजानें किंवा विमानद्वारें होणारे व्यवहार याचा संबंध असल्याकारणानें शुभ दृष्टियोगानें संबंधित होणारा या स्थानामधील रवि चंद्रसंयोग त्या त्या गोष्टींना अनुकूल काळ असल्याचें ध्वनित करतो त्यापासून देशाला फायदा होतो परंतु या स्थानामधील पीडित रवि चंद्रसंयोग वरील गोष्टींसंबधानें भानगडी व त्रास दर्शवितो

**रविचंद्रसंयोग दशमस्थानामध्यें** — शुभदृष्टियोगानें संबंधित असणारा या स्थानामधील रवि चंद्रसंयोग अधिकारी वर्ग, राजकारण सरकार याना फारच अनुकूल काळ असल्याचें दर्शवितो परंतु पीडित रविचंद्रसंयोग देशामधील अधिकारीवर्ग, राजवर्ग याच्यामध्यें मृत्यु दर्शवितो व राज्यकारभारामध्यें अनेक अनिष्ट भानगडी उत्पन्न होतात व हा संयोगाचे वेळीं ग्रहण होत असेल तर हा काळ फारच अनिष्ट जाणावा सरकार पक्षाचा पराभव होतो व देशावर आपत्ति किंवा संकट कोसळतात

**रविचंद्रसंयोग एकादशस्थानामध्यें** :— लोकसभा, राज्यसभा, देशाचे पार्लमेन्ट याच्यामध्यें, शुभसबंधित असता, महत्वाच्या शुभ घटना घडतात व त्याची भरभराट होते. देशामधील म्युनिसिपालिट्या, म्युनिसिपल कौन्सिल इत्यादींचा याच स्थानानें तसेच देशामधील मोठमोठीं कॉर्पोरेशन्स याचा पण याच स्थानानें बोध केला जातो म्हणून शुभदृष्टियोगानें संबंधित झालेला योग त्याचेमध्यें भरभराट, सुस्थिति व लाभप्रद प्रगति दर्शवितो. परंतु पीडितयोग त्याचेमध्यें मृत्यु, सभासदामध्यें बखेडे, मारामाऱ्या व हानिदर्शक असतो.

**रवि-चंद्रसंयोग द्वादशस्थानामध्यें** :— हा संयोग घडत असता *लोकोपयोगी संस्था, इस्पितळे, दानसंस्था याचेमध्यें सुधारणा व उपयुक्तता वाढवितो.* परंतु पीडितयोग देशामधील तुरुंग व लोकोपयोगी संस्थामध्यें अस्वस्थता निर्माण करतो व देशामधील गुन्ह्याची संख्या वाढते व या संस्थासंबंधानें भानगडी उत्पन्न होतात.

द्वादशस्थानापैकीं लग्न, दशम, सप्तम व चतुर्थ हीं फार बलवान् व प्रमुख स्थानें असल्याकारणानें या स्थानामध्यें होणाऱ्या कोणत्याही ग्रहयोगांचीं फळें त्या त्या देशामध्यें फार तीव्रपणानें अनुभवास येतात. यानंतर धन, पंचम, अष्टम व एकादशस्थानें येतात व तृतीय, षष्ठ, नवमस्थान व व्ययस्थान हीं त्यानंतरचीं बलानें येणारीं स्थानें आहेत. धन, पंचम, अष्टम व एकादश स्थानामध्यें होणारे ग्रहयोग देशाच्या सांपत्तिक स्थितीवर विशेष परिणाम करतात व तृतीय, षष्ठ, नवम व द्वादश हीं स्थानें वाहनव्यवहार, देशामधील वृत्तपत्रें, शिक्षणसंस्था, आरोग्य व नोकर व मजूरवर्ग याचेवर परिणाम करितात व देशात गुन्ह्याचें प्रमाण वाढतें.

## (३) रविबरोबर होणाऱ्या दृष्टियोगांचीं फल

**रवि–चंद्र शुभदृष्टियोग** :–हा काळ जनता व अधिकारी या दोघांसही सुखाचा असतो उच्च व कनिष्ठ दर्जाच्या लोकांमध्यें सलोखा उत्पन्न होतो देशात शानता नांदते रवि-चंद्रामध्यें शुभयोग अर्थात् दृष्टियोग फारच शुभावह आहे.

**रवि-चंद्र अशुभ दृष्टियोगः** —रविचंद्रामधील अशुभ दृष्टि योग फार तीव्र अशुभ परिणामदर्शक आहे देशात आरोग्य राहात नाहीं व सप होण्याचा संभव असतो शुभ दृष्टियोगाच्या अगदीं विरुद्ध अशीं फळें अनुभवास येतात देशात अस्वस्थता राहते प्रजापक्ष व राजपक्ष यांचेमध्यें विरोध होतो व देशामध्यें अस्वस्थता व बेकारी वाढते व तशीच मृत्युसंख्या पण वाढते

**रविबुधयुति किंवा समक्रांतियोग** — शास्त्रीय विषय व वाङ्मय यांची प्रगति होते लेखक व ग्रंथकार यांना हा काळ चांगला असतो हा योग केन्द्रात होत असल्यास व शुभदृष्टियोगानें संबधित असता बौद्धिक प्रगतीला फारच महत्वाचा असतो बुध-रवियुति किंवा समक्रांतियोग वातावरणामध्यें फेरफार करतो वादळें उत्पन्न करतो रवि बुधयुतियोग पापदृष्टियोगानें संबधित असता देशात बरीच अस्वस्थता निर्माण करतो तसेंच वावटळी, वादळें यांनीं देशात हानि होते. बुध रवीपासून २८ अंशापेक्षा पुढें जात नसल्याकारणानें रवि-बुधामध्यें दुसरे कोणतेही दृष्टियोग घडत नाहींत

**रवि-शुक्रयुति किंवा समक्रांतियोग** — देशात शांतता, आरोग्य व महोत्सवदर्शक हा योग आहे सांपत्तिक स्थिति उत्तम असते,

अधिकारीवर्गास हा काल महत्त्वाचा जातो; देशात उद्योगधंदे सुरळित चालतात, नव्या नव्या तऱ्हेचे सास्कृतिक कार्यक्रम घडतात. देशातील कलाकौशल्यास चांगला काळ असतो काव्य, गायन, नर्तन याचे जलसे विशेष प्रमाणावर घडतात

**रवि-शुक्र अशुभ योग :—** या दोन ग्रहामध्ये अर्धकेंद्र हाच काय तो अशुभ योग होणें शक्य असतें. या अशुभ योगाबरोबरच दुसरे अशुभ योग झाल्याखेरीज त्याचीं अशुभ फलें फारशीं दृष्टोत्पत्तीस येत नाहींत. याच वेळीं शुक्र, शनि, मंगळ, हर्शल, नेपच्यून याचेबरोबर अशुभ संबंधित अर्थात अशुभ दृष्टियोगामध्यें असता स्त्रियावर अत्याचार झालेले पाहण्यास मिळतात. विवाहसंस्थेमध्ये भानगडी उत्पन्न होतात.

**रवि-मंगळ युति किंवा अशुभ योग —** देशात अस्वस्थता, भांडणें, तंटे, मारामाऱ्या व तीव्र विरोध दिसून येतात ज्या स्थानावरून हा योग होत असेल तीं स्थानें विशेष लक्षात घेतलीं पाहिजेत. देशाच्या परिस्थितीप्रमाणें इतर देशाशीं भांडणें किंवा युद्धें सुरू होणें शक्य आहे. राजघराण्यात किंवा उच्च वर्गामध्यें मृत्यु होतात. देशामध्यें अपघातानें मृत्युसंख्या बरीच झालेली पाहण्यास मिळते. अत्याचार, खून, तंटे याचें प्रमाण वाढतें अग्निप्रलयानें नाश होतो हवेत उष्णता वाढते.

**रवि मंगळ शुभयोग :—** सत्ताधीशाची सत्ता विशेष बळकट्तर होते परिस्थितीप्रमाणें सैन्य व आरमार याची प्रगति होते व देशात आरोग्य वाढतें देशामधील पोलाद व लोखंड यापासून यंत्रें, हत्यारें वगैरे सामान तयार करण्याचे कारखाने जोरानें चालतात व उद्योगधंद्यामध्यें अनेक कामगाराना काम मिळतें नवे नवे कारखाने अस्तित्वात येऊन देशात उद्योगधंद्याची चांगली वाढ होते.

**रवि-गुरु युति किंवा शुभयोग** — देशात शातता वाढून प्रगति होते व्यापार, धनोत्पादक धंदे आणि लोकोपयोगी संस्था याची भरभराट होते. अधिकारीवर्गास हा काल सुखावह असतो व्यापार, उद्योगधंदे चागले चालतात देशामधील आर्थिक स्थिति चागली असते धार्मिक चळवळी याना हा काल अनुकूल असतो व अधिकारी वर्गाकडून या कृत्याना मदत मिळते कथा, कीर्तनें, हव्यकव्य याना अनुकूल असा काळ असतो

**रवि-गुरु अशुभ योग** — व्यापार व सापत्तिक स्थिति यावर अनिष्ट परिणाम घडतो धार्मिक भाडणें उपस्थित होतात देशातील आरोग्य चागलें राहात नाहीं देशामधील न्यायालयामध्यें फिर्यादी आर्यादि याची सख्या वाढते देशामध्यें श्रीमत, उच्चपदस्थ लोकामध्ये मृत्यु विशेष प्रमाणान घडतात व उच्चपदस्थ लोकाचीं अनेक कुटिल कारस्थानें उघडकीला येतात

**रवि शनि शुभयोग** — देशातील मजूरवर्ग, नोकरवर्ग, खाणी व म्युनिसिपालिट्या याची प्रगति होते हा काळ शेती, घरें बाधणें वगैरे धद्यास चागला अनुकूल असतो व त्यामुळें नवीन नवीन सुधारणा, सवलती सरकारकडून मिळून देशात कामधंदे व्यवस्थित स्थिर धोरणानें चालतात

**रवि-शनि अशुभ किंवा युति योग** — देशातील व्यापार, मजूरवर्ग, कामकरीवर्ग याच्यामध्यें फार भानगडी उपस्थित होतात अधिकारी वर्गामध्यें असतोष उत्पन्न होतो राजवर्गात किंवा अधिकारी-वर्गात मृत्यु होतात हा काल अत्यत अनिष्ट असतो या योगामुळे देशाची प्रगति मुळींच होत नाहीं या काळामध्यें लोकसभा व

राजसभा यामध्यें विरोध उत्पन्न होतो व त्यामुळें देशामधील कायदेकानू यासंबधात भानगडी उत्पन्न होतात अधिकारी वर्गावर अविश्वासाचे ठराव येण्याची भीति असते व्यापार, उद्योगधंद्यामध्यें मंदत्व प्राप्त होतें या काळात विशेष प्रगति होत नाहीं

**रवि हर्शल शुभयोग** — अधिकारी वर्ग व राज्यसत्ता यास हा काल उत्तम जातो. हर्शलच्या अमलाखालीं असणाऱ्या गोष्टींची प्रगति होते. देशामध्यें लोकोपयोगी सुधारणा घडून येतात हा काळ देशाचे प्रगतीला अत्यंत महत्त्वाचा असतो. देशात नवीन नवीन उपयुक्त सुधारणा होऊन देशामधील उत्पादनशक्ति वाढते. देशामधील तज्ञ व संशोधक लोक याना राजाश्रय मिळून त्याची प्रगति होते. त्याचे हातून नवे नवे शोध लागतात.

**रवि हर्शल अशुभ योग** :— देशात संप आणि अस्वस्थता उत्पन्न होतात. कायदे-कौंसिलात तीव्र मतभेद होतात. देशाचे हितकर्ते यांच्यावर संकटें ओढवतात देशामध्यें या कालामध्यें प्रगतीला विरोध करणारे कायदेकानू अस्तित्वांत येण्याची भीति असते राज्यसूत्रें धारण करणारावर अनेक आकस्मिक संकटें येतात व शास्त्रज्ञाचे मृत्यु घडतात

**रवि नेपच्यून शुभयोग** :— देशात स्वस्थता व शांतता नांदते अधिकारारूढ लोक व प्रजापक्ष यामध्यें सलोखा राहतो सरकारपक्षास हा काळ उत्तम जातो कलाकौशल्य, सिनेमा इन्डस्ट्री, कृत्रिम पदार्थ तयार करण्याचे कारखाने अस्तित्वात येतात हा काल देशाला भरभराट सुचविणारा असा अनुकूल असतो.

**रवि नेपच्यून अशुभ योग** :— अधिकारारूढ, राजघराणे किंवा प्रसिद्ध व्यक्ति यांवर संकटें येतात देशामध्यें अस्वस्थता होते

सामाजिक वातावरणामुळे फार गाजावाजा होतो. या कालामध्यें अनेक खोटी औषधें निर्माण करणारे, भेळसेळ करणारे, ढोंगधत्तुरे करून लुबाडणारे, धर्माच्या नावावर अनेक कुकर्मे करणारे लोक व सार्वजनिक हिताचे नावाखाली स्वतःची तुनडी भरणारे लोक याचेपासून जनता त्रस्त झालेली पाहाण्यास मिळते. या काळात अनेक समाजविघातक निंद्य कृत्यें झालेलीं पाहण्यास मिळतात.

## २. चंद्र

**चंद्र प्रथम स्थानांत** :— प्रजापक्षाच्या संबंधानें आणि चंद्र ज्याचा कारक आहे अशा सर्व गोष्टींची प्रगति होते. आरोग्य व शांतता हीं दिसू लागतात. पीकपाणी उत्तम असतें. चंद्र जर पीडित असेल तर ज्या ग्रहाकडून पीडित असेल त्या ग्रहाच्या गुणधर्माप्रमाणें संकटें येतात. चंद्र हा प्रजापक्ष, आमजनता याचा कारक असल्याकारणानें या स्थानामध्यें शुभ दृष्टियोगानें संबंधित असता जनता सुखी असते व देशामध्यें रोगराई विशेष प्रमाणात होत नाहीं व मृत्युसंख्या कमी असते.

**चंद्र धनस्थानांत** :— सरकारी वसूल, देशातील धनोत्पादक धंदे, व्यापार व शेती याची सुस्थिति असते. नवीन धंदे उभारले जातात. या स्थानामध्यें चंद्र बलवान् असून शुभदृष्टियोगानें संबंधित असता देशात सुबत्ता नांदते व नवीन कर येत नाहींत. नाण्याची स्थिति चांगली असते.

**चंद्र तृतीय स्थानांत** :— रेल्वे, पोस्ट ऑफिसें आणि प्रवास साधनें यांना अनुकूल असा हा काळ असतो. शिक्षणविषयक चळवळी

यशस्वी होतात रेल्वेतील कामकरी लोक याची स्थिति सुधारते चद्र पीडित असल्यास नदीनाले, समुद्र यामध्ये अपघात होतात या स्थानामध्ये चद्र शुभदृष्टियोगाने संबधित असता देशामधील जलवाहतुकीचे मार्ग किंवा देशाचे समुद्रकिनाऱ्यावरून होणारा वाहनाचा व्यवहार भरभराटीला येतो व तो कार्यक्षम राखण्याचा प्रयत्न केला जातो

**चंद्र चतुर्थ स्थानांत** :— देशातील पिकें, उत्पन्ने, उद्भिज्ज धातूच्या खाणी, पाटबधारे, कालवे यासबधानें स्थिति उत्तम राहाते देशातील प्रजापक्ष बलवान् होतो हा काल स्वस्थतेचा असतो चद्र या स्थानात पीडित असल्यास देशात अस्वस्थता दर्शवितो व खाणी, इमारती, विहिरी, तलाव याचेमध्ये अपघात होतात या स्थानामध्ये ज्या ज्या स्थळी चद्र वर्षकुडलीमध्ये शुभदृष्टियोगाने सबधित येतो तेथे चतुर्थ स्थानद्योतक उद्योगधदे भरभराटीला येतात व जनतेच्या सुखसोईकडे विशेष प्राधान्याने लक्ष दिले जातें

**चंद्र पंचम स्थानांत** — विद्याखातें, विद्यार्थीवर्ग, शाळा, नाटकगृहें व विहारस्थानें याची प्रगति होते जननसख्या वरीच वाढते चंद्र पीडित असल्यास सामाजिक किंवा शिक्षणविषयक प्रश्नामुळे देशात तीव्र मनभेद होतो व लहान मुलाची मृत्युसख्या वाढते चद्र पचमामध्ये मगळ-हर्शलबरोबर अशुभ दृष्टियोगानें सबधित असता मुलामुलींचे सहलीच्या फेरफटक्यामध्ये अपघात घडतात

**चंद्र षष्ठ स्थानांत** :— चद्र बलवान् असल्यास मजूरवर्ग आणि कारखाने यासबधानें उपयुक्त गोष्टी घडून येतात चद्र पीडित असल्यास

मजूरवर्गांत मप, असंतोष, बेरोजगारी आणि संकटे येतात महागाई आणि रोगराई याचा प्रादुर्भाव देशात होतो. देशामधील दूधदुभर्ने देणाऱ्या जनावरामध्यें रोगराई पसरते. या स्थानामध्यें चंद्र अशुभ दृष्टियोगानें पीडित असता आरमारी दळ यामध्यें असंतोष पसरतो

**चंद्र सप्तम स्थानांत** —चंद्र बलवान् असल्यास परराष्ट्राशीं होणाऱ्या व्यवहारात फायदे होतात देशातील पक्षापक्षातील वैमनस्यें अगर भाडणें कमी होतात प्रजेच्या हिताचे प्रश्न प्रामुख्यानें पुढें येतात. देशात एकोपा होतो आनंददर्शक उत्सव आणि परिस्थितीप्रमाणें लग्नकार्यांची संख्या फार वाढते. या स्थानामधील अशुभदृष्टियोगानें पीडित चंद्र परदेशामधरीं कटकटी व भानगडी चव्हाट्यावर येतात लोकामध्यें असंतोष आणि अस्वस्थता उत्पन्न होते.

**चंद्र अष्टम स्थानांत** :— बलवान् असल्यास देशातील वसूल वाढतो परंतु पीडित असल्यास मुलें, स्त्रिया आणि सामान्य लोक याची मृत्युसंख्या वाढते रोगराई होते चंद्र अत्यंत पीडित असेल तर खून-दरवडे, मारामाऱ्या व भयंकर रोगाचा फैलाव होतो

**चंद्र नवम स्थानांत** — बलवान् चंद्र असल्यास परराष्ट्रीय व्यापार, प्रवास आणि धार्मिक चळवळी याची वाढ होते चंद्र पीडित असल्यास प्रवासी व खलाशी याच्यावर जिवावरचे प्रसंग येतात जहाजें व गलबतें बुडतात या स्थानामधील शुभसंबंधित चंद्र मजूरलोक याचे संबंधात कायद्याचे हितकर निवाडे आणतो या स्थानामधील अशुभ-दृष्टियोगानें संबंधित असलेला चंद्र परदेशाबरोबरील व्यापारामध्यें अडचणी उत्पन्न करतो.

**चंद्र दशम स्थानांत** —चद्र बलवान् असल्यास राजसत्तेस सुखावह असतो. अधिकारीवर्ग प्रजेला हितावह अशा गोष्टी करतात. देशात स्वस्थता असते ; सार्वजनिक उत्सव होतात. चद्र पीडित असल्यास देशाचा व्यापार मदावतो व सार्वजनिक असतोषाची चिन्हें दिसू लागतात.

**चंद्र लाभस्थानांत** —कायदे-कौन्सिलात प्रजेच्या हिताचे कायदे केले जातात व लोकपक्षाच्या पुढाऱ्याचें वजन वाढतें. अधिकारीवर्ग व प्रजा याच्यामध्यें सलोखा राहातो. चद्र पीडित असल्यास प्रजापक्षात तटे होतात; म्युनिसिपालिट्यात भाडणें होऊन त्याच्या कामासबधानें गाजावाजा होतो; परदेशामधील मैत्रीमध्यें विघ्नें उत्पन्न होतात. परदेशामधून येणाऱ्या मदतीचे साह्यात वखेडे माजवतात व परदेशामधून मित्र असणारेच लोक विरोध व अडचणी निर्माण करतात.

**चंद्र व्ययस्थानांत**:— चद्र बलवान् असल्यास धर्मार्थ व लोकोपयोगी सस्थास लोकाकडून आश्रय मिळतो. नवीन धर्मार्थ सस्था निर्माण केल्या जातात अत्यत पीडित असल्यास अत्याचार व मारामाऱ्या होतात गुप्त शत्रूचा सुळसुळाट होतो देशद्रोही कारवाया वाढतात व मरहट्टीमध्यात भानगडी उत्पन्न होतात. तुरुग, मैदखाने, रुग्णालयें, हॉस्पिटल्स, वेड्याचीं इस्पितळें, अनाथाश्रम वगैरेमध्यें या स्थानामधील अशुभ दृष्टियोगानें सबधित चद्र अनेक प्रकारच्या अनिष्ट गोष्टींचा बोज करतो.

## चंद्रावरोपर होणाऱ्या दृष्टियोगांचीं फलें

**चंद्र-बुधयुति किंवा शुभयोग.**— वाङ्मय आणि शिक्षणविषयक प्रश्न पुढें येतात आणि त्यासबधानें विशेष प्रगति झाल्याचें

दिसून येतें. शास्त्रीय शोध, वाङ्मयप्रगति, व्यापारी तहनामे आणि वक्त्यांचीं वक्तृत्वपूर्ण भाषणें होतात. देशामध्यें चांगलें वाङ्मय निर्माण होतें. वर्तमानपत्रें, मासिकें ह्यांना हा काल फारच अनुकूल असतो. शीघ्र व जलप्रवासाच्या साधनांची वृद्धि होते. देशामधील पत्रव्यवहार व दळणवळण वाढतें. तार, टेलिफोन-दूरध्वनिक्षेपणखातें यांना प्रगतिपर काल असतो.

**चंद्र-बुध अशुभयोग :—** कायदेकौन्सिलांत व समाजांत जोराचे वादविवाद, वृत्तपत्रांमध्यें टीका आणि वाङ्मयप्रतिबंधक गोष्टी घडून येतात. कोर्टांतून अब्रुनुकसानीचे खटले आणि परिस्थितीप्रमाणें व्यापारी तहनाम्यांसंबंधानें प्रश्न उपस्थित होतात. शिक्षण, शाळा व अनाथगृहें ह्यांना हा काळ चांगला नाहीं. दळणवळण, तार, पोष्ट यांना अनेक अडचणींच्या समस्येबरोबर तोंड द्यावें लागतें.

**चंद्र शुक्र युति व शुभयोग :—** देशामध्यें आनंदोत्सव होतात; नाटकगृहें व लोकांच्या करमणुकीचीं स्थानें यांची भरभराट होते. सांपत्तिक स्थिति, आरोग्य व उद्योगधंदे ह्यांची वाढ होते. हा सौख्यवर्धक-काळ असतो. या काळामध्यें देशांत पुष्कळ विवाह होतात. देशांतील उद्योग-धंदे, पीकपाणी यांना अनुकूल काळ असतो. परदेशाबरोबरील व्यापार-धंद्याला अनुकूल अशी परिस्थिति असते व यामुळें परदेशाबरोबरील संबंधापासून देशाला लाभ होतो.

**चंद्र-शुक्र अशुभयोग :—** देशांतील साम्पत्तिक स्थिति समाधानकारक राहात नाहीं. वसूल, कर व परराष्ट्रीय व्यापारसंबंधानें चर्चा सुरू होते. देशांत आरोग्य कमी होतें. स्त्रिया व मुलें यांना हा काळ

अनिष्ट असतो. नाटकगृहें व करमणुकीचीं साधनें याना मदी येते. विवाह-संस्थेला हा काळ अनकूल नसतो. देशात खर्चाचें प्रमाण वाढतें व गंगाजळीमध्यें येणारी वसुली घटते. परदेशाबरोबरील व्यापार चांगला चालत नाहीं व तो लाभप्रद नसतो

**चंद्र-मंगळ शुभयोग :—** देशामध्यें उत्साहवर्धक चळवळी सुरू होतात व आरोग्य वाढतें पोलिस सरक्षण वाढतें, सैन्य, आरमार याची स्थिति चांगली राहाते. या काळामध्यें नवीन नवीन जहाजें बांधलीं जातात किंवा त्याना पाण्यात लोटण्याचे समारंभ होतात. सैन्य, आरमार, इत्यादिकांच्या कवायती होतात. देशामध्यें उद्योगधंदे याची प्रगति होते. बेरोजगारी कमी होते व उत्साहपूर्वक वातावरण प्रत्येक उद्योगधंद्यामध्यें पाहण्यास मिळते.

**चंद्र-मंगळ युति किंवा अशुभयोग :—** भाडण-तंटे, मारामाऱ्या, दंगे, संप, खून, रक्तपात, अपघात आणि अग्निप्रलय होतात रोगराई वाढते व असंतोष पसरतो. सैन्यातील किंवा आरमारातील अधिकारी मृत्यु पावतात. परराष्ट्रीय गुंतागुंतीचे प्रश्न उद्भवतात; संक्रमणकाळच्या कुंडलीमध्यें केन्द्रामध्यें मंगळ असून त्याचेबरोबर जर चंद्र अशुभ दृष्टियोग करीत असेल तर त्याचें फळ फारच तीव्र अशुभ अनुभवाला येतें व देशामध्ये भयंकर अस्वस्थता झालेली पाहण्यास मिळते

**चंद्र-गुरु युति किंवा शुभयोग :—** जमीनमहसूल, कर, देशातील व्यापार, पिकं यानबाबतीत सुस्थिति असते धार्मिक किंवा लोकोपयोगी चळवळी होतात देशात शांतता व आरोग्य हीं वाढतात देशामधील उद्योगधंदे जोरानें चालतात, परदेशाबरोबरील व्यापारापासून धारक वाढते बॅन्का व नाणेबाजार सुस्थितीमध्यें असतो. जिकडे तिकडे

एक प्रकारची भरभराट व सुस्थिति पाहण्यास मिळते. देशातें ग्रीकपाणी, हवा, चांगली असते व सुवार्तेचे वारे वाहतात

**चंद्र गुरु अशुभयोग :—** या अशुभ योगामुळें फारशीं तीव्र फळें अनुभवास येत नाहींत देशात आरोग्य चांगलें राहात नाहीं व धार्मिक व धर्मादाय चालविलेल्या संस्था यांची स्थिति चांगली राहात नाहीं देशामधील खर्चाचें प्रमाण वाढतें व जिकडे तिकडे उधळपट्टी होते व संपत्तिस अडचणी उत्पन्न होतात धार्मिक पंथ व सांप्रदायामध्ये नसतीं भानगडी उत्पन्न होतात दानसंस्था, रुग्णालये यांत उधळपट्टी झालेली पाहाण्यास मिळते

**चंद्र शनि शुभयोग :—** देशातील राज्यकारभार सुरळीत चालतो अधिकारीवर्गास प्रजापक्षाची सहानुभूति असते म्युनिसिपालिट्या किंवा अधिकारीवर्ग यांमधूनें नवा कायदा होतो किंवा जुन्या कायद्यात सुधारणा होते पिकें, खाणी, मजूरवर्ग व इमारती बांधणें यांमधूनें सुस्थिति असते अधिकारी वर्ग सरकारी पैशाची हितावह अशी काटकसर अमलात आणण्याचा प्रयत्न करतात देशामधील उद्योगधंद्यामध्ये स्थिरता प्राप्त होऊन ते प्रगतीपर गेलेले दिसतात जनहितामधूनें चांगलीं दीर्घकाळ टिकणारीं कामें किंवा सुधारणा अमलात येतात

**चंद्र-शनि-युति किंवा अशुभयोग —** देशातील मजूरवर्ग, कामकरीवर्ग व नोकरीवर अवलंबून असणारे लोक ह्यांना हा काल अनिष्ट असतो, पावसाळ्याचे दिवसात या काळात पुष्कळ पाऊस पडून पिकें बुडतात, दुष्काळ पडून व रोगराईमुळें पुष्कळच प्राणहानी होते कौंसिलातील लोकनियुक्त सभासदांपैकीं कोणीतरी मृत्यु पावतो व

व्यापारधंदा संपुष्टांत येतो. असंतोष व रोगराई हीं वाढतात. हा काळ जनहिताच्या दृष्टीनें फारच अशुभ असतो. चांगल्या जनतावादी नेत्यांचे मृत्यु घडतात. देशामध्ये बेकारी वाढते. देशांतील उद्योगधंदे चांगले चालत नाहींत. त्यामुळें व्यापारामध्ये मंदीचें वातावरण आलेलें पाहण्यास मिळतें.

**चंद्र-हर्शल शुभ दृष्टियोग :—** देशातील राज्यकारभार सुरळीत रीतीनें चालतो. कायद्यामध्यें सुधारणा होतात. मंत्रीमंडळामध्ये महत्त्वाची व चांगली खादेपालट होते. या काळामध्यें अनेक महत्त्वाच्या सुधारणा अंमलांत आणल्या जातात. देशामध्यें नवीन नवीन शास्त्रीय शोध लागतात. देशामधील म्युनिसिपालिट्यामध्ये सुधारणा होऊन अनेक जनतेच्या सुखाचीं नवीन नवीन धोरणें अंमलांत येतात.

**चंद्र-हर्शल युतियोग किंवा अशुभयोग :—** कायदे-कौन्सिलें, म्युनिसिपालिट्या व राज्यकारभार याना हा काळ अस्वस्थतेचा असतो. प्रजेला अप्रिय वाटणाऱ्या गोष्टी घडतात व असंतोष उत्पन्न होतो. देशामध्यें अस्वस्थता उत्पन्न होते व यांत्रिक मोडतोड यामुळें अपघात घडतात. विद्युत उत्पन्न करणाऱ्या कारखान्यामध्यें मोडतोड होऊन विद्युत्‌निर्माणकार्य बरोबर घडत नाहीं.

**चंद्र-नेपच्यून शुभयोग :—** प्रजापक्ष व सामान्य लोक यांना हा काळ चांगला असतो. देशांतील धर्मादाय संस्थांची भरभराट होते व त्यांचा उपयोग चांगल्या रीतीनें केला जातो. या काळामध्ये जलप्रवास करण्याचे साधनामध्ये अनेक उपयुक्त सोई करण्यात येतात. जलप्रवासाचीं साधनें बांधणें, नवीन जहाजें पाण्यांत सोडणें, खाड्या, नद्या वगैरे प्रवासाला उपयुक्त करण्याच्या कार्याकडे लक्ष दिलें जातें.

**चंद्र-नेपच्यून अशुभयोग :—** देशात गुप्त व लैंगिक नितीबाह्य घाणेरडे अत्याचार होतात. तीव्र मतभेद, पक्षातील दुही व असतोष वाढतात. पचमस्तभीयाच्या कारवाया वाढतात व त्यामुळें राजकारणामध्यें भानगडी उत्पन्न होतात. अनेक फसवाफसवीचे व्यवहार होतात, स्मगलिंग किंवा चोरून माल ने-आण करण्याचे धंदे व त्यासबधात गुन्हाचें प्रमाण वाढतें.

## ( ३ ) बुध

**बुध प्रथम स्थानांत :—** वाङ्मय व शिक्षण याची अभिवृद्धि होते. देशात जाहीर सभा होतात. नानाविध विषयांवर वक्तृत्व व भाषणें याचा सुकाळ होतो बुधाच्या कारक धद्यासबधानें चर्चा होते. बुध जर पीडित असेल तर सार्वजनिक व राजकीय चळवळीसबधानें तीव्र मतभेद होतात अप्रुनुकसानी करणारे लेख, भाषणें, खोटे दस्तऐवज व चोऱ्या यासबधानें खटले होऊन कोर्टातील काम वाढतें. वर्तमानपत्रे, ग्रथ-प्रकाशन आणि शिक्षण याना हा काळ प्रतिकूल असतो.

**बुध धनस्थानांत :—** वाङ्मय, शिक्षण, वक्तृत्व किंवा शास्त्रीय शोध यासबधाचे धदे उर्जितावस्थेस येतात. देशाच्या साम्पत्तिक स्थिती सबधानें चर्चा सुरू होते. पोस्ट, तारखातें, रेल्वे व प्रवासाचीं साधनें याच्या सबधाने विचार सुरू होतो. बुध पीडित असेल तर साम्पत्तिक स्थितीस फार वाईट असतो. सरकारी वसूल किंवा कर यात तूट येते शेअर बाजारात नुकसानकारक घडामोडी होतात खोट्या बातम्यांनीं बँकेच्या व्यवहारात बूड येते.

**बुध तृतीय स्थानांत :—** वृत्तपत्रें, नियतकालिकें, पुस्तकें व शिक्षण याची भरभराट होते. रेल्वे, पोस्ट व तारखातें याना हा काळ

उत्तम असतो. नवीन ग्रंथ बाहेर पडतात. बुध जर पीडित असेल तर वृत्तपत्रकारांवर खटले होतात व रेल्वेवर अपघात होण्याचा संभव असतो. ट्रान्सपोर्ट सर्व्हिसमध्यें व रस्त्यामध्यें अपघातांचें प्रमाण वाढतें.

**बुध चतुर्थ स्थानांत :—** शुभदृष्ट असल्यास शेतकरी वर्ग व खाणीवर काम करणारे मजूर यांना हा काळ सुखावह असतो. नवीन सार्वजनिक किंवा सरकारी इमारती व रस्ते बांधले जातात किंवा त्यासंबंधानें कायदेकौन्सिलांत विचार होतो. बुध पीडित असेल तर मजूरवर्गांत असंतोष व बेरोजगारी यांचा फैलाव होतो. बुध मंगळाकडून पीडित असल्यास अग्निप्रलय व शनीकडून पीडित असल्यास इमारती पडून अपघात होतात; हवा चांगली राहात नाहीं व अकालीं पाऊस वगैरे पडल्यानें पिकांचें नुकसान होतें. हिम किंवा बर्फ पडून पिकांचें नुकसान होतें. वाल, वाटाणे, मूग व कापूस यांच्या पिकाला धक्का लागतो.

**बुध पंचम स्थानांत :—** विद्यार्थी वर्ग, शाळा व शिक्षण यांची स्थिति सुधारते. शिक्षणाप्रीत्यर्थ सरकार अधिक पैसा खर्च करतें. बुध पीडित असल्यास शिक्षणक्षेत्रामध्यें भांडण-तंटे उद्भवतात व विद्यार्थी वर्गामध्यें अग्निप्रलयानें व अपघातानें मृत्यु घडतात. या स्थानाचा संबंध मौज-शोख इत्यादि बरोबर असल्याकारणानें या स्थानामधील पीडित बुध सिनेमागृहें, नाटयगृहें यासंबंधांत अनिष्ट फळें दर्शवितो.

**बुध षष्ठ स्थानांत :—** या स्थानामधील शुभदृष्टियोगानें संबंधित बुध मजूरवर्ग व कामकरी वर्ग यांच्या संबंधाच्या प्रश्नाचा निकाल समाधानकारक दर्शवितो. समाजसेवेचीं कामें चांगलीं चालतात. बुध पीडित असल्यास कामकरीवर्गांत असंतोष व रोगराई पसरते. शुभदृष्टियोगानें संबंधित या स्थानामधील बुध कामगारांच्या हिताचें संरक्षण करणारे कायदे व नवे

उद्योगधंदे दर्शवितो परंतु या स्थानामधील पापदृष्टियोगानें संबंधित बुध तक्रारी, असंतोष व देशामधील लेखक व विद्वान मंडळीमध्यें आजार उत्पन्न करतो.

**बुध सप्तम स्थानांत :—** परराष्ट्रीय धोरणाकडे विशेष लक्ष वेधतें परराष्ट्रीय व्यापार, तहनामे व कायदे यासंबंधानें विचार होतो या बाबतींत रायदेकौन्सिलांत चर्चा होते बुध पीडित असल्यास वरील गोष्टीसंबंधानें भांडणें व कडाक्याचे वादविवाद होतात सप्तम स्थानाशीं संबंध असलेल्या बाबतीसंबंधानें उघड व स्पष्ट चर्चा होऊं लागते

**बुध अष्टम स्थानांत.—** बुध पीडित असल्यास ग्रंथकार, लेखक, ग्रंथप्रकाशक व शिक्षणविषयास वाहिलेले लोक यांचे मृत्यू होतात आरोग्यविषयक प्रश्नाची चर्चा होते. साथीचे रोगराई या मनावर व त्यावर उपाययोजनेसंबंधानें चर्चा होते या स्थानामध्ये शुभ दृष्टियोगानें संबंधित बुध वाङ्मय, शिक्षण प्रायमरी एज्युकेशन यांना अनकूल काल दर्शवितो

**बुध नवम स्थानांत :—** शास्त्रीय शोध, तत्त्वज्ञान, धर्म, वाङ्मय, यांची वाढ होते परराष्ट्रीय व्यापार वाढतो कायदेकौन्सिलांत महत्त्वाचीं भाषणें होतात प्रवाससाधनें व दूर देशाच्या प्रवासास जाणाऱ्यांची संख्या वाढते बुध पीडित असल्यास खलाशी व प्रवासी हे अपघातांत सापडतात न्यायकोर्टांत खटल्यांची संख्या वाढते ट्रान्सपोर्ट सर्व्हिसमध्यें भानगडी उत्पन्न होतात, शीघ्र गतीनें होणाऱ्या विमान वाहतुकीला हा काळ वाईट हवामानामुळें अनकूल नसतो व अपघाताचें भय विशेष प्रमाणांत असतें

**बुध दशम स्थानांत :—** महत्वाच्या सार्वजनिक सभा भरतात. अधिकारारूढ पक्षांतील लोकांचीं महत्त्वाचीं भाषणें होतात. बुधाच्या अंमलाखालीं असणाऱ्या गोष्टींची वाढ होते. लेखक किंवा ग्रंथकार यांचा गौरव होतो. बुध पीडित असल्यास समाजामध्यें चळवळ उत्पन्न होते. शुभदृष्टियोगानें संबंधित या स्थानामधील बुध हा व्यापार, उद्योगधंदे व शिक्षण-संस्था यांना अनुकूल काळाचा बोध करतो. देशांत उत्तम वाङ्मय निर्माण होतें.

**बुध एकादश स्थानांत :—** कायदे-कौन्सिलांत महत्त्वाचीं भाषणें होतात. कायदे-कौन्सिलाच्या कामासंबंधानें सार्वजनिक चर्चा सुरू होते. देशांतील कायद्यामध्यें फेरफार होतात. बुध पीडित असल्यास तीव्र मतभेद, अस्वस्थता आणि जहाल भाषणें होतात. या स्थानाच्या कारक गोष्टीसंबंधानें समाजांत जोराची टीका व चर्चा सुरू होते.

**बुध व्यय स्थानांत :—** धर्मादाय व सार्वजनिक संस्था, इस्पितळें, तुरुंग, वर्कहौसेस वगैरेसंबंधानें चर्चा होते; बुध पीडित असल्यास चोऱ्या, लुटालूट, खोटे दस्तऐवज वगैरे अत्याचार घडतात. परराष्ट्रीय गुप्त शत्रूपासून त्रास होतो; देशद्रोही कारवायांस ऊत येतो व सरहद्दीसंबंधानें कटकटी वाढतात व चोरटा व्यापार–स्मगलिंगचे व्यवहार जोरांत चालतात व देशाला विघातक भानगडी उत्पन्न होतात.

## बुधाबरोबर होणाऱ्या दृष्टियोगांचीं फलें

**बुध-शुक्रयुति किंवा शुभदृष्टियोग :—** देशामध्यें स्वस्थता, आरोग्य आणि सलोखा राहातो. परराष्ट्रीय दळणवळणांपासून फायदे होतात, नाटकगृहें, समाजरंजनाचीं साधनें व ललित वाङ्मय यांची प्रगति होते. हा काळ लेखकवर्गाला अनकूल असा असतो व देशांत

कलाकौशल्य व शृंगारिक विषयावर कादबऱ्या किंवा ग्रंथ-प्रकाशन पुष्कळच झालेलें आढळतें वाङ्मयाला हा काळ अनुकूल असा असतो

**बुध-शुक्र अशुभयोग :**—दुसऱ्या अशुभयोगाचा संबंध न आल्यास फारसा महत्त्वाचा नसतो बुध शुक्रामध्ये अशुभदृष्टियोग फक्त एक ४५ अंशाचा होतो व तो शनि, हर्शल, नेपच्यून किंवा मंगळानें अशुभदृष्टि संबंधित असता फारच अशुभ फलदायी असतो व तो ज्या अशुभ ग्रहानें पीडित होतो त्याप्रमाणें फलादेशाचा विचार करावा

**बुध-मंगळ शुभयोग :**—बुधाच्या कारक धंद्याची भरभराट होते वर्तमानपत्रें, ग्रंथप्रकाशक व वक्तृत्व यांना हा काळ चांगला असतो शास्त्रीय विषयाची वृद्धि होते यांत्रिक कारखान्याची भरभराट होते ट्रान्सपोर्ट सर्व्हिसमध्ये नवीन नवीन साधनें उपलब्ध होतात नवे रस्ते बांधले जातात

**बुध-मंगळ अशुभयोग :**—असंतोष, अस्वस्थता, तंटे, भांडणें, तीव्र मतभेद व खडाजंगीचे वादविवाद होतात वृत्तपत्रकर्त्यांवर बेअब्रू केल्याबद्दल फिर्यादी होतात राजकीय वातावरण साफ बदलून जातें चोऱ्या, सोनेरी टोळ्यांचीं कृत्यें, संप व मारामाऱ्या यांना ऊत येतो हा काळ सार्वत्रिक असंतोषाचा आहे ट्रान्सपोर्ट सर्व्हिसमध्ये अपघाताची संख्या वाढते पोस्ट, टेलिफोन, टलिग्राम वगैरे खात्यामध्ये गडबड वाढते व कामकाज बरोबर होत नाहीं, रेल्वेमध्ये व रस्त्यामध्ये अपघाताची संख्या वाढते देशामधील अत्याचार व चोऱ्यांचें प्रमाण वाढतें

**बुध-गुरु युति किंवा शुभयोग :**—देशातील व्यापार, उद्योग व धंदा यांच्या भरभराटीचा हा काळ असतो धार्मिक व सामाजिक बाबतींत श्रेयस्कर चळवळी होतात वाङ्मयाची वृद्धि होते

देशामध्यें शांतता, आरोग्य व स्वस्थता हीं वाढतात. हा काळ दळणवळणाचे साधनास फारच अनुकूल असा असतो व पोस्ट, टेलिफोन, परदेशाबरोबरील व्यवहार जोरानें चालतात व ते लाभप्रद असतात.

**बुध-गुरु अशुभयोग** :—समाजसुधारक व जुने मतवादी यांचे वादविवाद होतात. धार्मिक व सामाजिक किंवा वाङ्मयिक प्रगतीस हा काळ प्रतिकूल असतो व त्यामध्यें मतभेद उत्पन्न होऊन तेढ वाढते; शिक्षणाचे प्रगतीमध्ये भानगडी किंवा मतभेद उत्पन्न होऊन नानाप्रकारच्या अडचणी उत्पन्न होतात. वेळेवर ह्या कार्याला सापत्तिक मदत मिळत नाहीं.

**बुध-शनि शुभयोग** :—रेल्वे, म्युनिसिपालिट्या, मजूर, कामकरी कारकुनी पेशाची मंडळी वगैरे लोकांस हा काळ अनुकूल असतो. बुधाच्या कारक गोष्टी या कालात नियंत्रित होतात. मजूर संघटनासंबंधानें चांगले कायदेकानू स्वीकारले जातात व नोकरवर्गाचा पेशा सुधारण्याचा प्रयत्न केला जातो.

**बुध-शनि अशुभयोग** :—रेल्वे व म्युनिसिपालिट्यांतील लोक, मजूर लोक वगैरेमध्ये असंतोष पसरतो व संप होतात. ग्रंथप्रकाशन व शिक्षण या बाबतीस हा काळ अनिष्ट असतो. चोऱ्या, फसवेगिरी, अत्याच्यार, अस्वस्थता, वेड लागणें, यासारख्या गोष्टी फार घटतात. हा काळ शिक्षणसंस्था, वृत्तपत्रकें, मासिकें यांना चांगला नसतो. चांगल्या लेखकाचे मृत्यु घडतात. वाङ्मय प्रकाशन थानें व त्यात विघ्नें उत्पन्न होतात.

**बुध-हर्शल शुभयोग** :—अधिकारी वर्ग, कायदे-कौन्सिलें, शास्त्रीय शोध आणि वाङ्मयवृद्ध्यर्थ चळवळी यांची भरभराट होते. रेल्वेचे काम सुव्यवस्थित चालतें. आकाशयानाची वाढ होते. राजकीयविषयक

चळवळी व सभा होतात हा काळ प्रगतिपर असतो देशामध्यें नवे नवे शोध लागतात व नवे नवे रेल्वे रस्ते बांधले जातात, वाहतुकीचीं साधनें वाढविलीं जातात चांगल्या शास्त्रीय ग्रंथांचें प्रकाशन होतें विद्युत् उत्पादनाला व त्यामधील यंत्र निर्माण करण्यास व संशोधन करण्यास हा काळ लाभप्रद ठरतो

**बुध-हर्शेल अशुभयोग** —देशांत असंतोष, चळवळी, अपघात, संप व अत्याचार होतात वाङ्मयाच्या प्रगतीस हा काळ प्रतिकूल असतो या काळामध्ये रेल्वे अपघात, रस्त्यामधील अपघातांची संख्या वाढते मार्गेफिरू लोकांच्या चळवळींना ऊत येतो व देशांत विरोधी वातावरण उत्पन्न होतें

**बुध नेपच्यून शुभयोग** — लेखन व्यवसाय, वक्तृत्व, ग्रंथ प्रकाशन आणि ललित वाङ्मय यांची प्रगति होते गूढशास्त्रातील प्रमेयांचा शोध लागतो अध्यात्मविचाराची वाढ होते गायनवादन, सिनेमा इंडस्ट्रीला अनुकूल काळ असतो व चांगल्या भक्तिरस फिल्म् बाहेर पडतात व त्यामुळें जनतेला चांगला भक्तिरसप्राधान्य आदर्श मिळतो

**बुध-नेपच्यून अशुभयोग** — बेअब्रूचे खटले, अत्याचार, विषप्रयोग आणि गुप्त कारस्थानें यासंबंधानें गोष्टी घडून येतात गुप्त हेरांचीं कृत्यें आणि आश्चर्यकारक रीतीनें फसवेगिरी केल्याचीं कृत्यें उघडकीस येतात या काळामध्यें अत्यंत अश्लील वाङ्मय बाहेर पडतें, अनाचार व दुष्कृत्य यांना ऊत येतो शृंगार व अश्लीलता व व्यसनीपणाला उत्तेजन मिळणारें वाङ्मय प्रसिद्ध झालेलें पाहण्यास मिळतें या काळामध्यें अंगावर शहारे आणणारे अत्याचार व फसवेगिरीचे गुन्हे घडतात

## (४) शुक्र

**शुक्र प्रथम स्थानांत :**—देशामध्यें स्वस्थता, शांतता, आनंदोत्सव आणि महोत्सव होतात समाजरंजनाच्या साधनाची वृद्धि होते पीडित असल्यास पीडा करणाऱ्या ग्रहाच्या गुणधर्माप्रमाणें त्रास उत्पन्न होतात बलवान शुभ संबंधित लग्नामध्यें उदय पावणारा शुक्र देशामध्यें सांपत्तिक सुस्थिति ठेवण्यास मदत करतो उद्योगधंदे-व्यापार याना अनुकूल काळ असतो व हवा चांगली असते हा काळ आरोग्यदायक असतो

**शुक्र धन स्थानांत** —उद्योगधंदे, बॅंका, व्यापार, सरकारी वसूल, कर याची स्थिति समाधानकारक असते देशाची साम्पत्तिक स्थिति उत्तम राहाते आणि नवीन धनोत्पादक धंदे उभारले जातात पीडित असल्यास सम्पत्तीचा दुरुपयोग केला जातो, व्यापारधंद्यात बूड येते व कर बसविले जातात स्टॉक एक्स्चेंजमध्यें मोठमोठाले चढउतार झाल्याकारणानें अनेकांना नुकसान पोहोंचतें नाण्याची उधळपट्टी वाढते. पैशाचे व्यवहारामध्यें फसवाफसवीने साम्पत्तिक हानी होते साम्पत्तिक अडचणी वाढतात

**शुक्र तृतीय स्थानांत :**—रेल्वे, पोस्ट व तारखातं याची स्थिति समाधानकारक असते ललित वाङ्मय, काव्य आणि वाङ्मयविषयक नवीन ग्रंथ बाहेर पडतात शिक्षणाचा प्रसार होतो परराष्ट्रांशीं मित्रत्वाचे तह होतात परंतु या स्थानामध्यें अशुभदृष्टियोगानें संबंधित शुक्र चांगले नट, ललितवाङ्मयाचे लेखक, ग्रंथकार याचे मृत्यु दर्शवितो तृतीय स्थानामध्य मंगळानें किंवा नेपच्यूननें अशुभसंबंधित शुक्र रेल्वेप्रवास करणाऱ्या स्त्रियांच्यावर अत्याचार दर्शवितो

**शुक्र चतुर्थ स्थानांत :—** देशातील शेतकी, पिके व तांबें, चांदि किंवा रत्नांच्या खाणी, इमारती बांधणं वगैरेची सुस्थिति असते प्रजा, मजूरवर्ग, शेतकरीवर्ग सुखी होतात देशात शांतता आणि आरोग्य हीं वाढतात या स्थानामधील नेपच्यून शनि किंवा चंद्राबरोबर अशुभ दृष्टियोगानें संबंधित असलेला शुक्र पुष्कळ पाऊस दर्शवितो व पूर आल्याने तो नाशकारक ठरतो

**शुक्र पंचम स्थानांत :—** देशातील नाटकगृहें व मनोरंजनाचीं ठिकाणं यांची भरभराट होते देशात शर्यती, सट्टे व जुगार वाढतात देशातील जननसंख्या, गायन, नर्तन, शाळागृहें व विद्यार्थी यांची संख्या वाढते या स्थानात शुक्र पीडित असल्यास वर दिलेल्या गोष्टींची स्थिति चांगली असत नाहीं मुलींची मृत्युसंख्या फार वाढते व शेअर बाजारावर अनिष्ट परिणाम होतो या स्थानामधील अशुभदृष्टियोगानें संबंधित शुक्र अनाचार वाढवितो स्त्रियांचें अपहरण, बलात्कार, घटस्फोट व विवाहसंस्थेला विध्वंसक कृत्यांची वाढ झालेली पाहण्यास मिळते हा काळ तरुण स्त्रिया लहान शाळकरी मुलें व मुली यांना चांगला नसतो

**शुक्र षष्ठ स्थानांत :—** शुक्र दृष्ट व बलवान असल्यास मजूर वर्ग, खालच्या दर्जाचे लोक आणि नोकरी पेशाचे लोक यामध्ये शांतता व संतोषवृत्ति राहते रोगराई वगैरे नसते देशातील कारखाने सुरळीत रीतीनें चालतात सैन्य व आरमार यांची स्थिति समाधानकारक असते शुक्र पीडित असल्यास रोगराई वाढते या स्थानामधील पीडित शुक्र देशामधील सैन्य, नाविक दळ, आरमार यांना लागणारें सामान वगैरेवर भरमसाट खर्च वाढवितो व देशामध्ये उद्योगधंदे मंद चालतात व बेकारी वाढते, व अन्न-वस्त्राचा तुटवडा भासतो

**शुक्र सप्तम स्थानांत**—परराष्ट्रांशीं दळणवळण सुरू करण्यास हा काळ फायदेशीर असतो. व्यापारी तहनामे, शर्ती व करार केले जातात. देशात लग्नकार्यांची संख्या वाढते. शुक्र पीडित असल्यास देशातील वरील सर्व गोष्टींना हा काळ अनिष्ट असतो. परराष्ट्रीय कलागति उत्पन्न होतात. सप्तम स्थानात शुभ दृष्ट व बलवान शुक्र असल्यास देशामध्ये शांतता व सुस्थिति असते. या स्थानामधील पीडित शुक्र स्त्रियांच्या अपहरणाच्या व त्यांचेसंबंधीं झालेल्या अत्याचार, इत्यादीमुळें अस्वस्थता उत्पन्न करतो.

**शुक्र अष्टम स्थानांत :**— बलवान शुक्र असल्यास परराष्ट्रीय व्यापारापासून फायदा होतो. पीडित असल्यास देशातील नट, गवई, चितारी, स्त्रिया व श्रीमंत लोक मृत्यु पावतात. हा काळ साम्पत्तिक दृष्टीनें पण चांगला नसतो. देशामध्यें घटस्फोटाची संख्या वाढते. स्त्रियावर अत्याचार झाल्याकारणानें देशामध्यें खळबळ उत्पन्न होते.

**शुक्र नवम स्थानांत :**— परराष्ट्रीय व्यापार, डॉक यार्डस्, न्याय-कोर्टें, धार्मिक संस्था आणि नवम स्थानाच्या द्योतक गोष्टींची प्रगति होते. अत्यंत पीडित असल्यास परदेशी होणारा व्यापार किफायतशीर होत नाही व आयात व निर्यात होणाऱ्या मालावर जकात वाढते किंवा अनिष्ट बंधनें येतात. या स्थानामधील शुभसंबंधित शुक्र देशात मौजे-करता किंवा शोधाकरता येणाऱ्या टुरिस्टामध्ये वृद्धि करतो व परदेशां-मधील दळणवळणास मदत करतो.

**शुक्र दशम स्थानांत :**— राजा, राजपुरुष व अधिकारी वर्ग याना हा काळ सुखावह असतो. देशात आनंदोत्सव होतात, गायक,

चित्रकार व कवि याना राजाश्रय मिळतो. देशात शातता नादते अन्यत पीडित असल्यास देशातील साम्पत्तिक स्थिति, वसूल व कर यामध्ये वृद्ध येने व सापत्तिक स्थिति बिघडते. सरकारी नोकर, चाकर, याचें वेतन यामधील वाढत्या खर्चामध्ये चर्चा उत्पन्न होते.

**शुक्र एकादश स्थानांत**:–फायदेकान्सिलातील कामास हा काळ फार उत्तम असतो. पक्षभेद नाहीसा होऊन काम सुरळीत चालते महत्वाचे ठराव पास होतात. समाजाची स्थिति समाधानकारक असते. देशामधील *उद्योगधंदे याना अनकूळ काल असतो देशाची आवक* वाढते व बेकारी कमी होते मित्रराष्ट्राकडून लाभ घडतात

**शुक्र व्यय स्थानांत**:–धर्मादाय सस्था, इस्पितळे व समाज सेवा करणाऱ्या मस्था याची भरभराट होते परराष्ट्राशीं फायदेशीर परन्तु गुप्त करार केले जातात शुक्र पीडित असल्यास सोनेरी टोळ्यांचीं कृत्ये व गुप्ताच्या अमलावारीं असलेल्या लोकांसबधाने अनिष्ट परिणाम घडून येतात. देशामध्य चोरटा माल आणण्याची आवक वाढते

**शुक्राबरोबर होणाऱ्या दृष्टियोगाचीं फलें, शुक्र–मंगळ शुभयोग**:–उत्सव, आनद, लग्नकार्ये व जननसख्या याची वाढ होते उद्योगधदे भरभराटतात परराष्ट्राशीं व्यापार वाढतो देशामधील पैदास वाढते नवेनवे कारखाने, हुन्नरशाळा किंवा कलाकौशल्याचीं साधनें तयार करणारे उद्योगधदे भरभराटीला येतात

**शुक्र–मंगळ युति किंवा अशुभयोग**.–साम्पत्तिक स्थिति समाधानकारक नसते अनीतीचीं कृत्ये व घटस्फोटाची सख्या वाढते सपत्तीचा व्यय योग्य कारणाकडे होत नाहीं नवे कर येतात. परदेशाच्या देण्या-घेण्याच्या प्रश्नामध्यें अडचणी येतात.

**शुक्र-गुरु युति किंवा शुभयोग :**– देशामध्यें उद्योगधदे, व्यापार, शातता व सौख्यसाधने याची वृद्धि होते. सामाजिक व धार्मिक सस्था याची स्थिति उत्तम रहाते. देशातील पक्षभेदाची तीव्रता कमी होते व स्त्रियाची उन्नति व स्थिति सुधारण्याकरता जोराचे प्रयत्न होतात.

**शुक्र-गुरु अशुभयोग :**– मत्तीचा विनियोग चागला केला जात नाहीं. कर वाढविले जातात. लोकोपयोगी सस्था पैशाच्या अडचणींत येतात. देशात चैन वाढते व सर्वत्र उधळपट्टी झाल्याकारणानें देशामध्यें अस्वस्थता प्राप्त होते पैशाच्या अडचणीमुळें चागल्या कामामध्यें विघ्नें येतात.

**शुक्र-शनि शुभयोग :**– सापत्तिक स्थिति, शेअर्स, सरकारी वसूल व उद्योगधदे याची स्थिति उत्तम असते. देशातील सपत्ति वाढते. देशामध्ये सापत्तिक स्थिरता उत्पन्न होते व चागल्या उत्पादक उद्योग-धद्यामध्यें देशामधील नाणें रोकलें जातें सर्व वस्तूच्या किंमती स्थिर राहातात.

**शुक्र-शनि युति किंवा अशुभयोग :**– उद्योगधदे व सपत्ति याची स्थिति अनिष्ट होते. देशात अनीतिकारक गोष्टी घडतात. स्त्रीवर्गावर या योगाचा अनिष्ट परिणाम होतो स्त्रियाचे मृत्यु विशेष घडतात व त्याचें आरोग्य बिघडतें. व्यापारामध्ये नुकसान येतें व उद्योग-धदे पैशाच्या अभावीं मदीमध्ये येतात.

**शुक्र हर्शल शुभयोग :**– अधिकारी वर्गास हा काळ चागला असतो. देशामध्ये लग्न-कार्याची सख्या वाढते. अधिकारी वर्ग व श्रीमत लोकामध्यें लग्नें मोठ्या थाटानें होतात. हा योग फारच देशाची भरभराट

दर्शविणारा आहे. व्यापार, उद्योगधंदे भरभराटीमध्ये आलेले पाहण्यास मिळतात.

**शुक्र-हर्शल युति किंवा अशुभयोग :—** समाजातील निरनिराळ्या वर्गांत तडे लागतात. शुक्राच्या अमलाखालीं असणाऱ्या गोष्टींची स्थिति समाधानकारक राहात नाहीं. सांपत्तिक स्थिति चांगली राहात नाहीं. विवाहासंबंधीं अनेक भानगडीचे व विचित्र तऱ्हेचे प्रश्न उत्पन्न होतात व त्यासंबंधाचीं अनेक खटलीं कोर्टकचेऱ्यामध्ये येतात. हा काळ अनिष्ट व अशांति उत्पन्न करतो. शेअर बजार वगैरे ठिकाणीं सट्टयामुळें हानी झालेली पाहण्यास मिळते.

**शुक्र-नेपच्यून शुभयोग :—** इस्पितळें, धर्मार्थ दवाखाने व कनिष्ठ दर्जाचे लोक यांची स्थिति सुधारते. ललितकला, गायन, वादन, समुद्रपर्यटन, सहली याना फारच अनुकूल असा काल असतो. देशात एक प्रकारची सुबत्ता नांदत असल्याचे पाहाण्यास मिळते. सांपत्तिक स्थिति समाधानकारक व भरभराटीची दिसते.

**शुक्र-नेपच्यून युति किंवा अशुभयोग :—** सांपत्तिक बाबतींत मोठ्या प्रमाणावर फसविण्याचे प्रयत्न केले जातात व सोनेरी टोळ्याचे व्यवसाय जोराने चालतात. अनीतीच्या कृत्याचा बोभाटा होतो. स्त्रियांचे अपहरण करून त्याना पळवून नेऊन वेश्याव्यवसायाला लावण्याचा प्रयत्न करणाचे कार्य जोरात चालते. जकात चोरीनें आयातनिर्गत करण्याचे धंदे जोरात चालतात.

## (५) मंगळ

**मंगळ प्रथम स्थानांत :—** अशुभदृष्टिविरहित मंगळ असल्यास देशामध्ये मोठ्या उत्साहानें व आस्थेनें उपयुक्त चळवळी केल्या जातात.

अधिकारी वर्ग व राजसत्ता कार्यक्षम असते. सैन्य व आरमार याची वाढ होऊन देशात युद्धज्वर वाढतें. परिस्थितीप्रमाणें देशामध्यें युद्धोत्साह देखील दिसून येतो. मंगळ पीडित असल्यास देशामध्यें दंगेधोपे, सप, मारामाऱ्या, खून वगैरे होतात. रोगराईमुळें मृत्युसंख्या वाढते.

**मंगळ धन स्थानांत :—** शुभदृष्ट व बलवान् असल्यास सरकारी वसूल सुलभतेनें वाढतो. देशातील धनोत्पादक धंदे उर्जितावस्थेस येतात. एकंदरीनें देशाची सांपत्तिक स्थिति वाढत्या प्रमाणावर असते. मंगळाच्या अमलाखालीं असणाऱ्या गोष्टींची भरभराट होते. मंगळ पीडित असेल तर कर वाढतात. सांपत्तिक बाबतींत देशाची हानी होते चोऱ्या व दरवडे पडतात. सट्ट्याच्या धंद्यात निरनिराळ्या लोकांचीं दिवाळीं निघतात बँकांची स्थिति चांगली राहात नाहीं शेअर बाजारात भयंकर घडामोडी होतात, धनिक लोकांचे मृत्यु घडतात.

**मंगळ तृतीय स्थानांत :—** मंगळ बलवान् असेल तर रेल्वे, पोस्ट ऑफिसें याची भरभराट होते पीडित असेल तर रेल्वे व पोस्ट ऑफिस मध्यें काम करणारे लोक किंवा तृतीयस्थान दर्शक धंदा रोजगारीमध्यें असणाऱ्या लोकामध्यें सप, मारामाऱ्या आणि असंतोष उत्पन्न होतात रेल्वेवर अपघात होतात वृत्तपत्रकार किंवा ग्रंथकार यांना हा काल वाईट असतो लेखकवर्गामध्ये कोणाचा तरी मृत्यु होतो रस्त्यामधील मोटार, ट्राम वगैरे वाहनव्यवहारामध्ये अपघात घडतात.

**मंगळ चतुर्थ स्थानांत :—** मंगळ या स्थानात असणे मुळींच चांगलें नाहीं या योगानें खाणीमध्यें अपघात व अग्निप्रलय होतात. पिकें बुडतात व दुष्काळ पडतो मंगळ चतुर्थ स्थानाच्या अगदीं प्रारंभींच

असला तर अशुभ फलाची तीव्रता वाढते. अधिकारी वर्गास हा काळ फार त्रासदायक जातो. देशात मृत्युसंख्या वाढते. अधिकारी वर्ग अथवा राजवर्ग यामध्ये मृत्यु घडतात. वातावरणात उष्णता फार वाढते व कधींकधीं भूकंप होतात व त्यानें राहाण्याच्या घराचा नाश होतो. अग्निप्रलय होऊन घरादाराचा नाश होतो.

**मंगळ पंचम स्थानांत :—** मंगळ बलवान् असल्यास पंचम स्थानांतर्गतची कामें हिंमतीनें व उत्साहानें केलीं जातात परंतु पीडित असल्यास नाटकगृहें, मनोरंजनाचीं ठिकाणें, गायन शाळा वगैरे ठिकाणीं आगी लागतात किंवा अपघात होतात. बालमृत्यूची संख्या वाढते. मंगळाचा धन स्थानाशीं संबंध असल्यास सट्टे, शर्यती, जुगार वगैरेमध्यें पैशाचा व्यय होतो. या स्थानामधील अशुभ दृष्टियोगानें पीडित मंगळ चांगला नाहीं देशात मुलें, मुली, स्त्रिया यांना चांगला काळ नसतो. त्यामध्यानें भांडणें, कलह उत्पन्न होतात.

**मंगळ षष्ठ स्थानांत :—** मंगळ बलवान् असल्यास युद्धसामुग्री झपाट्यानें वाढते. परंतु पीडित असल्यास दोषी तापाच्या साथी व रोग फैलावतात. जनावराचे रोग उद्भवतात व त्यामध्यें उपयुक्त जनावराचा नाश होतो. विशेषत दूधदुभतीं जनावरें मोठ्या प्रमाणावर नष्ट होतात. धान्याचा रोगराई, टोळधाड यानें नाश होतो.

**मंगळ सप्तम स्थानांत :—** मंगळ जर मुळींच दूषित नसेल व रवि, चंद्र, गुरु, हर्शल किंवा नेपच्यून बरोबर शुभ दृष्टियोगानें संबंधित असता परराष्ट्राशीं फायदेशीर व्यवहार होतात. परंतु जर मंगळ पीडित असेल तर परिस्थितीप्रमाणें युद्ध सुरू होण्याच्या गोष्टी ऐकू येतात, किंवा युद्ध सुरू होतें. देशामध्यें युद्धोत्साह वाढतो. स्त्रियासंबधानें हा काल

अनिष्ट असतो घटस्फोट व अत्याचार याची सख्या वाढते. देशामध्यें कलह, मारामाऱ्या, अत्याचार याना ऊत येतो

**मंगळ अष्टम स्थानांत :**— मगळाच्या धर्माचे लोकाचे मृत्यु घडतात मगळ फार पीडित असल्यास अग्निप्रलयानें व अपघातानें मृत्यु होतात. त्याचप्रमाणें आत्महत्या व खून घडतात. ज्या राशींत मगळ असेल त्या राशीनें दर्शविले जाणाऱ्या रोगानें पुष्कळ लोक मृत्युमुखीं पडतात. या काळामध्यें डॉक्टर, विशेषत शस्त्रक्रिया करणारे सर्जन, युद्धतज्ज्ञ, लढनचे लोक, पोलीस अधिकारी याचे मृत्यु घडतात

**मंगळ नवम स्थानांत :**— परराष्ट्रीय व्यापारासबधानें भानगडी उत्पन्न होतात खलाशी लोक, गलबतें व तारवे याचे अपघात होतात धार्मिकबाबतींत तीव्र मतभेद होतो. शास्त्रीय शोधक, वकील, न्यायाधीश व धार्मिक चळवळीचे पुरस्कर्ते यामध्ये मृत्यु घडतात हा काल विमान वाहतुकीला चागला नसतो, परतु मगळ या स्थानामध्यें शुभ सबधित असता नवीन नवीन दूर देशामध्ये प्रवास करण्याचीं साधनें उत्पन्न होतात टेलीफोन, टेलीव्हिजन, रॅडर वगैरे साधनाची देशामध्य वृद्धि होते

**मगळ दशम स्थानांत ·**— बलवान् मगळ दशम स्थानात असल्यास सैन्यावरचे अधिकारी व देशातील अधिकारी वर्ग याचे अधिकार वाढतात आणि त्याचा सन्मान होतो युद्धविषयक किंवा सैन्याच्या खर्चाबाबतीनें वाद होते. सैन्यदल, आरमार, पोलीस अत्यत कार्यकुशल असलेलें पाहाण्यास मिळतें, परतु मगळ जर दूषित असेल तर राजवर्ग किंवा अधिकारी वर्ग यामध्ये मृत्यु होतात, किंवा त्या वर्गांतील लोक आजारी पडतात मगळावरोबर अशुभदृष्टियोग करणाऱ्या ग्रहाचा सबध

धनस्थानाशीं असल्यास युद्ध व संरक्षणविषयक गोष्टींकडे फार खर्च केला जातो मंगळ अयत पीडित असल्यास देशात दंगेधोपे, अत्याचार होतात व गुन्ह्याची वृद्धि झालेली पाहण्यास मिळते

**मंगळ एकादश स्थानांत :**— कायदे-कौन्सिलात तीव्र मत विरोधाचे प्रश्न निघतात पक्षभेद उत्पन्न होतात सैन्याच्या खर्चाबद्दल वादविवाद आणि कायदे-कौन्सिलातील सभासदांचे मृत्यु घडतात परंतु या स्थानामधील शुभदृष्टियोगानें संबंधित असलेला मंगळ चांगले फळ दर्शवितो

**मंगळ व्यय स्थानांत** —चोऱ्या, मारामाऱ्या, दरोडे वगैरे गुन्ह्यांची संख्या वाढते गुप्त शत्रूंची कारस्थानें उघडकीस येतात, कैदी लोक तुरुंगातून पळून जाण्याचे वगैरे प्रयत्न करतात त्याच्यासंबधानें काहीं भानगडी उपस्थित होतात हा काळ देशामध्ये अस्वस्थता निर्माण करणारा असतो, देशामध्यें चोऱ्या, दरोडे, खून, मारामाऱ्या होऊन जाळपोळ केली जाते सरहद्दीवर भांडण-तंटे उत्पन्न होतात व तेथील चोरट्या लोकांपासून प्रजेला उपद्रव पोहोचतो

## मंगळाबरोबर होणाऱ्या दृष्टियोगांची फळें

**मंगळ गुरु शुभयोग** —धर्मादाय संस्था, इस्पितळें व धार्मिक संस्था यांची उर्जितावस्था येते देशात आरोग्य वाढते देशामधील व्यापारधंदे जोरानें चालतात व देशामध्ये उत्साह वाढतो बेकारी नष्ट होते सट्टयाचे व्यापार तेजीमध्ये जातात

**मंगळ गुरु युति किंवा अशुभयोग .**— शुभयोगाचीं जीं फळें सांगितलीं आहेत त्यांच्या अगदीं विरुद्ध अशीं फळें पाहावयास सापडतात स्पर्शजन्य रोग फैलावतात व अस्वस्थता उत्पन्न होते धार्मिक बाबतींमध्यें भानगडी उत्पन्न होतात व त्यामुळें खळबळ माजते या

काळात वकील, बॅरिस्टर, डॉक्टर, धर्माचे उपदेशक लोक मरण पावतात.

**मंगळ-शनि शुभयोग :**— अधिकारारूढ पक्षास या योगाचा चागला फायदा मिळतो परिस्थित्यनुरूप सैन्य, आरमार व पोलीसखातें याची स्थिति समाधानकारक राहाते. उद्योगधद्याला हा काळ पोषक असतो.

**मंगळ-शनि युति किंवा अशुभयोग :**— हा योग अत्यत अधिष्ट आहे. या योगामुळे अधिकारारूढ पक्षास फार त्रास होतो प्रजेमध्ये असतोष व अस्वस्थता राहाते. चोऱ्या, मारामाऱ्या, खून व दरवडे याना ऊत येतो. मगळ व शनि याच्या अशुभयोगात युतियोग अत्यत अनिष्ट असतो चतुर्थस्थानामधून हा योग होत असता खाणी, पिकें, घरें-दारें याना फारच अनिष्टता दर्शविली जाते. केन्द्रामध्ये होणारा मगळ-शनि युतियोग फारच अनिष्ट फलदायी होतो

**मंगळ-हर्शल शुभयोग :**— अधिकारारूढ पक्षाची सत्ता अबाधित होते. कायदे कौन्सिलच्या सभासदाच्या निवडणुकीस हा काल चागला असतो. अधिकारी वर्गास त्रासदायक प्रश्नाचा निकाल लावण्यास सुलभ जाते. विद्युत् व यात्रिक उद्योगधदे चागले जोरानें चालतात. नवीन रेल्वेमार्ग तयार करण्याच्या योजना आखल्या जातात.

**मंगळ हर्शल युति किंवा अशुभयोग :**— अकल्पित रीतीनें त्रासदायक व भानगडीचे प्रश्न उपस्थित होतात. असतोष वाढतो. कायदे-कौन्सिलतील सभासद व अधिकारारूढ पक्ष याना हा काळ अनिष्ट जातो सप, खून, मारामाऱ्या व दरवडे याचा सुकाळ होतो धरणीकपाचे धक्के बसतात रेल्वेवर मोठाले अपघात यात्रिक मोडतोड झाल्यामुळें घडतात. अप घाताचें प्रमाण वाढतें सपामुळें जाळपोळ, मोडतोड भयकर प्रमाणात होते.

**मंगळ-नेपच्यून शुभयोग :—** प्रजापक्षाला हा काळ उन्नतीचा असतो. इस्पितळें व धर्मार्थ दवाखाने याची भरभराट होते. नवीन जहाजें बांधणें, समुद्रयानाकरिता बंदरे, खाड्या, गोद्या याचेमध्ये सुधारणा केली जाते.

**मंगळ-नेपच्यून युति किंवा अशुभयोग :—** चळवळे लोकांच्या चळवळींनीं देशात अस्वस्थता वाढते, गुप्त कारस्थानें, खून, मारामाऱ्या, विषप्रयोग आणि अत्याचार घडून येतात. भयकर स्वरूपाची रोगराई पसरते. चोरटे व्यवहार जोरात चालतात. सरहद्दीवरील प्रदेशामध्ये किंवा पाण्याच्या प्रवाहाचे हद्दीमध्याने अनेक लफडीं व कुलगडीं उत्पन्न होतात. विमान वाहतुकीमध्यें हवा अनुकूल नसल्याकारणाने अपघात बरेच घडतात, किंवा गुप्त कारस्थानामुळें त्याचा नाश होण्याचें भय निर्माण झालेले पाहाण्यास मिळते. हा योग फारच अशुभ फलदाई आहे.

## ( ६ ) गुरु

**गुरु प्रथम स्थानांत :—** देशात शातता, आरोग्य, व्यापारधदे, धार्मिक सस्था व इस्पितळें याची वाढ होते. हा काळ देशाला फार चागला व सुखावह जातो देशाची अनेक बाजूनें प्रगति होते. गुरु पीडित असल्यास पीडा करणाऱ्या ग्रहाच्या गुणधर्माप्रमाणें भानगडीचे प्रश्न उपस्थित होतात.

**गुरु धन स्थानांत :—** देशाची सापत्तिक स्थिति सुधारते, उद्योगधंदे, व्यापार व सरकारी वसूल याची स्थिति समाधानकारक असते. कर कमी केले जातात. गुरु अशुभदृष्टियोगानें सबधित असल्यास राष्ट्रीय खर्चाच्या बाबतींत त्रास उत्पन्न होतो.

**गुरु तृतीय स्थानांत :—** प्रवास व प्रवासाचीं साधनें वाढतात. शिक्षण, वाङ्मय व शास्त्रीय शोध याची प्रगति होते. त्याचप्रमाणें विश्वविद्यालयें, धर्म व तत्त्वज्ञानप्रसारक संस्था याची भरभराट होते. पोष्टखातें, तारखातें, टेलीफोन या साधनाची विपुलता होऊन उद्योग-धद्याला मदत होते.

**गुरु चतुर्थ स्थानांत :—** शेतकी, खाणीचीं कामें, इमारती बाध-ण्याचीं कामें आणि पिकें याची स्थिति उत्तम राहाते, प्रजेमध्यें शातता व सुस्थिति प्राप्त होते. देशात आरोग्य वाढतें. अधिकारारूढ पक्ष व प्रजापक्ष यामध्यें सहानुभूति राहाते. गुरु या स्थानात पीडित असल्यास वातावरण खराब होतें व पीकपाणी याना अनुकूल काल नसतो. या स्थानामध्यें गुरु, शनि, हर्शल, नेपच्यून व मगळाचे अशुभदृष्टियोगात नसावा.

**गुरु पंचम स्थानामध्यें :—** शिक्षण व शाळाखाते याची वाढ होते. नाटकगृहें, मनोरजनाचीं ठिकाणें व देशातील खेळ याची भरभराट होते. देशातील जन्मसख्या वाढते. मुलाचें आरोग्य व शरीरप्रकृतीकडे विशेष लक्ष दिलें जातें. उपयुक्त ज्ञानवर्धक प्रदर्शनें भरलीं जातात.

**गुरु षष्ठ स्थानांत :—** या योगामुळें, आरोग्य वाढतें. मजूरवर्ग, कामकरीवर्ग व नोकरी पेशाची मडळी याना हा काळ सुखाचा जातो. परतु या स्थनामधील अशुभदृष्टियोगानें सबधित गुरु रोगराई याचें प्रमाण वाढवितो व जनावरामध्ये रोगराई उत्पन्न करतो व आरोग्यखातें कार्यक्षम नसतें.

**गुरु सप्तम स्थानांत :—** परराष्ट्राशीं सबध व व्यापारातही यामुळें फायदा होतो. हा काळ विशेष शाततेचा असतो, युद्धकाळीं या योगानें तह दर्शविला जातो. देशात लग्नकार्यांची सख्या वाढते. देशातील

उच्च दर्जाच्या लोकामध्यें लग्नें घडून येतात. परदेशीय हुंडणावळ देशाला अनुकुल अशी राहाते. परंतु अशुभदृष्टियुक्त गुरु या स्थानामध्यें कर्जाची वृद्धि करतो व व्याजाचा दर वाढवितो.

**गुरु अष्टम स्थानामध्यें :—** गुरु बलवान् असल्यास देशात आरोग्य वाढतें; परतु पीडित असल्यास गुरूच्या अमलाखालचे लोक मृत्यु पावतात. सुप्रीम कोर्टामध्ये अनेक सरकारी दाव्यामध्ये अपयश येतें. पेन्शनर लोक, असामदार, प्रिव्ही पर्स असलेले लोक याची दैना उडते.

**गुरु नवम स्थानांत :—** धार्मिक चळवळी, परराष्ट्रीय व्यापार, परदेशगमन, शिक्षण, कायदा व न्यायकोर्ट याची प्रगति करतो, परराष्ट्राशीं व्यापार करण्याकरिता नवीन कंपन्या स्थापन केल्या जातात. धार्मिक संमेलनें भरतात. विश्वविद्यालयामध्ये चागली सुधारणा होते. धार्मिक वाङ्मय, तत्त्वज्ञानविषयक वाङ्मय व ग्रथप्रकाशन याना अनकूळ काळ असतो.

**गुरु दशम स्थानांत :—** देशातील राजवर्ग व अधिकारी वर्ग याना हा काळ फार महत्त्वाचा जातो. देशाची अनेक प्रकारें प्रगति होते. व्यापार वाढतो. देशामध्यें आरोग्य व शातता नादते. उद्योगधद्याची चागली वाढ होऊन बेकारी नष्ट होते. हवामान चागले सुखावह असतें.

**गुरु एकादश स्थानांत :—** कायदे-कौन्सिलात लोकहिताचीं महत्त्वाचीं कामें केलीं जातात. शिक्षण किंवा धार्मिक सुधारणा यासबधानें ठराव केले जातात. परराष्ट्राशीं सख्य राहतें. देशामधील आवक वाढते व देशाच्या कर्जरोख्याची (गव्हर्नमेंट सिक्युरिटीज) किंमत किफायतशीर असते.

**गुरु व्यय स्थानांत :—** इस्पितळे, रोग्याकरिता बाधलेलीं आरामभुवनें, धर्मादाय सस्था व अन्नछत्रें याची सुस्थिति असते.

## गुरुबरोबर होणाऱ्या दृष्टियोगांचीं फलें

**गुरु-शनि शुभयोग :—** देशातील व्यापार, उद्योगधंदे व सांपत्तिक स्थिति यांस हा काळ फार उत्तम असतो. कर कमी केले जातात आणि परराष्ट्राशीं व्यापार वाढतो. सांपत्तिक सुस्थिति दर्शविणारा हा योग आहे.

**गुरु-शनि अशुभयोग :—** अनेक गोष्टींमुळें देशाच्या सांपत्तिक स्थितीवर अनिष्ट परिणाम घडतात. अप्रिय असा एखादा कर लादला जातो. बँका व शेअर बाजार यांचे व्यवहार चांगले चालत नाहींत. अस्वस्थता व उदासीनता पसरविणारा हा योग आहे. सांपत्तिक सुस्थिति व देशाचे भरभराटीला हा फारच अनिष्ट योग आहे. व्याजाचा दर वाढतो. देशाची आवक घटते. हा योग अत्यंत अनिष्ट फलें दर्शवितो. देशाला कर्जामध्यें नेणारा योग आहे व व्यापारधंदा चांगला चालत नाहीं.

**गुरु-हर्शल शुभयोग :—** कायदे करणाऱ्या वर्गास हा काळ फार महत्त्वाचा जातो. महत्त्वाचे कायदे पसार होतात. सामान्यतः हा योग देशाची प्रगति करणारा आहे. देशामधील उद्योगधंदे भरभराटीला येतात. देशामधील सांपत्तिक स्थिति चांगली सुधारते. युनिव्हर्सिटीमध्यें शिक्षणाच्या वृद्धीच्या नव्यानव्या सुधारणा अमलामध्यें आणल्या जातात.

**गुरु-हर्शल अशुभयोग :—** गुरूच्या अमलाखालीं असणाऱ्या गोष्टींमध्यें आकस्मिक रीतीनें अडथळे येतात. राजवर्गास हा काळ अस्वस्थतेचा असतो. धार्मिक अस्वस्थता माजते; व्यापार व बँकांच्या व्यवहाराला हा काल अनुकूल नसतो. उद्योगधंदे चांगले चालत नाहींत.

**गुरु-नेपच्यून शुभयोग :—** लोकहिताचीं कामें हातीं घेतलीं जातात. विश्वबंधुत्वाच्या कल्पनेस जोर मिळतो. धार्मिक संस्था आपलीं

कामें जोरानें सुरू करतात. सामान्यत हा काल शांततेचा असतो. देशामध्यें उद्योगधद्याला जोर येतो व नव्या कंपन्या उत्पन्न होऊन जिकडे तिकडे सुबत्तेचें वातावरण निर्माण होतें. समुद्रावरोबर संबंध असणारे उद्योगधंदे चांगले चालतात.

**गुरु-नेपच्यून अशुभयोग :—** या योगामुळें राजकीय व धार्मिक बाबतींत गोंधळ उडतो. देशांतील शांतता नाहींशी होते, अनेक फसवेगिरीचे प्रकार घडतात. हा काल सांपत्तिक दृष्ट्या फारच भानगडी उत्पन्न करणारा असतो

**गुरु-शनि युतियोग, गुरु-हर्शल युतियोग व गुरु-नेपच्यून युतियोग हे फार महत्त्वाचे योग आहेत. या योगांमुळें पुष्कळ घडामोडी देशांत होतात आणि त्यांचे परिणाम दीर्घ काळपर्यंत टिकणारे असतात. गुरु-शनीच्या युतींचें महत्त्व तर अत्यंतच आहे. ह्या युति-योगांच्या महत्त्वामुळें त्यांचा विचार साध्या दृष्टियोगां बरोबर न करतां स्वतंत्र रीतीनें पुढें केला आहे तो पहावा.**

## (७) शनि

**शनि प्रथम स्थानांत :—** या स्थानात शनि शुभदृष्ट व बलवान् असेल तर देशात शानता, उद्योगधंदे, व्यापार याची वाढ होते. गुन्ह्याची संख्या कमी असते. परंतु शनि जर पीडित असेल तर देशात दारिद्र्य असंतोष, बेबंदशाही व गुन्हे फार होतात. लग्नातील शनि रवीबरोबर अशुभयोग करीत असल्यास अधिकारी वर्गास जाचक असतो, देशातील उच्च अधिकाऱ्याचे मृत्यु घडतात किंवा त्यावेर संकटें येतात.

**शनि धन स्थानांत :—** बलवान् व शुभदृष्ट असल्यास काटकसरीचे धोरण, काळजीपूर्वक व्यवस्था याच्या योगानें देशातील उद्योगधंदे आणि सरकारसारा (देशाची आवक) याची स्थिति उत्तम असते. परंतु शनि जर पीडित असेल तर सरकारी वसूल अंदाजापेक्षा पुष्कळ कमी येतो, देशात दारिद्य वाढतें, व्यापार बसतो, दिवाळीं निघतात आणि नवीन कर बसविले जातात. धनस्थानात पीडित शनि राष्ट्राला सांपत्तिक आपत्तिद्योतक असतो, कर्ज उभारण्याचा प्रसंग येतो. व्याजाचा दर वाढतो.

**शनि तृतीय स्थानांत :—** शनि पीडित असल्यास रेल्वेवर अपघात होतात. ग्रंथकार, लेखकवर्ग, प्रकाशक, पुस्तक विकणारे आणि वर्तमानपत्रकर्ते याची स्थिति खालावते, मोटार कंपन्या किंवा ट्रॅम्वे कंपन्या याच्या शेअरची किंमत कमी होण्याचा संभव असतो किंवा त्याच्या नोकरात असंतोष पसरतो व त्यामुळें कटकटी व भानगडी उत्पन्न होतात. तसेंच तेथील अधिकारी वर्ग चांगला दक्ष नसल्याच्या तक्रारी कानावर येतात.

**शनि चतुर्थ स्थानांत :—** प्रजा, मजूरवर्ग व अधिकारी वर्ग याना हा काळ अनिष्ट असतो. दुष्काळ व बेरोजगारी वाढते. पिकें बुडून जातात सर्वत्र अस्वस्थता पसरते. शेतकी, इमारती बांधणें व खाणी याच्या मजूरींची कामें मंदावतात. शनि चतुर्थ स्थानाच्या अगदीं आरंभींच असेल तर भूकंप व अपघात होतात वातावरणात घटता येते. या स्थानामध्यें मार्च्यनें युक्त किंवा हर्शलवरोवर अशुभदृष्टियोगानें संबंधित असलेला शनि फारच अनिष्ट व भीषण आपत्ति दर्शवितो

**शनि पंचम स्थानांत :—** पंचम स्थानावरवी फारच अनिष्ट ह्ये पाहासपास सापडतात. लहान मुलांची मृत्युसंख्या वाढते आणि

जन्मणाऱ्याची संख्या कमी होते. शनि ह्या स्थानात पीडित असल्यास अत्याचार वाढतात. राजकुटुंबांतील किंवा उच्च दर्जांतील मनुष्याचे मृत्यु होतात. या स्थानामध्यें शनि, मंगळ, हर्शल व नेपच्यून यांच्या अशुभ-दृष्टिसंबंधात असता लहान मुलेंबाळें यांचे अपहरण, अनाचार यांसारखे घृणा उत्पन्न करणारे गुन्हे घडतात.

**शनि षष्ठ स्थानांत :—** पीडित असल्यास देशामध्यें आरोग्य बरोबर नसतें. ज्या राशींत शनि असेल त्या राशीच्या गुणधर्माप्रमाणे देशात रोग होतात. मजूरवर्गांत बेरोजगारीपणा वाढतो. या स्थानामधील अशुभदृष्टियोगानें संबंधित असलेला शनि देशात भयंकर आजार दर्शवितो व मजूरवर्गामध्ये किंवा नोकरी पेशाचे वर्गामध्ये भयंकर प्राणहानी किंवा मृत्यु घडतात.

**शनि सप्तम स्थानांत :—** बलवान् व शुभदृष्ट असल्यास परराष्ट्राशीं सलोख्याचे व्यवहार होतात परंतु पीडित असल्यास परराष्ट्रीय व्यापारावर अनिष्ट परिणाम घडतो देशातील स्त्रियांस हा काळ अनिष्ट असतो. सप्तम स्थानाशीं संबंध असलेल्या गोष्टीची पिछेहाट होते हा काळ परराष्ट्रीय मदत मिळण्यास अनुकूल नसतो परदेशामध्ये असलेल्या राष्ट्राच्या भाऊला धक्का बसतो

**शनि अष्टम स्थानांत :—** देशातील अधिकारावर असलेलीं वृद्ध मनुष्यें मृत्यु पावतात शनि पीडित असल्यास देशात आरोग्य राहात नाहीं. शनीच्या धर्माप्रमाणे व तो ज्या राशीमध्ये असतो त्या राशीनें दर्शविले जाणारे रोगराई उत्पन्न होतात.

**शनि नवम स्थानांत :—** बलवान् असेल तर धार्मिक चळवळीस महत्व येतें. परंतु पीडित असल्यास परराष्ट्रीय व्यापारासंबधानें

भानगडीचे प्रश्न उपस्थित होतात. देशास समुद्र जवळ असल्यास समुद्रामध्यें तुफानें होतात व मनुष्यहानीही होते. परदेशाबरोबरील व्यापारामध्यें अडचणी उत्पन्न होतात. परदेशाला जाणाऱ्या जहाजांची किंवा विमानांची हानी होते.

**शनि दशम स्थानांत :—** बलवान् व शुभदृष्ट असल्यास मात्र अधिकारी वर्ग, राजवर्ग यांस बरा असतो. परंतु पीडित असल्यास यासारखा अनिष्ट योग कोणताच नाहीं. अधिकारी वर्गाची सत्ता कमी करणारा हा योग आहे. या योगानें राजकीय वातावरण प्रक्षुब्ध होतें. दशमस्थ शनीबरोबर रवि किंवा हर्शल अशुभयोग करीत असल्यास राजघराण्यांत मृत्यु घडतो. हा काळ देशामधील राजकारणास फारच अशुभ असतो. राजसत्तेविरुद्ध चळवळी सुरू होतात व राजसत्तेवर विश्वास नसल्याचे ठराव कायदे-कौन्सिलमध्यें आणले जातात.

**शनि एकादश स्थानांत :—** शनि बलवान् व शुभदृष्ट असल्यास कौन्सिलांतील अगर पार्लमेंटांतील काम बऱ्याचशा मेहनतीनें सुरळीत चालेल. शनीबरोबर शुभदृष्टियोग करणाऱ्या ग्रहाप्रमाणें कायदे अगर बिलें पास होतात. शनि पीडित असेल तर कायदे-कौन्सिलांतील कामासंबंधानें प्रजापक्ष नाखूष असतो. अष्टमांत असणारा ग्रह जर शनीला दूषित करीत असेल तर एखाद्या राजकारणी मनुष्याचा मृत्यु होतो. या स्थानामध्यें शनि, गुरु, शुक्र किंवा चंद्र यांचेबरोबर शुभसंबंधित शनि असतां देशामधील सांपत्तिक स्थिति चांगली असते; परराष्ट्रामधून चांगली मदत मिळते. व्याजाचा दर कमी होतो.

**शनि व्यय स्थानांत :—** गुन्हे, मारामाऱ्या व तंटेबखेडे होतील. तुरुंग, वर्कहाउसेस किंवा रेफरमेटरीज यांची स्थिति चांगली राहात नाहीं.

सामन्यत. अस्वस्थतेचा हा काळ असतो. परदेशामधील कटकटी वाढतात व शत्रुत्व होतें. देशातील अधिकारी वर्गावर आरोप केले जातात व त्याच्या अनुदजनीवर शिंतोडे उडतात. या स्थानामध्ये अशुभदृष्टियोगाने संबंधित शनि फारच अशुभ फळें दर्शवितो.

## शनीबरोबर होणाऱ्या दृष्टियोगांचीं फळें

**शनि-हर्शल शुभयोग :—** राजकीय बाबतींत महत्त्वाच्या सुधारणा केल्या जातात. देशातील राज्यव्यवस्था सुरळीत रीतीनें चालते. अधिकारी वर्ग आपलें कर्तव्यामध्यें दक्ष असतात व याच वेळीं त्याचेबरोबर गुरु, रवि, मगळ याचे शुभदृष्टियोगाचे सबध असता देशाला फारच चागला उन्नतिदर्शक काळ असतो.

**शनि-हर्शल अशुभयोग :—** राजकीय वातावरण साफ बिघडून जातें. सर्वत्र असतोष, दुफळ्या, भाडणें आणि तीव्र मतभेद माजतात. ज्या देशात प्रजापक्ष बलवान् असतो, त्या ठिकाणीं कायदे-कौन्सिलची नवीन निवडणूक होते. हा काळ स्थानिक म्युनिसिपालिट्याना त्रासाचा असतो. मजूरवर्ग सप करतात व जिकडेतिकडे बेबंदशाही माजते.

**शनि-नेपच्यून शुभयोग :—** प्रजेच्या हितासाठीं सुधारणा केल्या जातात. इस्पितळें, तुरुग व धर्मादाय सस्था सुधारतात. उद्योग-धदे व व्यापार याची प्रगति होते. मोठालीं धरणें बाधणे, पिण्याच्या पाण्याची मुबलक सोय करणे, शेतीकरता नवीन काल्वे बाधणें अशीं चागलीं कामें घडतात.

**शनि-नेपच्यून अशुभयोग :—** प्रजा व लोकपक्ष याची हानि होते. देशात पचमस्थमीय गुन्हे फार वाढतात आणि त्यामवधानें

देशात विशेष चर्चा चालते. हवामान फारच बिघडतें व सर्वत्र रोगराई पसरते. सरहद्दीवर भयंकर अत्याचार घडतात.

**शनि-हर्शल युति व शनि-नेपच्यून युति :—** याचा विचार पुढील प्रकरणामध्ये केलेला आहे तो पाहाणें.

## (८) हर्शल

**हर्शल प्रथम स्थानांत :—** शुभदृष्ट असल्यास देशातील सत्ताधीशास उत्तम असतो. या कालामध्ये देशातील कायदेकानूची सुधारणा होते. हर्शल जर पीडित असेल तर देशामध्ये संप, दंगेधोपे आणि अस्वस्थता उत्पन्न होतात. अधिकारी वर्गावर आपत्ति येतात. हर्शल अत्यंत पीडित असेल तर भयंकर गुन्हे घडतात. या स्थानामध्ये हर्शल, मंगळ, गुरु-शुक्र, बुध किंवा चंद्र याचेबरोबर शुभदृष्टियोगात असता देशामध्यें उद्योगधंदे जोरात चालतात नानातऱ्हेच्या सुधारणा होऊन राष्ट्र प्रबल होण्याच्या मार्गाला लागतें. देशामध्यें नवीन नवीन उद्योगधंदे जोरानें प्रगतीच्या पथावर जातात.

**हर्शल धन स्थानांत :—** बलवान् व शुभदृष्ट असेल तर नवीन नवीन प्रगतीपर धोरणानें वसूल वाढतो व व्यापारास तेजी येते परंतु पीडित असल्यास देशाच्या सांपत्तिक स्थितींत फारच आश्चर्यकारक घडामोडी व तोटे होतात बँका, पेढ्या व द्रव्याचे व्यवहार याची स्थिति फारच शोचनीय होते. राष्ट्रीय संपत्तीसंबधानें सर्वत्र चर्चा सुरू होते. या कालामध्ये बँका किंवा नाण्याचे व्यवहार करणाऱ्या संस्थावर बंधनकारक कायदे आणले जातात व त्यामुळें देशामध्यें बऱ्याच सांपत्तिक अडचणी उत्पन्न होतात.

**हर्शल तृतीय स्थानांत :—** बलवान असल्यास नवीन शोध, नवीन कल्पना आणि तृतीय स्थानदर्शक व्यवहारात–रस्ते, ट्राम, पोस्ट, टेलीफोन सुधारणा प्रचारात आणल्या जातात शिक्षणासबंधानें सत्ताधीशा कडून विचार केला जातो, आणि त्यासबंधानें महत्वाचे ठराव किंवा कायदे पास होतात हर्शल पीडित असल्यास रेल्वे, मोटारी, ट्रामगाड्या याचे अपघात होतात.

**हर्शल चतुर्थ स्थानांत :—** पीडित असल्यास मजूर व कामकरीवर्ग यामध्यें असंतोष, अस्वस्थता व संप होण्याची धास्ती असते आणि खाणींमध्यें अपघात होतात मोठाल्या इमारती पडून प्राणहानी होते. पिकें बुडून दुष्काळ पडतो हर्शल फारच पीडित असून चतुर्थ स्थानाच्या आरंभींच असेल तर भूकंप होतात किंवा स्फोट होऊन भयंकर प्राणहानी व संहार होतो या स्थानामधील अशुभदृष्टियोगानें संबंधित हर्शल राजसत्तेला भयंकर विरोध दर्शवितो व देशात क्रांतिकारक चळवळींना ऊत येतो

**हर्शल पंचम स्थानांत :—** पीडित असल्यास नाटकगृहे नाटक कंपन्या आणि लोकरंजनाचीं साधनें यामध्यानें हा योग अनिष्ट आहे या योगानें मुलाचे शिक्षणक्षेत्रात धरसबसपुरी माजते एक ना धड भारा भर चिंध्या अशी स्थिति प्राप्त झाल्याकारणानें त्यानबंधानें ओरड होते उच्च दर्जाच्या लोकांत तऱ्हेवाईक फार माजतात गर्भपाताच्या भयंकर केसीस होतात संततिनियमन कार्यामध्यें बखेडे माजतात या स्थानामधील शुभदृष्टियोगामध्यें असलेला हर्शल शिक्षणक्षेत्रामध्यें फारच चांगल्या सुधारणा घडवून आणतो

**हर्शल षष्ठ स्थानांत :—** कारखान्यात काम करणारे लोक व मजूरवर्ग यामध्ये चळवळी व संप होतात. हर्शल अत्यंत पीडित असेल तर देशात विलक्षण प्रकारचे रोग होऊन मृत्युसंख्या वाढते. या स्थानामध्यें शुभग्रहानें युक्त किंवा शुभदृष्टियोगानें शुभसंबंधित हर्शल संरक्षण-क्षेत्रामध्ये महत्वाच्या सुधारणा घडवून आणतो. पोलिस, आरमार सैन्य हें उत्तम स्थितीमध्ये कार्यक्षम राहातें.

**हर्शल सप्तम स्थानांत :—** पीडित असल्यास परराष्ट्राशीं होणारे व्यवहार फारच त्रासदायक आणि भानगडीचे होतात. परकीय राष्ट्रें तीव्र चढाओढी करतात. घटस्फोटाची संख्या वाढते. देशातील स्त्रीवर्गास हा काळ फार अनिष्ट असतो. हर्शल बलवान असल्यास सप्तम स्थानासंबंधाच्या गोष्टींमध्ये देशाला फायदा होतो. उत्तम तऱ्हेचे परराष्ट्राबरोबर करारमदार होऊन देशाला मदत होणारे व्यवहार घडतात. व्यापाराची वृद्धि होऊन परराष्ट्रीय चलनाची स्थिति चांगली राहाते.

**हर्शल अष्टम स्थानांत :—** पीडित असल्यास खून, आत्महत्या, अपघात आणि अकल्पित मृत्यु घडतील. देशातील एखादा प्रसिद्ध राजकारणी मनुष्य मृत्यु पावतो. देशाची सांपत्तिक स्थिति चांगली राहात नाहीं. या स्थानामध्यें हर्शल असून तो गुरूबरोबर अशुभदृष्टियोगामध्ये असता व्यापारामध्यें विशेषत सट्टयामुळें अनेकांचीं दिवाळीं निघतात.

**हर्शल नवम स्थानांत :—** शास्त्रीय शोध, तत्त्वज्ञान व धर्म याची प्रगति होते. न्यायकोर्टांत अत्यंत भानगडीचे खटले येतात. समुद्र-किनारीं वादळें व अपघात होतात. या स्थानामध्ये शुभदृष्टियोगानें संबंधित असणारा हर्शल विमान, रेल्वे, टेलिव्हिजन वगैरेमध्ये चांगली भरभराट दर्शवितो. देशामध्यें शास्त्रीय विषयाचें अध्ययन वाढतें.

**हर्शल दशम स्थानांत :—** बलवान व शुभदृष्ट असेल तर सत्तारूढ लोकांची सत्ता कांहीं अकल्पित कारणामुळें वाढते. परंतु पीडित असल्यास अधिकारी वर्गास फारच त्रास होतो. राजकीय परिस्थितींत अचानक फेरबदल होतात. उच्चवर्ग किंवा राजवर्ग यांमध्यें मृत्यु होतात. या स्थानामध्यें अशुभदृष्टियोगानें संबंधित हर्शल राजसत्तेविरुद्ध खळबळ व बंड दर्शवितो व असलेली अधिकारसत्ता नष्ट करण्याचा प्रयत्न होतो. हा काळ फारच खळबळकारक असतो.

**हर्शल एकादश स्थानांत :—** बलवान व शुभदृष्ट असल्यास कायदे-कौन्सिलांतील काम जोरानें चालतें. अनेक महत्वाचे व उपयुक्त फेरबदल होतात. परंतु पीडित असल्यास अचानक रीतीनें गुंतागुंतीचे प्रश्न उद्भवतात. या स्थानामधील अशुभदृष्टियोगानें संबंधित हर्शल उद्योगधंदा, रोजगार, म्युनिसिपालिट्या यांना प्रतिकूल असतो.

**हर्शल व्यय स्थानांत :—** अतिशय पीडित असेल तर गुप्त व आश्चर्यकारक असे अत्याचार होतात. इस्पितळें, तुरुंग व धर्मादाय संस्था यांची स्थिति समाधानकारक नसते. सरहद्दीवरील प्रदेशामध्यें तुफानें, गडबड व बंडें होण्याचें व अत्याचार होण्याचें भय असतें.

## हर्शलबरोबर होणाऱ्या दृष्टियोगांचीं फलें

**हर्शल-नेपच्यून शुभयोग :—** देशांतील कायदे करणारी सत्ता आणि अधिकारारूढ पक्ष यांची सत्ता अबाधित होते. प्रजा व अधिकारी वर्ग यांमध्यें सहकारित्व उत्पन्न होतें. कायद्यासंबंधानें पुष्कळ सुधारणा घडून येतात. धार्मिक मतें, गूढ विद्या व मंत्रतंत्राचीं शास्त्रें यांची प्रगति होते.

**हर्शल-नेपच्यून अशुभयोग :—** राजकीय प्रकरणात अत्यत घडामोडी होतात राजपक्ष व प्रजापक्ष यामध्ये तीव्र मतभेद उत्पन्न होतो हा काल अत्यत अस्वस्थतेचा असतो.

**हर्शल-नेपच्यून या दोन ग्रहांच्या दृष्टियोगाचा फलादेश फारच जपून केला पाहिजे शनि-हर्शल-नेपच्यून व गुरु यांचेमध्यें होणारे दृष्टियोग एकदांच होत नाहींत तर ते वरेच वेळां घडतात व त्यामुळें हे ग्रह दृष्टियोगामध्यें बराच काळ राहतात.**

## (९) नेपच्यून

**नेपच्यून प्रथम स्थानांत :—** प्रजापक्षाच्या हिताच्या काहीं चळवळी होतात ; आणि नेपच्यून जर दृष्टियोगानें शुभसंबंधित असून बलवत्तर असेल तर त्या चळवळी यशस्वी होतात. नेपच्यून पीडित असेल तर राजकीय कारणामुळें असतोष वाढतो देशामध्यें गुन्ह्याची व अत्याचाराची संख्या वाढते व विचित्र रोगराई उत्पन्न होते विषबाधेनें अनेक मृत्यु घडतात.

**नेपच्यून धन स्थानांत :—** पीडित असेल तर देशामध्यें सांपत्तिक भयंकर घडामोडी होतात फसवाफसवी, खोटे व्यवहार, दगल बाजीचे व्यवहार मोठ्या प्रमाणावर होऊन देशांत दिवाळीं निघतात सोनेरी टोळ्याच काम जोरानें चालतें वसूल अदाजापेक्षा फारच कमी येतो. धन स्थानात नेपच्यून पापदृष्ट जरी नसला तरीसुद्धा राष्ट्रीय संपत्तीस चांगलें नाहीं. देशामधील बँकाचे व्यवहारामध्यें अनागोंदी कारभार चालून अनेक लफडीं निर्माण होतात.

**नेपच्यून तृतीय स्थानांत :—** बलवान असल्यास वृत्तपत्रें व वाङ्मयाची प्रगति होतें सिनेमाच्याद्वारें लोकांना किंवा जनतेला सुसंस्कृत करण्याचा प्रयत्न केला जातो चित्र, गीत, वादन, शिक्षण यांना चांगला काळ असतो परंतु पीडित असल्यास तृतीय स्थानासंबंधींच्या गोष्टींत अस्वस्थता उत्पन्न करतो शिक्षणासंबंधानें तीव्र मेद व वादविवाद उत्पन्न करतो वृत्तपत्रकार व लेखकांत यामध्यें भानगडी व अश्लील वाङ्मयामुळें अनूनुकसानीचे खटले होतात देशामध्यें वाहतुकीचे घट यामध्यें अत्याचार घडतात नद्या, कालवे यामधून होणाऱ्या वाहतुकीमध्ये अपघात घडतात

**नेपच्यून चतुर्थ स्थानांत '—** राजकीय चळवळी होतात व असंतोष वाढतो चतुर्थ स्थानाच्या अगदींच आरंभीं असल्यास अधिकारारूढ पक्षास अनिष्ट असतो नेपच्यून शुभदृष्ट व बलवान असल्यास शेतकी व पिकें बरीं असतात चतुथ स्थानात नेपच्यूनमुळे हवा रोगट, दमट व ओलसर होते व ओला दुष्काळ पडण्याची धास्ती उत्पन्न करतो भयंकर मोठाले पूर येऊन जलप्रलयाचें भय दर्शवितो

**नेपच्यून पंचम स्थानांत —** शुभदृष्ट व बलवान असल्यास पंचम स्थानासंबधानें शुभ फळें दृष्टीस पडतात जन्मणाराची संख्या वाढते शिक्षण व शाळा याची भरभराट होते परंतु पीडित असल्यास पंचम स्थानासंबधानें विलक्षण असे घृणा उत्पन्न करणारे प्रकार घडतात धन स्थानातील ग्रह पंचमस्थ नेपच्यूनबरोबर अशुभदृष्टियोग करीत असल्यास सट्टा, सोडती, जुगार व शर्यती यामुळें भयंकर सांपत्तिक आपत्ति येण्याचें भय असतें पीडित असलेल्या नेपच्यूनचा संबंध सप्तमस्थानाशी असल्यास स्त्रियासंबधानें फार अनिष्ट धाणेरड्या गोष्टींची चर्चा होते देशात स्त्रीवर्गाला

अनीतिपथाकडे ओढण्याचे अनेक प्रयत्न झालेले पाहण्यास मिळतात. विवाहित स्त्रीवर्गाला हा काळ अनिष्ट असतो. वेश्या-व्यवसायाला हा काळ पुष्टी देणारा असतो.

**नेपच्यून षष्ठ स्थानांत :—** मजूर वर्ग व कामकरी वर्ग यामध्यें असंतोष पसरून संप होण्याची भीति असते. देशात आरोग्य राहात नाहीं. देशामधील कामकरीवर्ग, नोकरवर्ग याचेमध्ये रोगराई पसरते. वाईट अन्न व कदान्नानें रोगराई पसरते. पाळीव जनावरें – गाई, म्हशी, बकऱ्या यामध्यें विचित्र रोगराई फैलावते.

**नेपच्यून सप्तम स्थानांत :—** शुभदृष्ट असल्यास परराष्ट्राशीं सलोख्याचे व्यवहार होतात परंतु पापदृष्ट असल्यास परराष्ट्रीय धोरणात फसगत होते. घटस्फोटाचे प्रकार व अनीतीसंबंधाच्या गोष्टी बाहेर येऊन बभ्रा होतो. स्त्रियाचे फसवून अगर भुलथापा देऊन अपहरण होतें.

**नेपच्यून अष्टम स्थानांत :—** विषप्रयोग, पाण्यात बुडून किंवा चुकून विषारी औषध घेतल्याचे मृत्यु होतात. स्पर्शजन्य रोग उद्भवतात.

**नेपच्यून नवम स्थानांत :—** परराष्ट्रीय व्यापार व दूर देशचे प्रवास वाढतात. धार्मिक चळवळी यशस्वी होतात. भिन्न भिन्न पथामध्यें असलेला विरोध कमी होतो. गूढ शास्त्रें व मंत्रतंत्रविद्या यामध्येंहि ऊहापोह होतो. या स्थानामधील अशुभदृष्टियोगानें सत्रवित नेपच्यून समुद्रामध्यें जहाजें बुडाल्यामुळें प्राणहानी दर्शवितो. धार्मिक संस्थामधील अनेक अनाचाराचीं कुलंगडीं बाहेर येतात.

**नेपच्यून दशम स्थानांत :—** शुभदृष्ट असल्यास प्रजापक्ष बळावतो. प्रजापक्ष व अधिकारारूढ पक्षामध्ये सहकारित्व राहतें. नेपच्यून पीडित असल्यास अधिकारारूढ पक्षास फार त्रास होतो देशामध्यें हवामान

चांगलें राहात नाहीं चोरट्या आयातीचे गुन्हे वाढतात. अधिकारीवर्गावर लांच, फितुरी इत्यादि आरोप आणतो

**नेपच्यून एकादश स्थानांत :**— शुभदृष्ट असल्यास, कायदे कौन्सिलांतील काम सुरळीत व व्यवस्थित चालतें. लोकहिताचीं कामें केलीं जातात परंतु पीडित असल्यास कायदे पास होण्यास फार त्रास होतो प्रजापक्षीय सभासदांकडून विरोध केला जातो देशामधील सांपत्तिक स्थितीला हा काल पोषक नसतो

**नेपच्यून व्यय स्थानांत :**— शुभदृष्ट असल्यास इस्पितळे व धर्मादायसंस्था यांची स्थिति बरी असते पीडित असल्यास अत्याचार केले जातात परकीय गुप्त हेर, राजद्रोह, मारामाऱ्या व खून यासंबधानें खटले केले जातात गूढ विद्या, जारण-मारण, पिशाच्चवाद व मंत्रतंत्रशास्त्रे यांचा प्रसार करणाऱ्या लोकांसबंधानें फार चर्चा होते सरहद्दीवरील प्रदेशामध्यें भानगडी उत्पन्न होतात

## (१०) प्लूटो भावफलें

द्वादश स्थानामध्यें प्लूटोचीं फलें काय मिळतील यासंबधानें आज निश्चितपणें लिहिणें फारच कठीण आहे हा ग्रह **मंगळ** व **वृश्चिक** राशीने दर्शविल्या जाणाऱ्या गुणधर्मांचा पुष्कळ प्रमाणामध्य बोध करीत असल्या कारणानें हा ग्रह मेदिनीय ज्योतिषामध्यें विचार करतेवेळीं तो ज्या ज्या स्थानामध्य पडतो त्या स्थानपरत्वें कांहींतरी अशुभ घटनाच दर्शवितो, असें म्हटलें असता अतिशयोक्तीचें आहे असें वाटत नाहीं त्यांत हा ग्रह ज्या ज्या स्थानामध्यें पापग्रहाचे अशुभदृष्टियोगाने संबंधित किंवा अशुभग्रहयुक्त होईल ते तें स्थान फारच तीव्र तऱ्हेचा असा अशुभ

फलादेशाचा बोध करणारें ठरतें व त्या स्थानासंबंधानें फारच तीव्र असा अनुभव आलेला पाहाण्यास मिळेल परंतु हा ग्रह जर शुभग्रहयुक्त किंवा शुभदृष्टियोगानें संबंधित असेल तर तें स्थान अशुभ फलदायी न होता त्या फलादेशामध्यें अनुकूल अशा संयशक्तीच्या कार्याचा बोध करून त्या स्थानासंबंधानें शुभफलें अनुभवाला आलेली पाहाण्यास मिळतील. हा ग्रह कांहीं ज्योतिर्विद अणुविस्फोट झाल्यानें उत्पन्न होणाऱ्या शक्तीचा द्योतक मानतात.

सूचना —

मागील प्रकरणामध्यें भावस्थ ग्रहांचीं आणि त्यांच्या दृष्टियोगाचीं जीं फलें वर्णन केलीं आहेत तीं फलें दुसऱ्या प्रकरणात सांगितलेल्या मेदिनीय सर्व कुंडल्यात पाहावयाचीं असतात. या फलासंबंधानें विशेष लक्षात ठेवण्यासारखें तत्त्व म्हणजे ग्रहाचीं भावस्थफलें अधिक महत्त्वाचीं असतात. ग्रहाच्या दृष्टियोगानें त्या फलादेशामध्यें कमीअधिक शुभाशुभत्व प्राप्त होतें व त्यामुळें फरक झालेला पाहाण्यास मिळतो. दृष्टियोगामुळें होणारे फरक कोणत्या स्वरूपाचे असतात हें वाचकास कळावें म्हणून ग्रहाचें कारकत्व व गुणधर्म लक्षात घेऊन त्याचीं सविस्तर फलें दिलीं आहेत. मेदिनीय कुंडल्याचा विचार करताना फक्त ग्रहांचीं स्थानफलें व दृष्टियोगफलें विचारात घेतलीं म्हणजे काम भागतें असें नाहीं, तर या दोन्ही प्रकारच्या फलामध्यें ग्रहाच्या स्थानाधिपत्यामुळें पुष्कळच फरक होतो हें लक्षात ठेविलें पाहिजे. दृष्टियोग करणारे ग्रह कोणत्या स्थानात व कोणत्या स्थानाचे अधिपति आहेत याचा तारतम्यानें विचार करण्याचें काम वाचकावरच सोपविणें भाग आहे. कारण इतकीं विस्तृत फलें विस्तारभयास्तव देतां येणें शक्य नाहीं.

# वर्षेश किंवा अब्दाधिपति निर्णय व त्याचा फलादेश

मेदिनीय ज्योतिषात वर्षकुंडलीला म्हणजे " **मेषसंक्रमण** काळाच्या कुंडलीला " विशेष प्राधान्य आहे हें मागें सांगितलेंच आहे. ह्या कुंडलीचा अमल साधारणपणें वर्षभर असतो म्हणून तिचा विचार फारच सूक्ष्म रीतीनें करावा लागतो. त्या कुंडलीचा विचार करताना कोणत्या ग्रहाकडे विशेष प्राधान्य आलेलें आहे हें ठरविलें पाहिजे. वर्षकुंडलीमध्ये ज्या ग्रहास विशेष प्राधान्य असतें त्यास '**वर्षाधिपति**' किंवा '**अब्दप**' असें म्हणतात. ह्या वर्षाधिपतीच्या गुणधर्माप्रमाणें पुष्कळशा गोष्टी घडून येतात असा अनुभव आहे. मात्र वर्षाधिपति कोण याचा निर्णय कसा करावा यासंबधानें *प्राचीन व अर्वाचीन, पौर्वात्य व पाश्चिमात्य या* ग्रंथकारामध्यें बराच मतभेद आहे. पूर्वाचार्यांचे मतभेद येथे देण्याचे कारण दिसत नाहीं. फक्त आमच्या अनुभवाप्रमाणें वर्षाधिपति पाहाताना कोणत्या गोष्टी लक्षात घेतल्या पाहिजेत हें नमूद केलें म्हणजे पुरे होईल.

वर्षकुंडलीच्या लग्नकेंद्रीं उदित असलेल्या अंशाच्या अगदीं निकट असणारा ग्रह 'वर्षाधिपति' असतो किंवा दशम स्थानातील ग्रह वर्षाधिपति होऊं शकतो. जेव्हा लग्न किंवा दशम या दोन्ही केंद्रात मुळींच ग्रह नसतो त्यावेळीं सप्तम किंवा चतुर्थ स्थानात असणारा, आणि रवि किंवा चंद्र याजबरोबर दृष्टियोग करणारा ग्रह वर्षाधिपति असतो, केन्द्रामध्यें मुळींच ग्रह नसेल तर ११–९–५–३ या स्थानातील एखादा बलवान ग्रह आणि विशेषत लग्नाधिपति होऊं शकतो, परंतु त्या ग्रहाबरोबर रवि किंवा चंद्र याचे दृष्टियोग होत असले पाहिजेत.

केंद्राव्यतिरिक्त इतर स्थानात असणारा ग्रह कितीही बलवान असला आणि जर तो रवि किंवा चद्र याजबरोबर दृष्टि (शुभ किंवा अशुभ) योग करीत नसला तर तो वर्षाधिपति होऊ शकत नाही.

वर दिलेल्या साऱ्या नियमावरून कोणाही वाचकास वर्षकुंडलींतील 'वर्षाधिपति' कोण हें ठरविता येईल. वर्षाधिपतीचीं फळें फार विस्तार न करता व महत्वाचा विचार न गाळता पुढें दिलीं आहेत.

हीं वर्षाधिपतीसंबधानें दिलेलीं फळें **मकरसंक्रमण** काळचे कुंडलीमध्यें विचारात घ्यावीं असे काहीं ज्योतिर्विदांचें मत आहे.

## (१) वर्षाधिपति शनि

बळवान **शनि** वर्षाधिपति असेल तर शेतकरी, मजूर वर्ग, शेतकी, पिकें व इमारती यांची स्थिति उत्तम राहाते, परंतु शनि बलहीन व पीडित असेल तर मकर-कुंभ आणि शनि ज्या राशींत असेल त्या राशींच्या क्षेत्रान्तर्विभागात वृद्ध लोकांची मृत्युसंख्या फार वाढते. हवेमध्यें अत्यंत गारठा, वावटळें आणि अकाली पर्जन्य-वृष्टि होते.

**मेषेंत** वर्षाधिपति शनि पीडित असेल तर चोऱ्या—दरवडे, अस्वस्थता आणि दुःखकारक गोष्टी घडून येतात. मंगळानें पीडित असल्यास गुराचे भयंकर रोग होतात.

**वृषभेंत** वर्षाधिपति शनि पीडित असल्यास वृषभ राशीच्या अमलाखालच्या प्रदेशात दुःख, दारिद्य किंवा तंटे, असतोष व अराजकता इतकें पाहण्यास मिळतें. टोळ व उपद्रवी कीटकाचा सुळसुळाट होतो व दुष्काळ पडतो. दूरदूरचीं जनावरें मरतात

**मिथुनेंत** वर्षाधिपति शनि असल्यास वातावरण बिघडून जातें वक्री असल्यास मिथुनराशीदर्शक प्रदेशामध्यें असंतोष उत्पन्न होतो. वर्षाधिपति शनि मिथुनेच्या चतुर्थांत असल्यास राजवर्गास अनिष्ट असून देशामध्यें रोगराई उत्पन्न होऊन मृत्युसंख्या भयंकर होते व पिकांस हानी पोहोंचते.

**कर्केंत** वर्षाधिपति शनि असल्यास कीटक, टोळ वगैरेंचा नाश होतो शनि वक्री असल्यास अधिकारी व राजवर्ग यास अनिष्ट असतो मंगळाच्याबरोबर अशुभदृष्टियोग होत असल्यास अतिवृष्टि व महापूर येतात पिकें बुडतात दुष्काळाचें भय उत्पन्न होतें

**सिंहेंत** वर्षाधिपति शनि असल्यास लोकांस व राजास सारखाच अनिष्ट असतो रोगराई वाढते

**कन्येंत** वर्षाधिपति शनि असून उत्तर शर असेल तर वातावरण उत्तम राहातें परंतु दक्षिण शर असेल तर अनावृष्टि व पाण्याचा दुष्काळ पडतो हा योग पिकें नष्ट करणारा आहे अशुभदृष्टियोगानें युक्त शनि दुष्काळप्रचुरच मानणें इष्ट आहे.

**तूळेंत** वर्षाधिपति शनि असून उत्तर शर असेल तर हवेंत उष्णता वाढते, पर्जन्य थोडा किंवा फारच कमी पडतो दक्षिण शर असल्यास हवा उत्तम असते शनि वक्री नसेल तर पृथ्वीवर धान्य व फळें यांची समृद्धि होते.

**वृश्चिकेंत** वर्षाधिपति शनि असून उत्तर शर असल्यास पर्जन्यवृष्टि चांगली होऊन नदी—नाले पाण्यानें तुडुंब भरतात दक्षिण शर असेल तर

धान्याचा दुष्काळ पडतो. शनि वक्री असल्यास स्पर्शजन्य रोग उद्भवतात.

**धनेंत** वर्षाधिपति शनि असून उत्तर शर असेल तर हिंवाळ्यात फार कडक थंडी पडते. शनि वक्री असल्यास सार्वत्रिक दुःखकारक गोष्टी घडून येतात. मार्गी असल्यास प्रजाजनास सुखकारक असतो.

**मकरेंत** वर्षाधिपति शनि असून उत्तर शर असेल तर हवामान ठीक राहातें व योग्यवेळीं पर्जन्यवृष्टि होते. वक्री असल्यास प्रजा-पक्षात भाडणें व मारामाऱ्या होतात; मार्गी असल्यास देशात सुस्थिति असते. परंतु शनि वक्री असून चंद्राबरोबर अशुभदृष्टियोगात असता थंडी फार पडते. हिमवृष्टि होते.

**कुंभेंत** वर्षाधिपति शनि असून उत्तर शर असेल तर पर्जन्य-वृष्टि उत्तम होते. ऋतुमानाप्रमाणें थंडी फार वाढते. वक्री असल्यास देशांत अनिष्ट असतो व मार्गी असल्यास देशातील मोठ्या जनावराचा नाश होतो.

**मीनेंत** शनि असून उत्तर शर असेल तर उत्तर दिशेकडून सोसाट्याचे वारे वाहू लागतात. दक्षिण शर असेल तर समुद्रात भयंकर वादळें होतात. जहाजाची व गलबताची फार हानी होते.

## (७) वर्षाधिपति गुरु

वर्षाधिपति बलवान् गुरु असेल तर राजे लोक प्रजेशी न्यायानें वाग-तात. देशामध्ये लोकोपयोगी सुधारणा केल्या जातात. धर्म, न्याय, संपत्ति, शांतता, स्वास्थ्य व आरोग्य यांची अभिवृद्धि होते. गुरु बलहीन असल्यास शुभ फलें दृष्टीस पडत नाहीत.

**मेषेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास पूर्वेकडील देशांत धर्मामध्ये उत्तम सुधारणा किंवा धार्मिक चळवळी होतात. हवामान आरोग्यकारक राहून धान्यसमृद्धि होते.

**वृषभेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास हवामान उत्तम राहतें. धान्य समृद्धि, आरोग्य व शांतता यांची वृद्धि होते देशांतील भिन्न भिन्न वर्गांतील लोकांमध्ये सहानुभूति राहाते या वर्षामध्यें फळाचें पीक चांगलें येतें.

**मिथुनेंत** वर्षाधिपति गुरु असून मंगळाबरोबर अशुभदृष्टियोग करीत असल्यास स्पर्शजन्य रोग उद्भवतात. गुरु शुभदृष्ट असल्यास मिथुन राशीच्या अमलाखालीं असणाऱ्या गोष्टींची वृद्धि होते

**कर्केंत** वर्षाधिपति गुरु असल्यास देशामध्यें शांतता व भरभराट हीं दिसून येतात. आरोग्य, पिकें व बागायती उत्पन्नें हीं वाढतात. ऊसाचें पीक चांगलें येतें.

**सिंहेंत** वर्षाधिपति गुरु असून शनि किंवा हर्षलकडून पीडित असल्यास वादळें व सिंहेच्या अमलाखालच्या प्रदेशांत भूकंप होतात मंगळानें पीडित असल्यास हवेंत उष्णता फार वाढते व पाण्याचा दुष्काळ पडतो. गुरु बलवान असल्यास हवामान उत्तम राहून पिकें चांगलीं येतात

**कन्येंत** वर्षाधिपति गुरु असल्यास शेतकीकडे लोकांचें लक्ष लागतें. पिकें उत्तम येतात आणि दक्षिण दिशेचे वारे वाहू लागतात. गुरु पीडित असल्यास मात्र सांपत्तिक अडचणी उत्पन्न होण्याची धास्ती असते देशांत अनाचार वाढतात.

**तूळेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास हवामान उत्तम राहून देशांत शांतता व आरोग्य हीं राहातात. स्वस्ताई होते

**वृश्चिकेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास यथायोग्यकाळीं पर्जन्य पडतो व धान्य-समृद्धि होते. गुरु वक्री किंवा पीडित असल्यास शुभफलें फारच कमी मिळतात व समुद्रांत वादळें होतात.

**धनेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास हवामान उत्तम असते. देशांत शांतता व स्वस्ताई होते. उच्च वर्गांतील लोक व धनिक लोक यांना हा काळ उत्तम असतो. गुरु वक्री असल्यास प्रवासांत हानी होते. हर्शलनें किंवा शनीनें पीडित असल्यास हवामान चांगले असत नाहीं व पिकांची खराबी होते. सांपत्तिक अडचणी उत्पन्न होतात.

**मकरेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास दक्षिण दिशेचे वारे सुटतात. कनिष्ठ वर्गाची भरभराट होते. गुरु वक्री असल्यास शुभ फलें मिळत नाहींत व वादळें होतात. गुरु शुभदृष्टयोगानें संबंधित असतां देशाला व उद्योगधंद्याला फार चांगला अनुकूल काल असतो. पिकें चांगलीं येतात, व्यापारी वर्ग सुखी होतो.

**कुंभेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास हवामान फार संतोषकारक असतें. गुरु पीडित असल्यास ऋतुमानाप्रमाणें भयंकर वादळें, अतिवृष्टि व गारांची वृष्टि होऊन फार नाश होतो.

**मीनेंत** वर्षाधिपति गुरु असल्यास तें वर्ष फार सौख्यकारक जातें. प्रजा संतुष्ट असते. व्यापारी वर्ग व दर्यावर्दी लोक यांची भरभराट होते. गुरु पीडित असल्यास अतिवृष्टीनें नुकसान होतें.

## (३) वर्षाधिपति मंगळ

**मंगळ** हा वर्षाधिपति असून बलवान् असल्यास मंगळाच्या अंमलाखालीं असलेले लोक म्हणजे सैनिक, लढवय्ये, शस्त्रांचे

संवेगानें काम करणारे, डॉक्टर्स वगैरेंची भरभराट होते. परंतु मंगळ पीडित असल्यास वरील लोकांवर संकटें येतात. देशांत चोरट्यांचा उपद्रव वाढतो. रोगाच्या सांथी येण्याची धास्ती असते.

**मेषेंत** वर्षाधिपति मंगळ असल्यास (परिस्थितिप्रमाणें) देशात युद्धोत्साह वाढतो. देशांतील लोकांची मालमत्ता सुरक्षित राहाते. उत्तर शर असेल तर हवेमध्यें उष्णता फार वाढते आणि पर्जन्य कमी पडतो किंवा अवर्षण पडते. दक्षिण शर असल्यास विद्युत्पात होतात. शनीने पीडित असल्यास पूर्व दिशेकडून जोराचे वारे वाहातात. दुष्काळ, रोगराई, मारामाऱ्या, तंटे व दरवडे फार पडतात. संन्निपातिक ताप, गोवर व देवी यांच्या साथी येतात. मंगळ जर वक्री असेल तर रोगांची परमावधि होते.

**वृषभेंत** वर्षाधिपति मंगळ असल्यास दक्षिणेचे वारे सुटतात. पिकें पुकट जातात. जनावरें, गुरेंढोरें यांच्यावर रोग येतात. उत्तर शर असल्यास पर्जन्य पुष्कळ पडतो आणि पिकांस फारसा धोका नसतो. दक्षिण शर असल्यास सोसाट्याचे वारे सुटतात व पृथ्वीवरील धान्याचा नाश होतो.

**मिथुनेंत** वर्षाधिपति मंगळ असल्यास वादळें व विद्युत्पतन यापासून फार नाश होतो. देशाच्या उत्तर व पश्चिम बाजूस चोऱ्या, मारामाऱ्या व दरवडे पडताल. *मंगळ मार्गी असल्यास वेअब्रूचे खटले फार होतात व वक्री* असल्यास धार्मिक बाबतींत किंवा धर्मशिक्षकांमध्यें तंटे व कलागति होतात.

**कर्केंत** वर्षाधिपति मंगळ असल्यास पश्चिम भागामध्यें भांडणें व मारामाऱ्या होतात. कर वाढतात व तापांचे आजार देशामध्यें फैलावतात. जनावरें, गुरेंढोरें मृत्युमुखी पडतात. समुद्रांत भयंकर वादळें होऊन

गल्वताचा नाश होतो मगळ वक्री असल्यास गुन्ह्याची व अत्याचाराची सख्या वाढते

**सिंहेत** वर्षाधिपति मगळ असल्यास सिंहराशीच्या अमलाखालच्या प्रदेशात ( परिस्थितीप्रमाणें ) लढाया व रक्तपात होतात उत्तर शर असल्यास पाण्याचा दुष्काळ पडतो वक्री असल्यास उच्च दर्जाचे लोकास हानिकारक असतो

**कन्येत** वर्षाधिपति मगळ असल्यास कन्येच्या अमलाखालच्या प्रदेशात रक्तपात होतो स्त्रियाची मृत्युसख्या फार वाढते उत्तर शर असल्यास धान्यें व फळफळावळ याचा नाश होतो देशात आजार वाढतो. दक्षिण शर असल्यास फळफळावळ याची समृद्धि होते

**तूळेत** वर्षाधिपति मगळ असल्यास पर्जन्य व धुकीं फार पडतात व दक्षिण दिशेकडील वारे वाहतात धान्ये व फळें याची महागाई होते लढाई सुरू होण्याची भीति असते मार्गी असल्यास धनिक लोकास उत्तम व वक्री असल्यास उच्च दर्जाचे लोक आजारी पडतात

**वृश्चिकेत** वर्षाधिपति मगळ असल्यास हवा स्वच्छ राहात नाहीं हिंवाळ्यात अतिशय कडक थडी पडते व उन्हाळ्यात अयन उष्णता वाढते चूत, चोऱ्या व दरवडे याचा सुकाळ होतो उत्तर शर असल्यास पाण्याचा दुष्काळ पडतो, परतु दक्षिण शर असल्यास पाण्याचा पुरवठा उत्तम असतो धान्यें व वनस्पती याचा नाश होतो

**धनेत** वर्षाधिपति मगळ असल्यास पूर्वेकडील प्रदेशात लढाया होतात धनेच्या अमलाखाली असलेल्या प्रदेशात नासधूस होते देशात

दुष्काळ पडण्याचा संभव असतो. मंगळ मार्गी असल्यास गुरेंढोरें व घोडे यांचा संहार होतो.

**मकरेंत** वर्षाधिपति मंगळ असल्यास देशाच्या पूर्वभागांत लढाया, मालगाडी व मृत्युसंख्या अतिशय वाढण्याचा संभव असतो. पर्जन्यवृष्टि उत्तम होते, धान्यें व फळफळावळ यांची समृद्धि होते.

**कुंभेंत** वर्षाधिपति मंगळ असल्यास अतिवृष्टि होते, कडक थंडी व धुकीं पडतात. कुंभेच्या अंमलाखालच्या प्रदेशांतील राजावर संकटें येतात.

**मीनेंत** वर्षाधिपति मंगळ असल्यास पर्जन्य फार पडतो. अकालीं पर्जन्यवृष्टि होते. समुद्रावरचे प्रवास धोक्याचे असतात. उच्च दर्जाचे लोक व राजवर्ग यांना हा फार अनिष्ट असतो. दक्षिण शर असल्यास टोळ व उपद्रवी कीटक यांचा सुळसुळाट होतो. परंतु उत्तर शर असल्यास हवामान उत्तम असतें व देशांत आरोग्य राहतें. मंगळ वक्री असल्यास व्यापारी वर्गास फायदेशीर असतो.

## (४) वर्षाधिपति रवि

रवि वर्षाधिपति असून जर शुभदृष्ट असेल तर देशांतील राजा, राजवर्ग व अधिकारारूढ पक्ष यांची सत्ता, कीर्ति व सन्मान हीं वृद्धिंगत होतात, सामान्यतः देशाची भरभराट होते. रवि पीडित असल्यास अनिष्ट फलें अनुभवास येतात.

**मेषसंक्रमणाच्या** वेळीं रवीकडे वर्षाधिपत्य असल्यास देशाची भरभराट होते. देशाच्या शत्रूचा मोड होतो. मेषेच्या अंमलाखालच्या प्रदेशांत भरभराट होते. रवि पीडित असल्यास देशावर संकटें येतात.

( दरवर्षी मेषसंक्रमणकाळच्या कुंडलीचा अंमल सर्व वर्षभर असतोच असें नाहीं. ज्या वेळीं मेषसंक्रमणाचा अंमल वर्षभर नसतो त्या वेळीं कर्क, तूळ व मकर ह्या संक्रमणाचा विचार करावा लागतो. हा विचार करताना विवक्षित संक्रमणाच्या वेळीं, कोणत्या ग्रहाकडे आधिपत्य येतें, तें जरूर पाहिलें पाहिजे. प्रस्तुत प्रकरणामध्यें वर्षाधिपति ग्रहाचीं जीं फळें सांगितलीं आहेत, तींच वरील संक्रमणकालीन ' अधिपतीं 'चीं घ्यावींत. )

**कर्क**संक्रमणकालीं जर रवि अधिपति असेल तर दर्यावर्दी व कर्केच्या अंमलाखालचे लोक याची भरभराट होते.

**तूळ**संक्रमणकालीं जर रवि अधिपति असेल तर तूळ राशीच्या अंमलाखालच्या लोकांची भरभराट होते.

**मकर**संक्रमणकालीं जर रवि अधिपति असेल तर शेतकरी, मजूरवर्ग आणि गुराढोरांचा व्यापार करणारे याची भरभराट होते. रवीकडे आधिपत्य असून पीडित असल्यास वर सांगितलेल्या शुभफळांच्या अगदीं विरुद्ध फळें मिळतात.

## ( ५ ) वर्षाधिपति शुक्र

बलवान् शुक्र वर्षाधिपति असल्यास देशांत स्वास्थ्य, शांतता व सांपत्तिक स्थिति उत्तम असते. आनंदोत्सव, मनोरंजन व उत्साहजनक खेळ ह्यामध्यें लोक दंग होतात. स्त्रियास हा काळ उत्तम असतो. शुक्र शुभदृष्ट असेल तर हवामान उत्तम, आरोग्य, सांपत्तिक सुस्थिति, धान्य-समृद्धि आणि पर्जन्यवृष्टि समाधानकारक असते. शुक्र अधिपति असून कर्क, वृश्चिक व मीन राशीमध्यें पीडित असेल तर अतिवृष्टि व महापूर

यामुळें फार नुकसान होतें ज्या राशींत शुक्र बल्वान् व शुभदृष्ट असेल त्या राशीच्या अमलाखालचे प्रदेश व लोक याची भरभराट होते

## (६) वर्षाधिपति बुध

ज्या वर्षी वर्षाधिपत्य बुधाकडे असून तो बल्वान् व शुभदृष्ट असतो त्या वर्षी शास्त्रीय शोधक, शिक्षकवर्ग, विद्यार्थीवर्ग, ग्रंथकार, लेखक, पुस्तकप्रकाशक आणि व्यापारीवर्ग याची प्रगति होते बुध बल्हीन असून पीडित असेल तर वरील लोकास वर्ष वाईट जातें वर्षाधिपति बुध हा गुरु किंवा शुक्र याजबरोबर शुभदृष्टियोग करीत असेल तर वाङ्मय, कला व शिक्षण याची प्रगति होते मगळाकडून पीडित असल्यास युद्धामबधानें चर्चा होते वादग्रस्त विषयासबधानें रणें माजतात हवामान उष्ण राहातें तापाच्या साथी, चोऱ्या, दरोडे व अत्याचार होतात ज्या ग्रहाबरोबर बुधाचा सबध येतो, त्या ग्रहाच्या गुणधर्माप्रमाणें बुधाचीं फळें मिळतात म्हणून बुध कोणत्या ग्रहाबरोबर दृष्टियोगानें सबधित आहे तें अवश्य पाहिलें पाहिजे

## (७) वर्षाधिपति चंद्र

चद्र वर्षाधिपति असून बल्वान् व शुभदृष्टियोगानें सबधित असल्यास प्रजेला तें वर्ष चागलें जातें देशातील आरोग्य व प्रजाहित याकडे अधिकाऱ्याचें लक्ष जातें चद्र बलहीन व पापदृष्टियोगानें सबधित असेल तर प्रजेवर सकटं येतात चद्र वर्षाधिपति असता तो कोणत्या राशींत व कोणत्या ग्रहाबरोबर दृष्टयोगानें सबधित आहे, याचा विचार केला पाहिजे व तो ज्या राशीमध्ये असतो त्या राशीच्या गुणधर्माप्रमाणें चद्राचीं फळें दृष्टोत्पत्तीस येतात वर्षाधिपति ग्रह ज्या स्थानात असेल त्या स्थानासबधाचीं

फळें विशेष महत्वाचीं असतात. मागील प्रकरणात जीं स्थानफळे दिलेली आहेत त्याचा उपयोग वर्षाधिपतीचीं स्थानफळें पाहाण्याकडे करता येण्यासारखा आहे व सूक्ष्मफळादेश कोणत्या प्रकारचा अनुभवास येईल याचा खुलासा तदनुरोधानें सहज ध्यानामध्ये येईल. करिता वाचकवर्गानें त्याकडे अवश्य लक्ष द्यावें.

वर्षाधिपति कोणता ग्रह आहे हें निश्चित करून त्यावरून कोणत्या तऱ्हेचा फलागमाचा बोध होत आहे ह्यासंबंधानें वर जो खुलासा केला आहे, तो फक्त **मेष**संक्रमणाचे कुंडलीपुरता न घेता वर दर्शविल्याप्रमाणें कोणता ग्रह विशेष प्रबळ आहे हें **मकर**संक्रमणाचे कुंडलीमध्येंही अवश्य विचारामध्ये घ्यावें.

**मकर** ही राशिचक्रामधील दहावी राशि – राजकारण, प्रतिष्ठा, महत्ता, श्रेष्ठता दर्शविणारी राशि असल्याकारणानें देशामधील राजकीय उलाढालीसंबंधानें विचार करतेवेळीं **मकर**संक्रमण कुंडलीला विशेष प्राधान्य देऊन ही कुंडली देशामधील राजकीय उलाढाली काय दर्शवीत आहे हें ध्यानात घेऊन त्यापुढील येणाऱ्या **मेष**संक्रमण कुंडलींतील ग्रह व दशमस्थानाची स्थिति वरील मकरसंक्रमण कुंडलीचे कुंडलीस पोषक आहे किंवा नाहीं इत्यादि गोष्टी विचारामध्ये घेऊनच नंतर देशामधील त्या वर्षामध्ये होणाऱ्या राजकीय उलाढालींचें भविष्य करणें बरें. **कर्क**संक्रमण कुंडली ही उत्तर गोलार्धामधील वर्षाकाळाची बोधदर्शक असून त्या कुंडलीमधील चतुर्थ स्थानामधील ग्रहस्थितीवरून पीकपाण्याचा विचार करण्याकरिता मेषसंक्रमणाचे किंवा सौरवर्षारंभ काळचे कुंडलीनंतर अवश्य विचाराकरितां घेणें जरूर आहे.

जुन्या ग्रंथकाराना सातच ग्रह माहीत होते म्हणून त्यानीं वर्षाधिप सातच ग्रह मानले आहेत व त्याचा फलादेश काय अनुभवाला येईल त्यामध्यानें सविस्तर विवेचन केलेलें पाहाण्यास मिळतें व तें येथें उद्धृत केलें आहे. परंतु आता हर्शल, नेपच्यून अथवा प्लूटो हे तीन नवीन ग्रह **वर्षाधिपति** किंवा अब्दाधिपति होणारच नाहीत असें म्हणता येत नाहीं अर्थात् हे ग्रह अब्दाधिपति झाले असता त्या ग्रहाचे गुणधर्माप्रमाणें व कारकत्वा-प्रमाणें फलादेश मिळेल असें मानावें लागतें व त्याप्रमाणे हर्शल व नेपच्यून या दोन ग्रहांचा अनुभव पाहाण्यास मिळाला आहे अब्दाधिपति ठरवण्याचे जे नियम पूर्वी दिले आहेत तेच विचारामध्यें घेऊन हे ग्रह अब्दाधिपति आहेत किंवा नाहींत हें ठरविणें हे ग्रह अब्दाधिपति असून शुभदृष्टियोगानें संबंधित झालेले पाहाण्यास ज्या ज्या वर्षांत मिळतात त्या त्या वर्षामध्यें वरील हर्शल-नेपच्यून या दोन ग्रहाचे कारकत्वाप्रमाणें देशा मध्यें सुधारणा व प्रजाजनाना लाभ झालेले पाहाण्यास मिळतील व अशुभ दृष्टियोगानें संबंधित असता तत् तत् कारकगोष्टींमुळें हानि व आपत्ति आलेली पाहाण्यास मिळेल. नेपच्यून अथवा वरुण हा केंद्रामध्यें अशुभदृष्टियोगान पीडित असता पूर, अतिवृष्टि, नदीनाले यांचे पुरामुळें हानी, पाण्याच्या साठ्याचे बंधारे फुटून जलप्रलयाचें भय निर्माण होतें

# राशिचक्र व भूगोलावरील प्रदेश व शहरें

पृथ्वीवर असणाऱ्या सर्व राष्ट्रांमध्यें किंवा देशांमध्यें कांहीं विशिष्ट प्रकारचे नैसर्गिक भेद आढळून येतात. "मूर्ति तितक्या प्रकृति" हा नियम आपल्या रोजच्या अनुभवाचा आहे; तरी भिन्न भिन्न प्रकृतींचें ज्योतिषशास्त्रदृष्ट्या आपणास वर्गीकरण करतां येतें व त्याप्रमाणें राष्ट्रांच्याही नैसर्गिक भेदांचें वर्गीकरण करतां येणें शक्य आहे. असें वर्गीकरण क्लाडियस टालेमीनें सुमारें इसवी सनाच्या दुसऱ्या शतकांत लिहिलेल्या टेट्राबिब्लास नामक ग्रंथांत- केलेलें आढळतें. प्रत्येक राष्ट्र, देश किंवा शहर राशीचक्रांतील एकाद्या विशिष्ट राशीच्या अंमलाखालीं आहे, असें टालेमीनें लिहिलें आहे. टालेमीच्या काळांत असणाऱ्या राष्ट्रांमध्यें हल्लीं पुष्कळच फरक पडला आहे. त्यानें दिलेल्या देशांच्या व शहरांच्या राशींसंबंधानें अनेक चिकित्सक ज्योतिर्विदांनीं आतांपर्यंत फारच सूक्ष्म विचार केला आहे व अनुभवाच्या कसोटीस त्यानें दिलेल्या देशांच्या व शहरांच्या राशी पूर्णपणें उतरत आहेत. या राशींचा उपयोग भविष्यनिर्णयाच्या कामीं मेदिनीय ज्योतिषांत अत्यंत होतो. मेदिनीय शास्त्र अद्यापपर्यंत पूर्णतावस्थेस आलेलीं नाहीं. परंतु या अपूर्णावस्थेंतसुद्धां प्रस्तुत माहिती असलेल्या देशांच्या व शहरांच्या राशी उपलब्ध नसत्या तर भविष्यनिर्णयाचें काम बरेंच लंगडें पडलें असतें. टालेमीनें दिलेल्या राशी वसंत संपातापासून ३० अंशांनीं एक राशी या दंडकानें घेतलेल्या आहेत. अर्थात् खालीं दिलेल्या राशी **सायन गणने**प्रमाणें आहेत.

## मेष

**देश :** इंग्लड, डेन्मार्क, जर्मनी, लेसर पोलंड, पॅलेस्टाईन व सिरिया.

**शहरें :** बर्मिंगहॅम, ओल्डहॅम, लिस्टर, ब्लॅकबर्न, प्लॉरेंस, नेपल्स, व्हेरोना, पदुआ, मार्सेल्स, क्रॅको, सॅरागोसा, उट्रेक, ब्रॅसुआ, ब्रन्स्विक.

## वृषभ

**देश :** आयर्लंड, इराण, पोलंड, आशिया मायनर, जॉर्जिया, काकेशस, ग्रेशिअन अर्किपेलागो, सायप्रस व श्वेत रशिया

**शहरें :** डब्लिन, लिप्झिक, मादुआ, पार्मा पालेमो, ऱ्होडस, सेंट लुई व नाईल नदीवरचें ॲस्टर्न

## मिथुन

**देश :** अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें ( यू. एस्. ए. ), बेल्जम, ईजिप्ट, लाम्बार्डी, इजिप्त, सार्डीनिया, इंग्लंडचा पश्चिम भाग, आर्मेनिया, त्रिपोली, फ्लॅन्डर्स आणि वेल्स

**शहरें :** लंडन ( १७ अं. ५४ क ), व्हायमाउथ, मेलबोर्न (१० अं. २९ क. ), बर्जेस, कॉर्डोव्हा, मेट्झ, न्यूरेंबर्ग, व्हर्सेल्स, लुव्हेन, सॅनफ्रान्सिस्को, उल्वरहॅम्पटन आणि वेडन्बरी

## कर्क

**देश :** स्कॉटलंड, हॉलंड, न्यूझिलंड, आफ्रिकेचा उत्तर व पश्चिम भाग, मॉरिशस बेटें आणि पाराग्वे

**शहरें :** ट्युनिस, अल्जिअर्स, ॲमस्टरडॅम, सेंट ॲन्ड्रूज, यार्क, व्हेनिस, बर्न, ल्यूबेक मॅन्डेबर्ग, मिलन, कॅडिझ, न्यूयॉर्क, मॅंचेस्टर, स्टॉकहोम, कॉन्स्टॅंटिनोपल, जिनेवा, डेपफोर्ड, रॉक डेल

## सिंह

**देश :** फ्रान्स, इटली, बोहेमिया, सिसिली, खाल्डियापासून बसरा प्रांतापर्यंतचा भाग, रुमानियाचा उत्तर भाग, अप्युलिया, आल्प्स् पर्वतातील प्रदेश, सिडोन आणि टायर.

**शहरें :** रोम, बाथ, ब्रिस्टल, पोर्टमाऊथ, फिलाडेल्फिया, प्रॅगु, रॅव्हेना, टॅटन, दमास्कस, शिकागो व ब्लॅकपूल

## कन्या

**देश :** युरोपीय तुर्कस्थान, स्वित्झरलंड, वेस्ट इंडीज, अशिरिया, मेसापोटेमिया ( टैग्रिसपासून युफ्राटिसपर्यंत ), क्रीट, क्रेशिआ, साइलेशिआ, बाबीलोनिया, मोरिया, थेसली, कुर्डीस्थान, ग्रीस देशातील काहीं भाग, व्हर्जिनिया आणि ब्राझिल

**शहरें :** जेरुसलेम, कॉरिंथ, पारिस, लायन्स टुलूज, चेल्टनहॅम, रिडिंग, हेडलबर्ग, नॉरविच, बोस्टन, लॉसएंजल्स, मेडस्टन, स्ट्रूसबर्ग, ब्रिंडिसी, चेरी आणि टाउमारडेन.

## तूळ

**देश :** ऑस्ट्रिया, इंडोचायना, चीन, मुख्यत्वानें उत्तरेकडचे प्रांत व भारताचा चीनजवळचा प्रदेश, तिबेट, कास्पियन समुद्राच्या बाजूचा प्रांत, उत्तर इजिप्त, जपान, सन्हाय, लिव्होनिया, ब्रह्मदेश आणि अर्जेटिना

**शहरें :** अँन्टवर्प, चार्ल्स्टन, फ्रँकफर्ट, फ्रीबर्ग, गेटा, प्लसेन्शा, स्पायर्स, लिस्बन, जोहान्सबर्ग, कोपनहेगन, मिडल्टन, लीड्स, नॉटिंगहॅम व व्हिएन्ना.

## वृश्चिक

**देश :** अल्जेरिया, बार्बरी, बव्हेरिया, कॅपॅडोशिया, ज्यूडीया, ज्यूटलंड,

मोरोक्को, नॉर्वे, उत्तर सीरिया, ट्रॉसवाल, कॅटालोनिया आणि फ्री सल्ड

**शहरें :** फेझ, व्हॅलेंशिया, ओडर नदीवरचे फँकफर्ट, डोव्हर, लिव्हरपूल, मेसिना, वर्दिग, पूर्व प्रिन्स्टेड, न्यू ऑर्लीन्स, वॉशिंग्टन, बाल्टिमोर, सिन्सिनाटि, हल, मिलवाकी, सेंट जॉन्स, न्यू फौंडलड, हॅलिफॅक्स, स्टॉकपोर्ट आणि न्यू कॅसल

## धनु

**देश :** अरबस्तान, ऑस्ट्रेलिया, फेलिक्स, केप फिनिस्टर, डाल्मेशिया, हंगेरी, इलिया, मोरॅव्हिया, प्रोव्हेन्स, स्क्लव्होनिया, स्पेन, टस्कनी, फ्रान्स देशातील सिअेन व ग्यॅरोन ते केप फिनिस्टरपर्यंतचा प्रदेश, आणि मादागास्कर

**शहरें :** बुडा, कलोन, नारबॅन, राटेन्बर्ग, नॉटिंगहॅम, शेफील्ड, स्टुटगार्ड, सडरलँड, टारटो, टोलॅडो, पश्चिम ग्रामिच आणि ब्रॅडफर्ड

## मकर

**देश :** भारतवर्ष, पंजाब, खोरासन, पर्शियामधील सिराम्क्त व मारकनजवळील प्रदेश, अफगाणिस्तान, थ्रेस, मासिडोनिया, मोरिया, इलिरिया, अल्बेनिया, बोस्निया, बल्गेरिया, ग्रीस, हेस, सक्सनी, स्टिरिया, रोमन्डिओला, मॅक्लेनबर्ग, मेक्सिको, लुथिआनिया, आणि आर्कनी बेटें.

**शहरें :** ऑक्सफर्ड, पोर्ट सय्यद, टस्कनीतील प्रॅटो ब्रॅण्डेनबर्ग, टार्टोन, कॉन्स्टन्स, ब्रुसेल्स, प्रॉव्हे समधील फेअन्स आणि केली

## कुंभ

**देश :** खडकाळ अरबस्तान, प्रशिया, रशिया, पोलंड, स्वीडन, सरकेशिया, तार्तरी, ल्युथिआनिया, वेस्ट फालियन, वालाचिया, पीडमाट आणि अबिसीनिया, पेद्रोया

**शहरें :** आयटल, ब्रेमेन, इगलस्टड, ट्रेन्ट, हॅम्बर्ग आणि सालिसबरी.

## मीन

**देश :** पोर्तुगाल, कॅलॅब्रिया, गॅलिशिया, ( स्पेनमधील ) नॉर्मंडी, आणि न्युबिया, आणि सहाराचें वाळवंट.

**शहरें :** अलेक्झाड्रिया, रॅटिस्बन, वर्मस, सेव्हील, कापोस्टेला, बोर्नमाऊथ, फार्नहॅम, टिव्हर्टन, साईस्टचर्च, कोवेस, रेजेनबर्ग, ग्रिस्बि, साऊथपोर्ट लॅवेस्ट, लॅंकॅस्टर न्सिलिन, अलेक्झाड्रिया व प्रेस्टन.

द्वादश राशींच्या अमलाखालीं असलेले देश व शहरें याची वर दिलेली यादी विश्वसनीय आहे असे समजण्यास मुळींच हरकत नाहीं. पृथ्वीच्या विस्ताराकडे लक्ष दिले असता ही यादी अगदींच अपुरी आहे असें म्हणावें लागतें व यासबधानें अजून पुष्कळ विचार होणें जरूर आहे वर दिलेल्या यादीपैकीं नऊ-दशांश भाग टालेमीच्या ग्रंथावरून घेतला आहे. टालेमीच्या वेळच्या देशाच्या व्याप्ति आणि हल्लींच्या देशाच्या व्याप्ति यामध्यें देश जिंकण्याच्या महत्वाकांक्षेमुळें आणि इतर अनेक कारणामुळें फारच फरक झालेले आहेत हेंही आपण लक्षात ठेविलें पाहिजे. वर दिलेल्या देश व शहरें याच्या राशिसंबधानें अर्वाचीन ज्योतिष्यामध्यें थोडासा मतभेद आहे. उदाहरणार्थ, तुळेच्या अमलाखालीं चीन व जपान देश दिले आहेत. काहीं ज्योतिर्विद जपान देशाची मेषराशी व चीन देशाची कर्कराशी मानतात. आणि हें उपपत्तीस सोडून नाहीं तसेंच मोरिया द्वीपकल्प कन्या व मकर या दोन्ही राशींखालीं मतभेदामुळें आढळते. सामान्य माहिती म्हणून इतर देशाच्या राशींचा उल्लेख केला आहे आता खुद्द हिंदुस्थानाविषयीं विचार करू.

हिंदुस्थान देश म्हणजे एक खंडच आहे. येथें अनेक प्रकारचे लोक, भाषा, पंथ, रीतिरिवाज वगैरे आहेत. या देशाच्या निरनिराळ्या प्रांतांमध्यें जें नानाविधत्व दिसून येतें त्यावरून त्या देशावर एकापेक्षा अधिक राशींचा अमल असला पाहिजे हें उघड आहे. हिंदुस्थानची राशी मकर आहे असें टालेमीनें आपल्या ग्रंथात लिहिलें आहे. मकरराशींतील ग्रहाचीं भ्रमणें, युतियोग व रविचंद्राचीं ग्रहणें यांचीं फळें भारतवासी यांच्या चांगलीं अनुभवास येतात. ह्यावरून हिंदुस्थानची राशी मकर आहे यांत संशय नाहीं.

त्याप्रमाणें युरोपीय, फलज्योतिषशास्त्राचा आद्य आचार्य टालेमी यानें देशाच्या राशींचा विचार केला आहे त्याप्रमाणेंच इ. सनाच्या चौथ्या शतकांत झालेल्या वराहमिहिरानें आपल्या बृहत्संहितेंत भरतखंडांतर्गत असलेल्या देशाचीं नक्षत्रें दिलीं आहेत. "कृत्तिका नक्षत्रापासून तीन नक्षत्रांचा एक याप्रमाणें सत्तावीस नक्षत्रांचे नऊ विभाग करून ते भरतखंडामध्यें मध्यापासून पूर्वादि दिशाक्रमानें नऊ विभागांवर योजिले आहेत." तीन नक्षत्रांच्या विभागाखालीं देश व शहरें मिळून तीस पस्तीस नावें दिलेलीं आहेत, त्यामुळें कोणतें नक्षत्र कोणत्या विशिष्ट देशाचें अगर शहराचें हें कळण्यास मार्ग नाहीं. वराहमिहिरानें दिलेलीं जुनीं नावें प्रचारात नसल्यामुळें कांहीं देश व शहरें यांचीं ठिकाणें ओळखणें हल्लीं कठीण झालें आहे. आणि कांहीं ठिकाणीं शंका घेण्यास बरीच जागा आहे. उदा. आर्द्रा, पुनर्वसु व पुष्य या तीन नक्षत्रांच्या विभागाखालीं मगध व भद्र हे देश आहेत. त्यापैकीं भद्र हा देश पूर्वी कृत्तिका, रोहिणी व मृगशीर्ष या नक्षत्राखालीं दिलेला आढळतो. आणि 'ग्रहभक्त्य' या अध्यायामध्यें मगध देश रवीच्या अमलाखालीं

आहे असें लिहिलें आहे. आर्द्रा, पुनर्वसु व पुष्य हीं नक्षत्रें सिंह राशींत नाहींत मग या नक्षत्राच्या अमलाखालचा मगध देश रवीच्या अमलाखालीं कसा येतो ? वराहमिहिराने केलेल्या नक्षत्रविभागासंबधानें दुसरा असा प्रश्न येतो कीं, सर्व नक्षत्रचक्र भरतखंडामध्येंच का विभागलें आहे ? नक्षत्रचक्र सर्व पृथ्वीवर विभागून दिलें असतें तर अधिक सोपपत्तिक झालें असतें, असें आम्हास वाटतें वराहमिहिर,आधाराशिवाचून कांहीं लिहील असें आम्हास वाटत नाहीं'आणि त्याच्यावरील कूर्मचक्राचा विशेष भरतखंडामधील किंवा इतर पृथ्वीवरील प्रदेशाच्या राशी ठरविण्यास विशेष उपयोग होईल असें आम्हास वाटत नाहीं. यामुळें तो भाग प्रस्तुत प्रसगीं सोडून देणें इष्ट आहे. आचार्य वराहमिहिर याच्या बृहत्संहिता या ग्रथामधील पुष्कळसा भाग वराच उपयुक्त व महत्त्वाचा असल्याकारणाने वाचकांनीं या ग्रथाचें अवश्य अध्ययन करणें इष्ट वाटतें

जुन्या ग्रथकाराचा उपयोग हिन्दुस्थान देशामधील अनेक शहराच्या राशी ठरविताना कांहींच करता येण्यासारखा नाहीं, तरी चिकित्सक ज्योतिष्यानीं प्रयत्न केल्यास भरतखडातील सर्व प्रदेशाच्या राशी ठरविणें अशक्य नाहीं

देशाच्या राशी ठरविताना तेथील परिस्थिति, लोकाचे आचार विचार, आणि गुणधर्म लक्षात घ्यावे लागतात, अशा रीतीनें एकादी राशी ठरविल्यास त्या राशीमध्ये झालेल्या मुख्य ग्रहाचीं भ्रमणें व त्याचीं फलें काय अनुभवास आलीं यासबधानें सूक्ष्म विचार करावा लागतो अशा प्रकारचा उत्कृष्ट प्रयत्न सन १८९६ सालीं आमचे गुरुवर्य कै. जीवनराव त्रिंबक चिटणीस यानीं जुन्या ज्योतिर्मालेच्या अकांत **महाराष्ट्राची** राशी ठरविताना केलेला आहे. तो प्रयत्न म्हणजे

पुढील ज्योतिष्यास एक उत्तम आदर्श आहे परंतु त्याकडे महाराष्ट्रीय किंवा इतर भारतवासीय ज्योतिर्विदांनी आजपर्यंत लक्ष दिलेलें आढळत नाहीं

आमचं आहे तेच खरें आहे अशा वृत्तीच्या गर्तेमध्य अद्यापि भारतवासीय ज्योतिर्विद घोर निद्रेमध्यें पडलेले आढळत आहेत असं येथे नमूद केल्यावाचून राहवत नाही

क चिटणीसाच्या ज्योतिर्मार्तंड्या पहिल्या अंकामधील लेख सविस्तर येथें स्थलाभावास्तव उद्धृत करता येत नाहीं फक्त त्यांनी ज्या ज्या शहराच्या राशी दिल्या आहेत त्या वाचकांच्या सोईकरता दिल्या आहेत हिन्दुस्थानची राशी मकर, तूळ किंवा कन्या यासंबधात विनाकारण वादविवादामध्य कालक्षय *करणें आम्हास योग्य वाटत नाहीं हिंदुस्थान या खंडप्राय देशामध्यें अनेक* राशींचा अनेक निरनिराळीं शहरें व प्रांत आहेत शहराच्या राशी ठरविण्याच्या प्रयत्नाची दिशा वर दर्शविल्याप्रमाणेंच आहे ह्या शहरात महत्त्वाच्या गोष्टी घडत असता त्याच्या राशीमध्यें महत्त्वाचे योग झालेले आढळून येतात सार्वजनिक इमारतीच्या कोनशिला बसविण्याच्या वेळीं, मोठमोठ्या पुलाच्या बांधकामाच्या कोनशिला बसविण्याचे वेळीं, सार्वजनिक इमारती व पूल उघडण्याचे वेळीं, मोठ्या अपघाताचे वेळीं किंवा सार्वजनिक महोत्सवाच्या वेळीं शहराची राशी, लग्न किंवा दशमेंद्री उदय पावत असते, किंवा त्या राशीत रवि किंवा चंद्र असतो असा अनुभव आहे त्याच प्रमाणें त्या राशीमधून अशुभ घडामोडी घडत असतां जसे अग्निप्रलय, मारामाऱ्या, खून, दरोडे पडले असता मंगळ, इमारती पडून प्राणहानि होत असता शनि, भयंकर मोठाले स्फोट होऊन होणारे अपघात व प्राणहानि होत असता हर्शल व मंगळ, धार्मिक उत्सवसमारंभ होत

असता गुरु व मोठाले लग्नसमारंभ किंवा पाहुण्यांना होणाऱ्या जेवणाचे समारंभ, नाटकें वगैरे होत असता शुक्र त्या त्या शहराचे लग्न, दशमकेंद्र, चंद्र व रवि यांचेवरून याप्रमाणें गोचर ग्रहांचीं भ्रमणें होत असलेलीं पाहाण्यास मिळतात. ज्या शहराची राशी ठरवायची असेल त्या ठिकाणीं झालेल्या अनेक महत्त्वाच्या प्रसंगाच्या वेळच्या कुंडल्या काढून कोणती राशी लग्न किंवा दशम केंद्रावर प्रामुख्यानें उदय पावत असते किंवा चंद्र कोणत्या राशींमध्यें आहे हें पाहून नंतर त्या राशींतील ग्रहांचीं भ्रमणें, रविचंद्रांचीं ग्रहणें यांचीं फलें त्या शहरासंबंधानें काय अनुभवास आलीं हें लक्षांत घेऊन राशी नक्की ठरवावी. देश किंवा शहरें यांच्या राशी ठरविण्याचा हा मार्ग सुलभ नाहीं व यास वेळ व श्रम अधिक लागतात हें खरें, परंतु हा मार्ग शास्त्रसंमत आहे, यांत संशय नाहीं.

यासंबंधांत आम्ही जे कांहीं अनुभव घेत आहों व जो हल्लीं अमेरिकन ज्योतिर्विदांनीं अवलंबन केलेला शहराच्या कुंडल्या मांडण्याचा मार्ग आहे तो खालीलप्रमाणें असून त्याच्या आधारानें प्रत्येक प्रांत व शहराची निश्चित कुंडली मांडता येते.

तो मार्ग खालीलप्रमाणें आहे —युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिका— संयुक्त संस्थानयुक्त अमेरिका यामध्यें अनेक प्रांत एकत्र ग्रथित होऊन हें राष्ट्र झालेलें आहे. या राष्ट्रामधील प्रत्येक राष्ट्र जेव्हा जोडलें गेलें किंवा तेथील मोठ्या राजधानीचे शहरामध्यें **म्युनिसिपल कार्पोरेशन** किंवा **नगर पालिका** सुरू करण्यास जो राजसत्तेनें हुकूम अमुक एक तारखेपासून अमुक एक ठिकाणचे कार्पोरेशन अस्तित्वांत येईल त्या दिवसाची माध्यान्ह काळची कुंडली त्या प्रदेशाची जन्मकुंडली आहे असें समजून

जातकविभागामध्यें पुढील कालनिर्णय करिता ज्या गोचर अगर दिनवर्ष पद्धतीप्रमाणें भावीकालामधील अनुभवास येणाऱ्या फलादेशाचा विचार करण्याची प्रथा रूढ होत आहे व तीवरून पुढील भावीकाळासंबधानें विचार करावा. जो काहीं यासंबधात आम्हास अनुभव आला त्यावरून ही पद्धति भारतवर्षामधील हल्लींच्या काळीं जे जे नवीन प्रांत विशिष्ट समयीं अस्तित्वांत आले त्याकाळच्या कुंडल्या घेऊन त्या त्या कुंडल्या त्या त्या प्रांताच्या औपक्रमिक काळच्या कुंडल्या घेऊन त्यावरून फलादेश घेणें, तसेंच ज्या ज्या मोठ्या शहराच्या नगरपालिका किंवा म्युनिसिपल कार्पोरेशन राजशासनानें अस्तित्वात आलीं असतील त्या दिवसाची वेळ मिळाल्यास त्या वेळेची व वेळ नसता मध्याह्नकाळची कुंडली मांडून ती त्या शहराचे शुभाशुभ व भावी कालामधील स्थिती संबधानें ज्ञान होण्याकरिता आम्ही उपयोगात आणणें ही गोष्ट शास्त्राला धरून आहे असें आम्हास वाटतें. कारण या कुंडलीमधील लग्नी दशमस्थेंदी उदय पावणारी राशी व रविचंद्र ज्या राशीमध्यें असतील त्या त्या राशींचा त्या शहराबरोबर अगर प्रांताबरोबर खात्रीचा घनिष्ट संबध असलेला पहावयास मिळतो. पृथ्वीवरील निरनिराळ्या प्रदेशाच्या राशी ठरविण्याकरिता अनेक आंग्ल ज्योतिर्विदानीं प्रयत्न केल्या पन्नास वर्षांमध्यें केलेले पहाण्यास मिळतात, पण त्यामधून सर्वसामान्य अशी अद्याप कोणतीच पद्धति ग्राह्य झालेली नाहीं आंग्ल ज्योतिर्विद् **'सफारिअल'** ( वाल्टर गार्न ओल्ड ) यानें आपल्या " जीओडेटिक इक्विव्हेलंटस ( भूम्याक्ष रेखांश पद्धति )" नावाच्या पुस्तकामध्यें दरेक शहर व प्रदेश याचे दशमावरील तसेंच लग्नावरील राशी अंश खालीलप्रमाणें काढून घेण्याचें सुचविलें असून त्या राशी अंशामधून होणारी ग्रहांची

शुभाशुभ गोचर भ्रमणें तसेंच वरील राशीच्या अंशाबरोबर होणारे शुभाशुभ दृष्टियोग यावरून त्या त्या स्थळीं त्या त्या काळामध्यें होणाऱ्या शुभाशुभ गोष्टींचा विचार करण्यास सांगितले आहे.

या पद्धतीमध्ये इजिप्तमधील **गाझा** येथील मोठा पिरॅमिड ( मिसर देशातील मनोरे ) या स्थानावर म्हणजे पूर्व रेखांश ३० वर वृषभ या स्थिर वाचनाम दर्शविणाऱ्या राशीचा ० अंश मध्यान्हकेन्द्री येतला आहे व त्यामुळें ग्रिनविच मध्यरेषा जेथून हल्लीं रेखांश पूर्व पश्चिम मोजले जातात त्यावर मध्यान्हकेन्द्री मेषराशीचा ० अंश येतो व जसेजसे रेखांश पूर्वेकडे वाढत जातात, त्याप्रमाणें त्या त्या राशीचे अंश वाढवून घेण्यास सांगितलें आहे. पूर्व रेखांश १८० येथें तुला राशीचा ३० वा अंश मध्यान्हकेंद्री येतो व १ अंश पश्चिम रेखांशावर किंवा १८१ अंश रेखांशावर वृश्चिक राशीचा १ ला अंश मध्यान्हकेंद्री येतो. ६० अंश पूर्व रेखांशावर मिथुन राशीचा शून्य अंश मध्यान्हकेंद्री येतो तर ६० पश्चिम रेखांशावर ( १८० + ६० = २४० अंश ) धनुराशीचा शून्य अंश मध्यान्हकेंद्री येतो या दशम स्थानाचे उदित अंशावरून इच्छित स्थळ ज्या अक्षांशावर असेल तेथें या मध्यान्हकेन्द्राचे अंशावर जी राशी अंश कला लग्नकेंद्री त्या अक्षांशाच्या भावसाधन कोष्टकाधारें येत असेल ती राशी व ते अंश त्या स्थळाचे लग्नकेंद्री घ्यावयाचे असतात. याप्रमाणें खालील काही स्थळांचे मध्यान्हकेंद्री व लग्नकेंद्री येणारे राशि अंश कला वाचकाचे सोईकरिता येथे देत आहोंत व त्यावरून कोणालाही आपल्या इच्छित स्थळाच्या मध्यान्हकेन्द्री व लग्नकेंद्री कोणत्या राशीचे अंश राशि येत आहे हें सहज काढता येईल खालीं दर्शविलेले लग्न व दशम याचे राशि अंश कला या सायनपद्धतीप्रमाणें आहेत.

| शहरें | रेखांश | अक्षांश | दशम | लग्न |
|---|---|---|---|---|
| | अं. क. | अं. क. | अं. क. | अं. क. |
| लंडन | ० पू ० | ५१ उ ३२ | मेष. ०—० | कर्क २६-३६ |
| बगदाद | ४४ पू. २५ | ३३ उ. २० | वृषभ १४-२५ | सिंह १९-३७ |
| बर्लीन | १३ पू २४ | ५२ उ. ४५ | मेष १३-२४ | सिंह ६-११ |
| मुंबई | ७२ पू ४९ | १८ उ. ५४ | मिथुन १२ ४९ | कन्या १२-२२ |
| कलकत्ता | ८८ पू २५ | २२ उ. ३० | मिथुन २८ २५ | कन्या २८ १९ |
| दिल्ली | ७७ पू १५ | २८ उ. ३० | मिथुन १७-१५ | कन्या १७-४८ |
| काबूल | ६९ पू ९ | ३४ उ. ३० | मिथुन ९ ०० | कन्या १०-५९ |
| ल्हासा | ९१ पू ५ | २९ उ. २९ | कर्क १ ५ | तुला ०-५७ |
| लिस्बन् | ० प. १० | ३८ उ. ४५ | मीन २९-५० | कर्क १०-३४ |
| मद्रास | ८० पू १४ | १३ उ. ४ | मिथुन २० ४ | कन्या १९-२८ |
| हॉंगकॉंग | १५४ पू. ० | २२ उ. ० | कर्क २४-० | तुला १३ ५५ |
| मॉस्को | ३७ पू. ० | ५६ उ ० | वृषभ ७ ० | सिंह २३-३१ |
| न्यूयॉर्क | ७४ पू ० | ४० उ ४५ | मकर १६-० | मेष २६-१५ |
| पेकिंग | ११६ पू ३० | ४० उ. ० | कर्क २६-३० | तुला २२-४५ |

ही पद्धति अगदींच निर्दोष आहे असें म्हणवत नाहीं. **गाझा** पिरामिडवरच्या मध्यरेषेपासून दशम केंद्रावर वृषभेचा ० अंश घेण्याची कल्पना विचाराती बरोबर आहे असें म्हणण्यास काहीं हरकत नाहीं.

आमच्या मतें नुसती देशाची राशि घेऊन त्यावरून कित्येक ज्योतिर्विद् अमूक एका पाठीमागील घडनेच्या वेळीं साडेसाती होती, आठवा राहू होता, चौथा गुरु होता व मंगळ बारावा होता, म्हणून असे अनिष्ट परिणाम पाठीमागील काळामध्यें घडले म्हणून हीच राशि या देशाची आहे असा कसातरी इतिहासाबरोबर मेळ घालण्याचा प्रयत्न करतात ते बरोबर नाहीं. तसेच आग्ल ग्रंथांमध्ये इ. स. २०० च्या सुमारास झालेल्या टालेमीने आपल्या पुस्तकात दिलेल्या राशि निरयन घेऊन त्यावरून फलादेश

सागण्याचा प्रयत्न करतात तोही बरोबर नाहीं, कारण खुद टाळेमी आपल्या ग्रथामध्यें या राशि वसत सपातापासून विभागात्मक आहेत, अर्थात् त्या सायन आहेत असे स्पष्ट सागत असता आमच्या ज्योतिर्विदांनी त्या निरयन का मानाव्यात ? व कसातरी मागील काळामधील गोष्टींचा मेळ घाळण्याचा का प्रयत्न कराना ? हें एक कोडेंच आहे. आमच्या मतें पूर्वी सागितलेल्याप्रमाणें प्रत्येक प्राताच्या अगर शहराच्या कुन्ल्या तयार करून घऊन त्यावरून भावि येणाऱ्या ग्रहस्थितीचें भविष्य वर्तविणें वरें त्याचप्रमाणे बृहत्-ग्रहाच्या युतिकाळाच्या कुन्ल्या व विशेषत **महापरिवर्तन दर्शविणाऱ्या गुरु शनि-युति** योगाची इच्छित स्थळाची कुंडली घेऊन त्यावरून पुढील येणाऱ्या भावि कालामवर्गानें फलकथन करणें हेंच अत्यत शास्त्रसमत असून त्यानें पुष्कळच अचूक असें भविष्य त्या त्या प्रदेशामवधानें वरता येतें असा आमचा गेल्या ४०।५० वर्षांचा अनुभव आहे वाचकानीं याकडे लक्ष देऊन त्याचा अनुभव घ्याना **गुरु-शनि-युति** योगामवधानें पुढें सविस्तर विवेचन केलेलें आहे तें पाहावें

## भरतखंडांतील कांहीं प्रदेशाच्या व शहराच्या राशी

**भरतखंड**-मकर, **महाराष्ट्र** धनु, **पंजाब**-मीन (परतु शीख जमातीची राशि मेष वाटते )**बंगाल**-मकर, **काठेवाड** धनु, **ओरिसा** वृश्चिक, **पुणे**-कन्या, **नागपूर**-कन्या, **अहमदाबाद**-कन्या, **गुजरात** मिथुन, **सुरत**-वृषभ, **अलाहाबाद**-कुम्भ, **कोल्हापूर** धनु, **जंजिरा**-वृश्चिक, **जळगांव** मिथुन, **बडोदें**-वृषभ, **हैद्राबाद**, **यु. पी.**-कर्क, **बनारस**-मीन, **पानिपत**-मीन, **म्हैसूर**-मेष, **आसाम**-वृश्चिक, **अमृतसर** मेष, **कराची** कर्क, **पंढरपूर**-कर्क,

**द्वारका** वृषभ, **जगन्नाथपुरी**-वृश्चिक, **बदरीकेदार** मीन, **काश्मीर**-कर्क, **नेपाळ**-सिंह, **मुंबई** मिथुन, **नासिक**-सिंह

कै जिवराव चिटणीस यांच्या मतें मुंबई शहराची तुळ राशि आहे मुंबईमधील शेअरबाजार आणि मुंबादेवी येथील सोनें, चांदी कापूस व कापड यांचें मार्केट इत्यादींचा विचार करता त्या स्थळीं तुळ राशि घेणें योग्य या पुस्तकामध्यें आम्ही काहीं शहराच्या विशिष्ट घटनांच्या कुंडल्या देत आहोंत, त्यावरून वाचकांना त्या त्या शहरासंबंधाच्या राशि वगैरे गोष्टींची सहज पूर्ण कल्पना येईल मुंबई शहराच्या लग्नीं आम्ही मिथुन ही राशि का मानीत आहोत त्याचा खुलासा पुढें केलेला पाहाण्यास मिळेल भारतवर्षामधील अनेक प्राचीन व अर्वाचीन प्रसिद्ध शहराच्या राशि ठरविण्याचें काम अत्यंत श्रमाचें आहे आम्हास ज्या ज्या प्रांताच्या व शहराच्या राशि उपलब्ध झाल्या त्या दिल्या आहेत या प्रयत्नाकडे चिकित्सक ज्योतिर्विदांचें लक्ष लागून भारतवर्षामधील निरनिराळ्या शहराच्या राशि उपलब्ध होऊन हल्लींची त्रुटी भरून निघेल अशी आशा करण्यास मुळींच हरकत दिसत नाहीं

प्रकरण आठवें

# संक्रमणादि कुंडल्यांच्या फलादेशाचा विचार कसा करावा?

प्रकरण चौथ्यामध्ये अमान्त किंवा पौर्णिमान्त अर्थात् रवि-चंद्र-युति किंवा रवि-चंद्र-प्रतियोग कोणकोणत्या स्थानामध्यें त्या त्या कुडली-मध्यें पडतो व त्यावरून त्या त्या स्थानानें कोणत्या तऱ्हेचा फलादेश उत्तेजित झालेला पाहाण्यास मिळेल, तसेंच संक्रमण किंवा इतर कुंडल्या-मध्यें निरनिराळ्या भावामध्यें ग्रह आले असतां त्यानें कोणत्या तऱ्हेचा फलादेश अनुभवाला येईल, तसेंच ग्रह आपआपसामध्ये दृष्टयोग करीत असता कोणत्या तऱ्हेची देशामध्यें परिस्थिति उत्पन्न होईल यांचें सविस्तर विवेचन थोडक्यात व सुटसुटीत रीतीनें केलें आहे. आता या प्रकरणामध्यें या कुंडल्या ज्या ज्या स्थळाच्या मांडल्या असतील तेथें या कुंडल्यामधील ग्रहस्थितीमुळें दर्शविला जाणारा फलादेश केव्हा मिळेल व त्याचें निदान कसें करावें या संबंधात काहीं नियम देण्याचे योजीत आहोंत.

प्रथमत वर्षामधील चार महत्वाच्या संक्रमणकाळच्या कुंडल्या मेष, कर्क, तूळ व मकर या इष्ट स्थळाच्या मांडून घेणें, त्यानतर अमान्त व पौर्णिमान्ताच्या कुंडल्या इष्ट स्थळाच्या मांडून घेणें. वर दर्शविल्याप्रमाणें चार संक्रमण कुंडल्यापेक्षा या मासिक अमान्त किंवा पौर्णिमान्ताच्या कुंडल्या कमी महत्वाच्या आहेत. एका अमान्ताच्या कुंडलीचा अमल दुसऱ्या येणाऱ्या अमान्तापर्यंतच राहातो. पौर्णिमान्ताची कुंडली अमान्ताच्या कुंडलीला मदत-रूपानेंच घेणें. अमान्ताच्या कुंडलीचा अमल एक चांद्रमासपर्यंतच राहातो.

रवि-चंद्र-युति ( अमान्त ) किंवा रवि-चंद्र प्रतियोग ( पौर्णिमान्त ) हा वर दर्शविलेल्या रविसंक्रमण कुंडलीमध्यें ज्या स्थानामध्यें किंवा त्या कुंडली-मधील ज्या एकाद्या ग्रहावर पडतो, त्या वेळीं त्या स्थानानें दर्शविले जाणारें फल व ज्या ग्रहावर हा रवि चंद्र-युतियोग पडतो, त्या वेळीं त्या ग्रहाच्या शुभाशुभ धर्माप्रमाणें व तो ग्रह ज्या स्थानामध्यें असतो त्याला अनुसरूनच फलें त्या महिन्यामध्ये अनुभवाला येतात. तसेंच हा रवि चंद्र-संयोग वरील मुख्य चार रविसंक्रमण काळच्या कुंडलीमधील ज्या ज्या ग्रहावरोवर शुभ अगर अशुभ दृष्टियोगानें संबंधित होतो, त्याप्रमाणें शुभाशुभ फलें त्या स्थानाला धरून त्या महिन्यामध्यें अनुभवाला आलेलीं पाहाण्यास मिळतात. जर आपल्याजवळ एकाद्या देशाची किंवा शहराची कुंडली असेल तर त्याही कुंडलीमधील वर्षामध्यें येणारे रवि चंद्र-संयोग कोणत्या स्थानात कोणत्या ग्रहावर पडत आहेत हेंही नीट पाहून त्याप्रमाणे फलादेश घ्यावा.

महणें हीं अमावास्या अगर पौर्णिमेलाच होतात. परंतु **ग्रहणांचा अंमल पुष्कळ महिने किंवा वर्षपर्यंत राहातो. ग्रहणविचार प्रकरण पाहा.**

रवीच्या मुख्य चार संक्रमणकाळाच्या कुंडल्यामध्ये मेषसंक्रमणकाळची कुंडली ही फार महत्त्वाची आहे कारण ही कुंडली वर्षप्रवेश किंवा वर्षाचा आरंभ दर्शविणारी कुंडली असते सौर वर्षाचा आरंभ मेषसंक्रमणापासून होतो. म्हणून वर्षप्रवेशकाळचे अर्थात् मेषसंक्रमणकाळचें इच्छित स्थलावर कोणती राशि उदित होत आहे, याकडे अवश्य लक्ष देणें वर्षप्रवेशकाळच्या कुंडलीच्या लग्नी **स्थिर** राशि उदय पावत असता त्या कुंडलीचा अमल साधारणपणें वर्षअखेर-

पर्यंत राहातो. **द्विस्वभाव** राशि वर्षकुंडलीच्या लग्नीं उदय पावत असतां त्या कुंडलीचा अंमल फक्त सहा महिनेच राहातो ; परंतु जर वर्षप्रवेश-कुंडलीच्या लग्नावर **चर** राशि उदय पावत असेल तर त्या कुंडलीचा अंमल पुढें येणाऱ्या कर्कसंक्रमणकाळाच्या कुंडलीपर्यंत अर्थात् सरासरी तीन महिनेच असलेला पाहाण्यास मिळतो, असा सर्वसाधारण नियम राष्ट्रीय ज्योतिषामध्यें आहे. अर्थात् वर्षप्रवेशकाळच्या कुंडलीमध्यें स्थिर राशि पूर्वकेंद्रावर उदय पावत असतां पुढील तीन संक्रमणकुंडल्यांचा विचार मेषसंक्रमणकाळच्या कुंडलीला पूरक म्हणूनच घेऊन कोणत्या तऱ्हेचा अनुभव येईल हें निश्चित करावें. भारतवर्षामधील पाऊस-पाणी, शेती-भातीचें उत्पन्न व येणारीं पिकें, वगैरेंच्या बोधास **कर्क**संक्रमणाची कुंडली अत्यंत महत्वाची आहे. राजकीय क्षेत्रामध्यें होणाऱ्या घटना, उलाढाली यांचा विचार **मकर**संक्रमणकुंडली मदतीला घेऊन करणें व या मकरसंक्रमणकुंडलीची कालमर्यादा वर मेषसंक्रमणकुंडलीमध्यें सांगितल्याप्रमाणेंच घेणें.

कोणत्याही संक्रमणकुंडलीचा विचार करतां इष्ट स्थलाची कुंडली मांडल्यानंतर रवि कोणत्या स्थानामध्यें येत आहे याचा विचार करावा. कारण संक्रमणकाळाच्या कुंडलीमध्यें रवि ज्या स्थानामध्यें येतो त्या स्थानानें दर्शविल्या जाणाऱ्या गोष्टी त्या त्या संक्रमणकाळाच्या कालखंडांत प्रामुख्यानें अनुभवाला आलेल्या पाहाण्यास मिळतात व हीं फलें त्या स्थानामधील रवि ज्याप्रमाणें इतर ग्रहांबरोबर शुभ अगर पापग्रहानें युक्त किंवा शुभ अगर अशुभ दृष्टियोगानें संबंधित असेल व तो दृष्टियोग करणारा ग्रह ज्या स्थानांत असेल व ज्या स्थानाचा अधिपति असेल त्याला धरूनच शुभ अगर अशुभ फलादेश अनुभवाला येतो.

यानंतर प्रथम स्थान विचाराकरिता घेणें लग्नामध्यें कोणता ग्रह उदित आहे, तसेंच लग्नाधिपति कोठें, कोणत्या स्थानांत, कोणत्या राशीमध्यें आहे याचा विचार करावा कारण हा लग्नाधिपति कांहीं अंशानें वर्षाधिपति असतो व हा लग्नाधिपति ज्याप्रमाणें शुभ अगर अशुभ दृष्टियोगानें संबंधित असेल त्याप्रमाणें त्याचा अनुभव वर सांगितल्याप्रमाणें येणाऱ्या कालखंडामध्ये येतो पापग्रह हा अशुभफलदाता व शुभग्रह शुभफलदाता व उन्नत अवस्था दर्शविणारा असतो व शुभग्रहाच्या योगानें त्या त्या देशांत सुधारणा, स्वास्थ्य व उन्नत स्थिति किंवा प्रगति अनुभवाला येते व देशांतील प्रजा सुखी होते

यानंतर कुंडलीमधील बाकी राहिलेल्या स्थानांचा क्रमाक्रमानें विचार करावा व तो करीत असतां त्या त्या स्थानामध्यें कोणते ग्रह आहेत व ते इतर ग्रहाबरोबर कोणते दृष्टियोग करीत आहेत, ते बलवान आहेत किंवा निर्बल आहेत व कोणाबरोबर शुभ अगर अशुभ दृष्टियोगानें संबंधित होत आहेत, इत्यादि सर्व गोष्टी विचारामध्यें घेऊन नंतर त्या त्या स्थानासंबंधानें कोणत्या तऱ्हेचा अनुभव येईल हें निश्चित करणें

प्रत्येक महिन्याकरितां अर्थात् चांद्रमासाकरितां अमान्तकालाच्या कुंडलीचा विचार करावयाचा असतो व येथेंही या कुंडलीच्या ज्या त्या भावामध्यें जे जे ग्रह येतात व ते जसे शुभ अगर अशुभदृष्टियोगानें संबंधित होतात, त्याप्रमाणें पूर्वी दर्शविलेल्या त्या त्या स्थानासंबंधीं फलाचा अनुभव त्या महिन्यामध्यें आलेला पाहण्यास मिळतो तसेंच दर वर्षामध्यें होणारे बारा–तेरा रवि चंद्र-युतियोग अगर प्रतियोग वर जीं रवीचीं चार महत्त्वाचीं चरराशीमधील संक्रमणें विचारामध्यें घेण्यास सांगितलीं आहेत, त्या त्या नजीकच्या अगर पूर्वीच्या रविसंक्रमणकुंडली-

मध्यें कोणत्या स्थानामध्ये व कोणत्या ग्रहावर किंवा त्या त्या कुंडलीमधील विशिष्टस्थानामधील ग्रहाबरोबर कोणत्या तऱ्हेच्या दृष्टियोगानें संबंधित हे रविचंद्रयोग किंवा प्रतियोग होत आहेत याकडे पूर्ण लक्ष देऊन नंतरच भाविफल त्या महिन्यामध्यें कोणत्या तऱ्हेचें अनुभवास येईल याचा निर्णय करावा. हा विचार करीत असतां त्या त्या संक्रमणकाळचे दशमबिंदु व लग्नबिंदु व इतर ग्रह याचेबरोबर कसकसे दृष्टियोग ते ते रवि-चंद्र-संयोग करीत आहेत याकडे नीट लक्ष देऊनच नंतर फलादेश कोणत्या तऱ्हेचा अनुभवाला येईल याची अटकळ बांधावी.

जेव्हा मेषसंक्रमणकुंडलीचा अंमल तीन महिन्यांपेक्षां जास्त दर्शविला जातो तेव्हा पुढील काळामध्यें येणारीं सूर्यसंक्रमणें या मेषसंक्रमणकाळाच्या कुंडलीला पुरक अशीं घ्यावीं व पुढें येणारे रवि-चंद्र-संयोग हे मेषसंक्रमण कुंडलीबरोबर विचारामध्यें घेऊनच त्यांचा चाद्र संक्रमण कुंडलीबरोबर विचारविनिमय करून नंतर त्या त्या मासामध्यें कोणत्या तऱ्हेचा फलादेश अनुभवांस येईल याची कल्पना करणें. वरील विवेचनावरून वाचकांच्या सहज ध्यानामध्ये येईल कीं रविचंद्रसंयोग किंवा अमान्तकाळाची कुंडली ही जरी त्या चांद्रमासातील फलाचा स्वतंत्र रीतीनें बोध करीत असते तरी रवि-चंद्र-युति ही संक्रमणकाळच्या मेष, कर्क, तुला व मकर कुंडलीमध्यें कोणकोणत्या ग्रहावर पडत आहे किंवा दृष्टियोगानें शुभ अगर अशुभसंबंधित होत आहेत, तसेंच संक्रमणकाळचें उदित लग्न व दशम बिंदूबरोबर कोणत्या तऱ्हेनें शुभ अगर अशुभसंबंधित करीत आहे व त्यायोगानें कोणत्या तऱ्हेच्या फलाचा विकास होऊन त्याचा अनुभव येणार आहे हें दर्शवीत असल्या-कारणानें सर्व गोष्टी विचारामध्यें घेऊनच नंतर प्रत्येक महिन्याच्या फलादेशासंबंधानें अदाज करावयाचा असतो व याप्रमाणें विचार करून केलेल्या फलादेशाचा अंदाज सहसा चुकणार नाहीं.

ज्योतिषशास्त्राधारें कुंडल्यावरून भवितव्य कळण्याकरता ग्रह, राशि आणि द्वादशस्थानें यांचें सम्यक् ज्ञान व्हावें लागतें. ग्रह, राशि व स्थानें यांचे स्वतंत्र गुणधर्म काय आहेत आणि त्यांच्या मिश्रणानें कोणते गुणधर्म उत्पन्न होतात यांचें ज्ञान कुंडलीचा विचार करताना अवश्य असलें पाहिजे. ग्रहादिकांचे प्रत्येकाचे मूळ गुणधर्म आणि निरनिराळ्या योगामुळें अर्थात् दृष्टियोगामुळें त्यांच्या मूळच्या गुणधर्मांत येणारें नानाविधत्व कळणें ही ज्योतिषशास्त्रातील पहिली आणि मुख्य पायरी आहे. येथूनच खऱ्या ज्योतिर्ज्ञानाला प्रारंभ होतो. जातक स्कधामध्यें ज्या तत्वानुरोधानें ग्रहादिकांच्या विविध योगांचें समीकरण करावयाचें असतें, त्याच तत्त्वानुरोधानें मेदिनीय ज्योतिषात समीकरण करावयाचें असतें. ही समीकरण करण्याची कला जितकी निर्दोष असेल तितकें कुंडलीचें ज्ञान अधिक होईल.

मेदिनीय कुंडल्यांचें ज्ञान होण्यास अवश्य असणारी माहिती प्रस्तुत पुस्तकाच्या मागील प्रकरणामध्यें ग्रथित केलेली आहे त्या आधारें प्रथम प्रत्येक कुंडलींतील निरनिराळ्या योगांचीं सामान्य फलें लक्षात घेऊन नंतर त्यांचें एकीकरण करण्याचा प्रयत्न करावा पुष्कळ वेळा परस्परविरोधी योग एकाच कुंडलीमध्यें पाहाण्यास मिळतात, त्यामुळें हें एकीकरणाचें काम अधिक बिकट होतें आणि हें काम सुलभतेनें कसें करावें याचाच येथें विचार करणें आहे

कोणत्याही वर्षाच्या शुभाशुभ फलाचा विचार करण्याकरता ज्या कुंडल्या मांडावयाच्या असतात त्यांचा आरंभ **मेषसंक्रमण** काळाच्या कुंडलीपासून होतो. या संक्रमणाच्या नंतर महत्त्वाच्या दृष्टीनें कर्क, तूळ व मकर हीं संक्रमणें आहेत. सौर वर्षारंभ मेष संक्रमणा-

पासून करण्याची सर्वत्र प्रथा आहे. अर्थात् या कुंडलीवरून सर्व वर्षामध्यें होणाऱ्या घडामोडींचा विचार करून फलादेश घेण्याची प्रथा आहे. परंतु आर्य लोकांनीं **मकरसंक्रमणाला** अत्यंत महत्व दिलेलें आहे व तेंही आमच्या मतें योग्यच आहे. राशिचक्रामधील मकर ही दशमस्थान, राजसंस्था, अधिकारदर्शक, राशि असल्याकारणानें देशामधील राजकीय परिस्थितीसंबंधानें मकरसंक्रमणाचा अत्यंत बारकाईनें विचार केला पाहिजे. मेष व मकरसंक्रमणाचा अंमल वर्षअखेरपर्यंत म्हणजे त्या संक्रमणापुढें येणाऱ्या त्याच संक्रमण-कालापर्यंत घ्यावा लागतो. साधारणपणें पूर्वीं निवेदन केल्याप्रमाणेंच या दोन संक्रमणांचा अंमल फक्त तीन महिन्यांपुरताच आहे असें मानून चालतां येत नाहीं. दर वर्षामधील वरील चार संक्रमणें, वर्षामध्यें होणारे सर्व रवि-चंद्र-संयोग, ग्रहणें, वर्षामध्यें दुसऱ्या ग्रहांचे होणारे युतियोग, या सर्वांच्या कुंडल्या तयार करून घेतल्या पाहिजेत. मेष संक्रमणावरून राजकीय, सामाजिक, इत्यादि त्या वर्षामध्यें घडणाऱ्या घटनांचा बोध चांगला होतो, तर कांहीं प्रसंगीं तसा बोध होत नाहीं. या वेळीं या संक्रमणाचा अंमल तीन महिनेपर्यंत असलेला आढळतो. ज्या वेळीं या संक्रमणाचा अंमल वर्षभर असतो त्या वेळीं बाकीचीं संक्रमणें दुय्यम दर्जाचीं असतात.

मेष संक्रमणाच्या कुंडलीचा अंमल वर्षभर केव्हां असतो व वर्षाहून कमी केव्हां असतो, यासंबंधानें कोणीही अद्यापपर्यंत निश्चित असें लिहिलेलें नाहीं. आम्हांस जो थोडाबहुत अनुभव आला आहे, त्यावरून असें वाटतें कीं, ज्या वेळीं वर्षकुंडलीच्या केन्द्रकोणामध्यें ग्रहाधिक्य असनें आणि शुभाशुभ दृष्टियोगसुद्धां पुष्कळच झालेले असतात

त्या वेळीं मेष व मकर सक्रमणाच्या कुन्ल्याचा अमल वर्षभर टिकतो ज्या कुन्लीचा अमल वर्षभर टिकतो त्या कुडलीमध्यें दृष्टियोग पुष्कळ तर असतात, परतु ते थोड्यावहुत प्रमाणानें अशा मक असतात थोडक्यात सागावयाचें म्हणजे जातकातील पुष्कळ घडामोडीदर्शक कुन्ली ज्या तन्हेची असते त्या तन्हेची कुडली मेष अगर मकर सक्रमणाची असल्यास तिचा अमल सर्व वर्षभर टिकतो ज्या कुडलीमध्यें केन्द्रामध्यें ग्रह नसतात व दृष्टियोगसुद्धा थोडेच असून त्यातील अतर फार असतें त्या वर्षकुडलीचा अमल तीन महिन्यांपेक्षा जास्त असत नाहीं

कुडलीमध्ये साधारणपणें परस्परविरोधी योग हे असावयाचेच वर्ष कुडलीमध्यें परस्परविरोधी योग झालेले असून त्यानतर होणाऱ्या सक्रमण कुडल्यामध्येंही जर वर्षकालीन झालेल्या काहीं योगाच्या विरुद्ध झालेले असतील तर त्याचा मेळ कसा घालावा, कोणत्या योगास अधिक महत्त्व द्यावें, कोणत्या योगाचीं फळें केव्हा मिळतील, वगैरे प्रश्न मेदिनीय ज्योतिषात फार महत्त्वाचे आहेत मेदिनीय कुन्ल्याचा विचार करताना हे प्रश्न कसे उद्भवतात व त्याचें निराकरण कसें करता येतें हें एक उदाहरण घेऊनच दाखवितों एखाद्या वर्ष कुडलीमध्यें धनस्थानीं मगळ हर्शलची युति आहे व या युतीबरोबर कोणत्याही ग्रहाचा शुभ दृष्टियोग होत नाहीं अर्थात् हा योग देशातील सपत्ति, व्यापार, धनोत्पादक धदे, वगैरे गोष्टींना प्रतिकूल आहे त्याच कुडलीमध्यें धनेश हा गुरूबरोबर शुभ दृष्टियोग करीत असून राशिबली व स्थानबली आहे, म्हणजे एकाच कुडलीमध्यें धनस्थानासंबधानें स्वतत्र असे दोन परस्परविरोधी योग झाले आहेत, असें दिसून येइल धनस्थानात असलेल्या ग्रहापैकीं कोणत्याही एका ग्रहा-बरोबर धनेश किंवा सपत्तिकारक ग्रह गुरु याचा शुभयोग झाला

असता तर अनिष्ट योगाची तीव्रता कमी झाली असती आणि शुभ व अशुभ असे दोन स्वतंत्र योग झाले नसते, फक्त तीव्रता कमी झालेला अशुभ योग एवढाच एक योग झाला असता परंतु धनस्थानातील पीडित ग्रहाबरोबर धनेश किंवा गुरु शुभ दृष्टियोग करीत नसल्यामुळें संपत्तिदर्शक असे दोन स्वतंत्र योग घडून आले आहेत व त्याचीं फलें स्वतंत्रपणें अनुभवास आलेलीं पाहाण्यास सापडतात. संक्रमण कुंडल्यांनीं दर्शविलेलीं फलें केव्हा व कोणत्या दिवशीं अनुभवास येतील यासंबंधांत पुढें विवेचन केलेलें आहे तें पाहावें

मेदिनीय ज्योतिष विभागात तसेंच इतर फलज्योतिषशास्त्राच्या विभागामध्यें कुंडलीमधील द्वादशस्थानांपैकीं प्रत्येक स्थानामध्यें अनेक गोष्टी समाविष्ट केलेल्या आढळतील यापैकीं कुंडलीचा विचार करतेवेळीं अमूकच एक निश्चित अशी कोणती गोष्ट घडेल हें कोडें कसें सोडवावें असा प्रश्न सहज विद्यार्थ्यांसमोर उभा राहाणें शक्य आहे व त्यासंबंधानें खुलासा न करता तसेंच पुढें घडणाऱ्या गोष्टी केव्हा घडतील या कालनिदानाकडे वळणें योग्य होणार नाहीं करिता त्यासंबंधानें थोडक्यात आम्ही आमचे विचार येथें नमूद करीत आहोंत व त्या दृष्टीनें विद्यार्थ्यांनीं विचार केला असता त्यांना पुष्कळशा अंशानें होणाऱ्या घटनेचें निश्चित अनुमान बांधता येईल

संक्रमणकाळाच्या किंवा इतर मेदिनीय ज्योतिषसंबंधीं भविष्य करण्याकरिता विचारामध्यें घेणाऱ्या कुंडल्यामध्यें एखाद्या स्थानामध्यें असलेला ग्रह कोणकोणत्या गोष्टींचा कारक आहे, तो कोणत्या राशीमध्यें आहे व इतर ग्रहाबरोबर दृष्टियोगानें तो कसा संबंधित आहे, तसाच तो कुंडलीमधील कोणत्या स्थानाचा अधिपति आहे व तो कोणत्या स्थानामध्यें

आहे, इत्यादि सर्व विचारामध्ये घेऊन नतरच त्या ग्रहाचें स्थानफल निश्चित करावयाचें असतें. उदाहरणार्थ बुध हा (मेषसंक्रमण काळाच्या किंवा मकरसंक्रमण काळच्या) वर्ष कुंडलीमध्यें नवमस्थानामध्यें असता या स्थानानें ग्रथप्रकाशन, लाबचे प्रवास, विश्वविद्यालय, इत्यादिकांचा बोध केला जातो म्हणून या स्थानामध्यें शुभसबधित असलेला बुध वाङ्मयविकास, सशोधन, त्यावर ग्रथप्रकाशन, विश्वविद्यालयीन नूतन अभ्यासक्रम किंवा सशोधन, इत्यादि सबधानें घटनांचा बोध करील किंवा दूरदेशस्थ प्रवास, त्यासबधानें करारमदार, इत्यादि गोष्टी घडवून आणील, तर या स्थानामध्यें गुरु असता तो धार्मिक विषय, आध्यात्मविषयावरील ग्रथप्रकाशन, देवळें, मदिरें, धार्मिक आचारविचार, पथ या सबधित गोष्टींचा सबध आणील. परतु या स्थानामध्यें चद्र असता तो नौकानयन, समुद्रावरून जहाजें, आगबोटी, इत्यादि सबधानें होणाऱ्या व्यवहाराचा बोध करील अष्टमाधिपति अग्नी राशीमध्यें दशमस्थानामध्यें आला असता राजघराण्यामधील व्यक्ति अगर अधिकारी वर्गामधील श्रेष्ठ माणसाचे मृत्यु घडलेले पाहाण्यास मिळतात परतु तोच अष्टमेश दशमात वृषभ राशीचा असता देशामधील मोठा सावकार, मोठा स्टॉकब्रोकर-शेअर दलाल किंवा देशामधील अत्यत धनाढ्य अशा माणसाचा मृत्यु घडतो. परतु तोच अष्टमेश मिथुन राशीमध्ये दशमात अशुभ सबधित असता देशामधील उत्तम वाङ्मयसेवक, प्रसिद्ध ग्रथकार किंवा प्रसिद्ध वर्तमान-पत्राच्या मुख्य सपादकाचा मृत्यु घडलेला आढळतो

मेदिनीय कुडल्यामध्यें साधारणपणें दशम स्थानावरून राजपुरुष, राजघराणें याचा बोध केला जातो, परतु अलीकडच्या युगामध्यें राजसत्ता नष्ट होत असून ती सत्ता आता देशामधील लोकसभेच्या स्वाधीन होत

असल्याकारणानें या स्थानावरून लोकसभेचा प्रधानमंत्री व त्याचें कार्यकारी मंडळ यांचा विचार करावा.

सर्वसाधारणपणें कुंडलीमधील चार केन्द्रें हीं फार महत्त्वाचीं आढळतात. त्यानंतर कित्येक ज्योतिर्विद् नवम व एकादश स्थानाला महत्त्व देतात तर काहीं ज्योतिर्विद् केन्द्रानंतर द्वितीय, पंचम, अष्टम व एकादश हीं स्थानें घेतात व तृतीय, षष्ठ, नवम व द्वादशस्थानें यांना स्थान बलामध्यें शेवटचे मानतात. परंतु फलज्योतिषशास्त्रामध्यें प्रत्येक स्थान त्या त्या दृष्टीने विशिष्ट महत्त्वाचें आहे. येथें इतकेंच म्हणतां येईल कीं केन्द्रामध्ये असणाऱ्या ग्रहांचा परिणाम तडकाफडकीं जोरदारपणें अनुभवास आलेला पाहाण्यास मिळतो. कुंडलीमधील द्वादशस्थानें ज्या ज्या गोष्टींचा बोध करितात त्याच सर्व गोष्टी तत्स्थानदर्शक राशीवरून घ्याव्यात. उदाहरणार्थ, मेष राशि ही प्रथमस्थान ज्या गोष्टी दर्शविते त्याच सर्व गोष्टींचा बोध करते, तर वृषभ राशि धनस्थानदर्शक गोष्टी दाखविते. याप्रमाणें सर्व राशींसंबंधानें घेणें. तसेंच ग्रहांना ज्या राशीमध्ये बल असतें तेंच बल त्या राशीनें दर्शक स्थानासंबंधानें घेणें. उदाहरणार्थ, गुरु हा कर्कमध्यें उच्च क्षेत्रीं असतो. अर्थात् त्यामुळें तो कोणत्याही राशीचा चतुर्थामध्यें अशुभ दृष्टियोगाने पीडित नसतां तेथें बलवान् मानावा. सूर्य व मंगळ हे प्रथमस्थानामध्ये बलवान् असतात, तर चंद्र व शुक्र धनस्थानामध्यें बलवान् मानावेत. अर्थात शुभ फलादेश घेण्याकरता ते इतर पापग्रहाच्या अशुभ दृष्टियोगानें पीडित नसावेत. ग्रहाचा राशि फलादेश हा सर्वसाधारण स्वरूपाचा व्यापक असतो परंतु याच्या उलट एखाद्या स्थानामध्ये येणारा ग्रह त्या स्थानदर्शक विशिष्ट क्षेत्रातच अनुभवास येणाऱ्या फलाचा बोध करतो. उदाहरणार्थ

मकर राशीमधून होणारे हर्शल अगर प्रजापतीचे गोचर भ्रमण हें सर्वसाधारणपणें मकर या दशमस्थान द्योतक राशीप्रमाणें पृथ्वीतलावरील राजेमहाराजे व राजकारण यामध्यें घडामोडी दर्शविणारें आहे परंतु मकर ही राशि ज्या देशाची असेल तेथील राजसत्तेमध्यें हर्शलच्या गुणधर्माप्रमाणें व तो जसा शुभ अगर अशुभ दृष्टियोगानें संबंधित असेल त्याप्रमाणें त्या देशाच्या राजकारणामध्यें क्रांतिकारक फेरफार झालेले पाहाण्यास मिळतील, व ज्या देशाच्या संक्रमणकाळाच्या कुंडल्यामध्यें हर्शल दशमस्थानामध्यें येईल तेथें त्या विशिष्ट प्रदेशाच्या राजकारणामध्यें हर्शलच्या स्थितीप्रमाणे फेरफार झालेले पाहाण्यास मिळतील

प्रकरण नववें

# कालनिर्णय

संक्रमणानें दर्शित झालेला फलादेश केव्हा व कोणत्या महिन्यात व कोणत्या दिवशीं घडेल किंवा अनुभवास येईल हें कसें ठरवावें व त्यासंबधात कोणत्या गोष्टींकडे विशेष लक्ष दिले पाहिजे, इत्यादि संबधात विद्यार्थ्यापुढें प्रश्न उभा राहणें शक्य आहे व त्यासंबधात आम्ही आमच्या अनुभवाला उतरलेली माहिती त्याच्या पुढें ठेवीत आहोंत, त्याचा त्यांनीं अनुभव घ्यावा

प्रथमत मेष किंवा इतर चार संक्रमणें जीं वर्षामध्यें येतात त्याच्या कुंडल्या तयार करून घेतल्यानतर प्रत्येक रवि चद्र सयोग हा त्या कुंडली मधील कोणत्या ग्रहावर पडत आहे व त्या ग्रहाचें कुंडलीमधील कोणतें स्थान आहे, तो ग्रह शुभ आहे किंवा अशुभ आहे, तसाच पापदृष्टियोगानें संबधित आहे किंवा शुभ दृष्टियोगानें संबधित आहे हें पाहून त्याप्रमाणें त्या रवि चद्र-सयोगाचे काळामध्यें त्या ग्रहानें दर्शविलेला फलादेश अनुभवास आलेला पाहाण्यास मिळेल तसेंच मुख्य कुंडल्यामधील चार केन्द्रावर उदित असणारे अश गोचर ग्रहाच्या अशुभ दृष्टियोगानें पीडित होत असता तत्केन्द्रदर्शक गोष्टी त्या ग्रहाचे गोचर भ्रमण होणाऱ्या तारखेच्या सुमारास त्या देशात अशुभ घटना झालेली पाहाण्यास मिळते शुभयोगसबंध घडत असता शुभ फलादेश अनुभवास येतो तसें चार केन्द्रावरून गोचर ग्रहाचीं भ्रमणेंही लक्षात घेऊन कोणतें केन्द्र उत्तेजित होत आहे तें लक्षात घेऊन, तसेंच गोचरीनें ज्या ग्रहाचें भ्रमण होत असतें त्याच्या शुभाशुभ धर्माप्रमाणें तत् तारखेच्या सुमारास देशात

तत्द्योतक घटना घडून आलेल्या पाहाण्यास मिळतात, अर्थात् मेष व मकरसंक्रमण कुंडल्यामध्ये रविचंद्रसंयोग व गोचर ग्रहांची भ्रमणें हीं सबंध वर्षभरातील लक्षांत घेऊन फलादेश घ्यावयाचा असतो. इतकेंच नव्हे, तर वरील कुंडल्यामधून ज्या ज्या दिवशीं गोचर रवि कुंडल्यामधील ग्रहावरोबर शुभाशुभ दृष्टियोग वगैरे करतो त्या त्या दिवशीं ह्या कुंडल्या ज्या ज्या प्रदेशाकरिता मांडलेल्या असतात तेथे तेथें त्याचा चांगला अनुभव पाहाण्यास मिळतो, इतकेंच नव्हे, तर रविचंद्रसंयोग कुंडलीचा अमल फक्त पुढील रविचंद्रसंयोग येईपर्यंतच असतो, हें जरी खरें आहे, तरी जर नजीकच्या काळामध्यें एखाद्या गोचर ग्रहाचें भ्रमण त्या कुंडलीच्या केन्द्राच्या उदित अंशावरून किंवा रविचंद्रसंयोगावरून होत असेल तर त्या सुमारास त्या योगाचा अनुभव येतो. रविचंद्र संयोगकाळीं सूर्यग्रहण व प्रतियोगकाळीं चन्द्रग्रहण झालेलें असेल तर त्या कुंडल्याचा परिणाम बराच काळपर्यंत राहातो. अर्थात् त्यामुळें ग्रहणकाळचे रविचंद्रसंयोगाचे अंश, प्रतियोगाचे अंश, त्या कुंडल्याच्या केन्द्रावरील अंश, ह्यावरून पुढील दोन-तीन वर्षांमध्यें होणारीं गोचर ग्रहांचीं भ्रमणें लक्षांत घेऊन त्या ग्रहणाचा फलादेश केव्हा, कोणत्या वेळीं अनुभवास येईल व तो कोणत्या तऱ्हेचा असेल हें निश्चित करावयाचें असतें. ह्यावरून वाचकांच्या ध्यानीं येईल, कीं मेदिनीय ज्योतिषामध्यें संक्रमणकाळच्या कुंडल्या, ग्रहणकाळच्या कुंडल्या, तसेच त्या वर्षामध्यें होणाऱ्या ग्रहांच्या युतियोगाच्या कुंडलीमधील फलागम, केव्हा अनुभवास येईल हें पुढें होणाऱ्या गोचर ग्रहांच्या भ्रमणावरून निश्चित ठरवावयाचें असतें. असो. आता आपण वरील संक्रमण-कुंडल्यांखेरीज आणखी कोणकोणत्या कुंडल्या राष्ट्रीय भविष्य करताना विचारामध्यें घ्याव्या लागतात ह्याकडे वळू या.

# राष्ट्रीय भविष्यें करतांना आणखी कोणकोणत्या कुंडल्या विचारामध्यें घ्याव्या लागतात ?

ज्या वर्षासंबधानें राष्ट्रीय भविष्य करावयाचें असतें त्या वर्षामध्ये येणारीं रवीचीं चार संक्रमणें, अमान्त-पौर्णिमान्त काळच्या व त्या वर्षामध्यें होणाऱ्या मोठ्या ग्रहाच्या युतिकाळच्या कुंडल्या विचारामध्यें घेऊनच भावी घडामोडींचीं भविष्यें वर्तवावयाचीं असतात व त्यासंबधानें तत्कुंडल्यामधील भावफळें व दृष्टिफळें काय दर्शवितात व दर्शविगाऱ्या गोष्टी केव्हा घडतील, इत्यादि कालनिदान कसे करावें ह्यासंबधात सविस्तर विवेचन पूर्वीच्या प्रकरणामध्यें केलेलें आहे. तसेच ग्रहाच्या युतियोगासंबधानेंही विवेचन पुढें केलेले आहे. दीर्घकालीन देशव्यापक घटनाचा विचार करण्याकरिता गुरु-शनि ह्या दोन ग्रहाचा महापरिवर्तन युतियोग किती महत्वाचा आहे ह्याचा विचार पुढील प्रकरणामध्यें केलेला विद्यार्थीवर्गाला पाहाण्यास मिळेल.

राष्ट्रासंबधानें फलादेशाचा विचार करताना आणखी काहीं महत्वाच्या गोष्टींकडे लक्ष द्यावें लागतें व त्यासंबधात येथें विवेचन करणें क्रमप्राप्त आहे; कारण त्यानें त्या राष्ट्रासंबधानें निश्चित असे भविष्य करण्यास मदत होते; इतकेंच नव्हे, तर त्या देशामधील घडणाऱ्या गोष्टींसंबधानें निश्चित असे कालज्ञान होण्यास मदत होते

राष्ट्रीय भविष्यांचा विचार करतेवेळीं खालील दर्शविलेल्या कुंडल्या विचारामध्यें घेणें हें केव्हाही मदतरूपच ठरतें

( १ ) देशाच्या राजधानीच्या शहराच्या स्थापनकाळची कुडली ही फारच महत्त्वाची आहे व ती अनेक ऐतिहासिक घटनावरून किंवा इतर साधनें लक्षात घेऊन, उदाहरणार्थ, देशाचा ध्वज, त्यावरील, तसेंच त्या देशाच्या नाण्यावर असलेल्या चिन्हावरून, देशाची भौगोलिक परिस्थिति व देशात उत्पन्न होणारे विशिष्ट पदार्थ, खनिज संपत्ति, इत्यादींवरून देशाच्या राशीची अगर त्या देशाच्या लग्नावरील उदित राशीच्या अंशाची, वगैरेची कल्पना करता येते. परंतु हें कार्य जितकें दिसतें तितकें सोपे नाही. त्याला कुशाग्र बुद्धि व पाठीमागील ग्रहस्थिति उत्तम तऱ्हेनें जाणण्याच्या ज्ञानाची आवश्यकता असते व हा खटाटोप दरेक ज्योतिर्विद्यार्थ्याला साधणारा नाहीं ह्याकरिता आमच्या अनुभवाप्रमाणें प्रत्येक शहरामध्यें ज्या ज्या वेळीं **नगरपालिका** किंवा म्युनिसिपल कार्पोरेशन स्थापन करण्यात येऊन त्याना प्रचलित राजसत्तेनें ज्या तारखेपासून *मान्यता दिली त्या तारखेच्या आरंभाची अर्थात्* रात्रीच्या बारा वाजण्याची, त्या शहराच्या अक्षांश-रेखांशावरून कुंडली मांडून घ्यावी. ह्या कुंडलीवरून त्या प्रदेशासंबंधानें केलेलीं भविष्यें पुष्कळच अनुभवास येतात

( २ ) पृथ्वीवरील अज्ञात असे प्रदेश प्रथम चौदाव्या पंधराव्या शतकात शोधले गेले आहेत. त्या दिवसाच्या विशिष्ट वेळेच्या किंवा दुपारच्या बारा वाजण्याच्या वेळेच्या कुंडल्याही त्या प्रदेशासंबंधानें भविष्य करण्यास मदतरूप होतात.

( ३ ) *कांहीं प्रदेशाना ते ज्या राज्यसत्तेच्या ताब्यामध्यें* काहीं शतकें होते, व अखेरीस त्या राजसत्तेनें तेथील प्रजेला ज्या दिवशीं राजसत्ता अर्पण केली त्या दिवसाची कुंडलीही त्या प्रदेशाच्या राजकीय घडामोडींचा विचार करतेवेळीं अवश्य विचारामध्यें घ्यावी चालू दिसाच्या

शतकामध्ये असे अनेक देश स्वतंत्र झालेले आहेत हे जे देश ज्या तारखेपासून स्वतंत्र झाले आहेत त्या तारखेच्या आरंभकाळाची, त्या त्या देशाच्या राजधानीच्या शहराची कुंडली माडून घ्यावी तारखेचा आरंभ मध्यरात्रीपासून होतो म्हणून पूर्वतारीख रात्री बारा वाजता संपते व नवी तारीख मध्यरात्री बारा वाजून एक मिनिटाने सुरू होते, त्या काळची कुंडली माडून घ्यावी

( ४ ) काही देश राजकीय फरमान ( ऑफीशिअल बुलेटिन ) काढून विशिष्ट तारखेच्या विशिष्ट वेळी आपली नवीन राजकीय घटना राजधानीच्या शहरात जाहीर करतात, त्या दिवसाची व इष्ट वेळेची त्या राजधानीच्या शहराची कुंडली माडून विचारात घ्यावी

ह्याप्रमाणे त्या त्या देशासंबंधी येणाऱ्या कुंडल्याना **औपक्रमिक कालच्या कुंडल्या** किंवा **उपक्रम काल कुंडल्या** ह्या नावाने राष्ट्रीय ज्योतिषामध्ये संबोधिले जाते ह्या कुंडल्या आकस्मिक, अवचित, दैवघटित किंवा यदृच्छाजात कुंडल्या म्हणून मानण्याची प्रथा रूढ होऊ पाहात आहे

( ५ ) राष्ट्रावर राज्य करणारे अगर राष्ट्राधिपति, प्रधान मंत्री ह्याच्या कुंडल्यांमधील ग्रहस्थितीचा जसा त्याच्या व्यक्तित्वावर परिणाम घडतो तसा ते ज्या राज्याचा शकट चालवीत असतात, त्या राज्यावरही त्याच्या कुंडलीमधील ग्रहस्थितीचा परिणाम झालेला पाहाण्यास मिळतो.

वरील कुंडल्यांचा चार केन्द्रांच्या आधारावरून किंवा रविचराच्या आधारावरून गोचरीने ज्या ज्या ग्रहाची भ्रमणे होतात त्या वेळी त्या त्या देशामध्ये गोचर ग्रहाच्या शुभाशुभ भ्रमणाप्रमाणे व गोचरीने ज्या ज्या

केन्द्राच्या अशावरून भ्रमण होत असतें तद्योतक फलें अनुभवाला येतात. इतकेंच नव्हे, तर सव्य अगर अपसव्य पद्धतीप्रमाणें येणाऱ्या दिनवर्ष पद्धतीच्या कालदर्शिकांचीही फलें अनुभवास येतात.

वरील विवेचनावरून वाचकाच्या ध्यानामध्यें येईल, कीं मेदिनीय किंवा राष्ट्रीय भविष्य करतेवेळीं नुसत्या संक्रमणकाळच्या किंवा अमान्त कुंडल्याचा विचार करूनच त्या देशासंबंधानें सविस्तर भविष्यें करणें शक्य होणार नाहीं व त्यामुळेंच येणाऱ्या परिस्थितीचा पूर्णपणें बोध होणें शक्य नाहीं. ह्या पुस्तकामध्यें कांहीं देशाच्या **औपक्रमिक कालांच्या कुंडल्यांचे** लग्न दशम भाव व स्पष्ट ग्रह दिलेले आहेत. त्यावरून कोणाही विद्यार्थ्याला त्या त्या वेळेची स्पष्ट सायन भावचलित कुंडली अभ्यासाकरिता सहज तयार करून घेता येईल.

# ग्रहांचीं भ्रमणें व युतियोग

राष्ट्रीय ज्योतिषात संक्रमणादिकांच्या विचाराबरोबरच मुख्य ग्रहांचीं भ्रमणें कोणत्या राशींतून होत आहेत हेंही लक्षात घेतलें पाहिजे. मुख्य ग्रहांचीं भ्रमणें व युतियोग ज्या राशींतून होत असतात, त्या राशीच्या अमलाखालच्या प्रदेशावर किंवा शहरावर त्याचे इष्टानिष्ट परिणाम घडून येतात. मागील प्रकरणात कोणते देश व कोणतीं शहरें कोणत्या राशींच्या अमलाखालीं आहेत हें सांगितलें आहे. ग्रहाच्या भ्रमणाची व युतियोगाचीं फलें कळलीं असता वाचतांना त्या प्रदेशामध्ये कसा अनुभव येईल ह्याची कल्पना सहज करता येईल.

## (अ) गोचर ग्रहांचा परिणाम

**मंगळ** हा ग्रह एका राशीमध्यें सरासरी दीड महिना राहातो व जेंव्हा हा वक्री होतो तेव्हा तो एका राशीमध्ये बराच काळ असतो. ह्या ग्रहाच्या स्तंभी होण्याच्या वेळीं तो ज्याप्रमाणें इतर ग्रहाबरोबर अशुभ दृष्टयोगानें संबंधित होतो, त्या वेळीं त्याचीं फार अनिष्ट फळें तो ज्या राशीमध्यें असतो त्या प्रदेशावर किंवा शहरावर घडतात. वक्री मंगळ मागें पुढें होत बराच काळ म्हणजे ४।५ महिने एकाच राशींत आढळतो. युजरस्तंभाकडे विशेष लक्ष द्यावें. हा ग्रह अग्निप्रलय, दरोडे, चोऱ्या, मारामाऱ्या, खून, अत्याचार व लढाया ह्यांचा कारक आहे. त्यामुळें त्या त्या राशीनें दर्शविल्या जाणाऱ्या प्रदेशामध्ये भाडणतंटे, अत्याचार, लढाया, वगैरे झाल्याचे पाहाण्यात मिळतात.

**गुरु** ज्या राशींतून भ्रमण करतो त्या राशीच्या अमलाखालचे प्रदेश, शहरें, उद्योगधंदे ह्यांची भरभराट होते. व्यापार व उद्योगधंदे वाढतात.

देशामध्य स्वस्ताइ व आरोग्य ह्याची वृद्धि होते महत्त्वाच्या सुधारणा केल्या जातात शिक्षण व धार्मिक आचारविचाराचा विशेष प्रसार होतो त्या देशामधील नाण्याची व परदेशाबरोबरील व्यापाराची स्थिति चागली राहाते परतु हा ग्रह अशुभदृष्टियोगानें पीडित असता वर दर्शविलेल्या सर्व गोष्टींमध्य हानि दर्शवितो

**शनि** हा ज्योतिर्विज्ञानामध्ये खल ग्रह मानला असून तो मदगतिग्रह आहे त्यामुळें दीर्घकाळ राहाणारे अडथळे, रोगराइ, असतोष, खिन्नता ह्याची तो ज्या राशीमधून भ्रमण करतो तेथे मोठी परपरा उत्पन्न करतो अशुभदृष्टियोगानें सबधित असता हा ग्रह त्या प्रदेशावर सकटाची खैरात करतो परतु शुभदृष्टियोगानें सबधित असता फारच दीर्घकाळ राहाणाऱ्या सुधारणा व तेथील व्यापारधदा, रोजगार ह्याना स्थिरता आणतो

**हर्शल** अथवा **प्रजापति** ह्याच्या भ्रमणामुळें देशातील राजव्यवस्थेमध्ये मोठी चळवळी सुरू होतात प्रजापक्ष जोरानें काम करू लागतो अशुभ ग्रहानें युक्त व अशुभ दृष्टियोगानें सबधित असता त्या राशीनें दर्शविलेल्या प्रदेशावर किंवा देशावर आकस्मिक सकटें येतात पण शुभसबधित असता त्या त्या देशामध्य महत्त्वाच्या सुधारणा होतात देशात नवीन रेल्वे, यात्रिक कारखाने व उद्योगधदे अस्तित्वात येतात देश समृद्धीच्या व प्रगतीच्या मार्गावर जातो ज्या वेळीं हर्शल पीडित होतो, त्या वेळीं तटे, सप, हरताळ, दगे, मारामाऱ्या ह्याना ऊत येतो हा काळ घडामोडीचा असतो इतिहासामध्यें नमूद करण्यासारखे फरक ह्या काळात घडतात प्रचलित राजसत्ता उलटून पाडण्याचा प्रयत्न केला जातो

**नेपच्यून** अथवा **वरुण** हा ग्रह जेव्हा जेव्हा मंगळ, हर्शल व शनि ह्याच्याबरोबर अशुभ दृष्टियोगानें संबंधित होतो तेव्हा तो ज्या राशीमध्यें असतो तद्द्योतक देशाच्या विभागामध्यें अत्यंत अशुभ फलें दर्शवितो. परंतु शुभ ग्रहयुक्त किंवा शुभ दृष्टियोगानें संबंधित होत असता फारच चांगलीं फलें दर्शवितो. त्या त्या देशामधील कलाकौशल्य, ललित वाङ्मय ह्याची वृद्धि करतो उद्योगधंदे चांगले चालतात व तो देश समृद्धीच्या मार्गावर जातो.

**प्लुटो** हा ग्रह नुकताच सापडला असल्याकारणानें व तो एका राशीमध्यें दीर्घकाळ राहात असल्याकारणानें त्याच्या फलादेशासंबंधानें आज निश्चित असें काहींच सांगता येत नाहीं. ह्या ग्रहामध्यें मंगळाचे गुणधर्म व वृश्चिक राशीचे गुणधर्म पाहाण्यास मिळतात. त्यामुळें ज्या राशीमध्यें हा ग्रह, मंगळ, शनि, हर्शल किंवा नेपच्यूननें युक्त होतो किंवा वरील ग्रहांबरोबर अशुभ दृष्टियोगानें संबंधित होत असतो, तद्द्योतक राशीच्या देशामध्यें अनिष्ट फलें अनुभवास येतील.

देशाच्या किंवा शहराच्या राशीपासूनच्या द्वादश स्थानातून होणाऱ्या भ्रमणावरूनसुद्धा काहीं ज्योतिषी फलें वर्तवितात, परंतु आमच्या मतें हीं फलें साधारण सूचक मानावींत केन्द्राच्या अंशावरून होणाऱ्या भ्रमणाचा अनुभव स्पष्टपणें येतो. ह्या योगानें ज्या शहराच्या राशींचे अंश माहिती असतात त्या शहराच्या अक्षांशावरील कुंडली मांडून भविष्य वर्तविण्यास बरीच मदत होते. उदाहरणार्थ, लंडन शहराचें लग्न मिथुन १८ अंश आहे व दशम स्थानावर कुंभेचा १३ वा अंश आहे. अर्थात् ह्या दोन महत्त्वाच्या बिंदूंवरोवर गोचर ग्रहांनीं जेव्हा युतियोग-केंद्रयोग किंवा प्रतियोग केले त्या वेळीं ग्रहाच्या गुणाप्रमाणें तेथें फलें अनुभवास आलेली

आहेत पुढील प्रकरणात अनेक कुंडल्या दिलेल्या आहेत, त्यात आपल्या कडील कुंडल्याचा वाचकानीं अनुभव घ्यावा.

## ( ब ) युतियोग

. रविमिक्रमणाच्या, ग्रहण काळच्या किंवा पौर्णिमान्त काळाच्या ज्याप्रमाणें आपण इष्ट स्थळाच्या कुंडल्या माडतों, त्याचप्रमाणें जेव्हा दोन ग्रहामध्यें पूर्व-पश्चिम अतर शून्य होतें, म्हणजे त्याची युति होते, त्या वेळेची इष्ट स्थळाची कुंडली माडून घेऊन हे युतियोग कुंडलीच्या ज्या स्थानात येतात, त्या स्थानासबधानें ग्रहाच्या स्वभावधर्माप्रमाणें फलें त्या त्या स्थलीं दृग्गोचर झालेलीं दिसतात परतु हे युतियोग जेव्हा युतिकाळच्या कुंडलीच्या केंद्रामध्यें घडतात, तेव्हा केंद्रपरत्वें युति करणाऱ्या ग्रहाच्या स्वभावधर्मा प्रमाणें शुभाशुभ फलें फारच स्पष्ट अनुभवास येतात ग्रहाच्या युतिकाळच्या कुंडलीमधील केंद्रामध्ये कोणते ग्रह येत आहेत व ते ह्या दोन युति करणाऱ्या ग्रहावरोवर दृष्टियोगानें शुभ अगर अशुभ रीतीनें सबधित होत आहेत किंवा काय, ह्याकडे विशेष लक्ष द्यावें व तदनुरोधानें फलादेशाचा विचार करावा

### (१) मंगळ-शनि युति

हा युतियोग दर दोन वर्षांनीं होत असतो एकदा ज्या राशीमध्य युतियोग झालेला असतो, त्याच्या पुढें सरासरी २४॥ अशानें दुसरा युतियोग होतो साधारणपणें दर दोन वर्षांनीं हा युतियोग पुढील राशीमध्यें येत असतो, परतु जेव्हा शनि-मगळ युति ही अगदीं राशीच्या आरंभींच्या अशातच होते, तेव्हा पुढील युतियोग हा त्याच राशीमध्यें आलेला पाहाण्यास मिळतो व सरासरी ५८ वर्षांनीं हा युतियोग त्याच राशीमध्यें आलेला पाहाण्यास मिळतो परतु सरासरी २६५ वर्षांनीं हा युतियोग त्या

राशीच्या त्याच अंशामध्ये आलेला पाहण्यास मिळतो. ह्या युतियोगाचा अनिष्ट परिणाम तो ज्या राशीमध्ये घडतो त्या राशीच्या गुणधर्माप्रमाणें अनुभवास येतो. ज्या राशीमध्यें शनि-मंगळ युति होते, त्या राशीने दर्शविलेल्या प्रदेशामध्यें व जेथें जेथें युतिकाळच्या कुंडलीमध्यें हे ग्रह केंद्रामध्ये आढळतात, तेथे पुढील युतियोग होण्याच्या काळापर्यंत म्हणजे सरासरीनें दोन वर्षेपर्यंत अनिष्ट फळ दर्शवितो. ह्या युतियोगामुळें देशामध्यें रक्तपात, मारामाऱ्या, दंगेधोपे, जाळपोळ, असंतोष, संप, रोगराई, वादळें आणि कधींकधीं भूकंपाचे उत्पात व नाश संभवतात. शनि-मंगळ युतियोग जलराशीमध्ये झाला असता नद्यास पूर येतात. पृथ्वीराशीमध्ये पशुधन, शेती व पिकें ह्याना तो अनिष्ट असतो व सांपत्तिक अडचणी दर्शवितो. अग्निराशीमधील शनि-मंगळ युति देशात अत्याचार अग्निप्रलय, खून, मारामाऱ्या व रक्तपात दर्शविते.

## (२) मंगळ-हर्शल युति

ह्या युतीचे परिणाम मंगळ-शनि युतियोगासारखेच अनिष्ट आहेत. परंतु हे परिणाम अत्यंत स्फोटक, भीषण व आकस्मिक असतात व त्याचे परिणाम दीर्घकाळपर्यंत टिकत नाहींत. क्षणामध्यें संहार करण्याचें सामर्थ्य ह्या योगामध्यें आहे. बॉम्बचे अत्याचार, स्फोटक पदार्थांच्या घर्षणानें अग्निप्रळय, यांत्रिक मोडतोड झाल्यामुळें अपघात, रेल्वे अपघात, विमानाचे अपघात, विद्युत्पाताने होणारे अपघात, हे हर्शल मंगळ युतियोगानें झालेले पाहाण्यास मिळतात व जुनें सर्व मोडतोड होऊन पुढें तेथें नवीन सृष्टि उत्पन्न झालेली पाहाण्यास मिळते. हर्शल-मंगळयुति ज्या राशीमध्यें होते त्या राशीनें दर्शविलेले प्रदेश उध्वस्त होतात, तसेंच हे ग्रह युतिकाळच्या

कुंडलीमध्ये ज्या ज्या ठिकाणी केन्द्रामध्ये येतात तेथे त्या त्या केंद्रानें दर्शविल्या जाणाऱ्या गोष्टीमध्यें सहार झालेला पाहाण्यास मिळतो

## ( ३ ) मंगळ-गुरु युति

ह्या युतियोगामुळें धार्मिक व राजकीय स्वरूपाच्या प्रश्नामुळें अस्वस्थता पसरते. हवेवर अनिष्ट परिणाम घडतो. कोर्टातील खटल्याना ऊत येतो. देशामधील खर्चाची बाजू वाढते उधळपट्टी होते कर्ज काढण्याचा प्रसग येतो. हा योग पावसाळ्यामध्यें होत असता भयकर मेघगर्जना व विद्युपात अनुभवाला येतात. उन्हाळ्यामध्यें भयकर उष्णता वाढते.

## ( ४ ) गुरु-हर्शल युतियोग

गुरु-हर्शल युति दर चौदा वर्षांनी होते. ह्या युतियोगामुळें पुष्कळ वेळा भयकर रोगाच्या साथी उद्भवतात ; युति ज्या राशींत होते त्या राशीच्या गुणधर्माप्रमाणें फलें दृष्टोपत्तीस येतात. गुरु-हर्शल ह्या युतियोगामुळे राजवर्ग, अधिकारीवर्ग ह्याची सत्ता वाढते शुभ दृष्टियोगानें सबधित असलेला हा योग सापत्तिक दृष्टीनें उन्नत स्थितिदर्शक आढळतो.

## (५) गुरु-नेपच्यून युतियोग

हा युतियोग दर तेरा वर्षांनी येत असतो हा युतियोग शुभदृष्टियोगानें सबधित असता उत्तम तऱ्हेची सापत्तिक स्थिति दर्शवितो व हा युतियोग ज्या राशीमध्ये घडत असतो तद्योतक उद्योगधद्याची भरभराट दर्शवितो. ह्या दोन ग्रहाच्या शुभयोगाच्या फलादेशाचा विचार फार जपून केला पाहिजे, कारण वरुण किंवा नेपच्यून ह्या ग्रहाच्या कारस्थानाचा व फसवेगिरीचा थाग लागणें फारच कठीण आहे श्रीमत व्यापारीसघ सटि करून, कारस्थानें करून देशामध्यें एक प्रकारची कृत्रिम महागाई

अशामध्ये किंवा त्या राष्ट्राच्या लग्नकुंडलीच्या तृतीयात, पंचमात, नवमात किंवा एकादशस्थानामध्यें होईल तर त्या राशीनें दाखविणारे प्रदेश, राष्ट्रें व शहरें ह्यामध्यें वरील होणारा युतियोग इतर क्रूर ग्रहाच्या अशुभ दृष्टियोगाने संबंधित नसता तेथें नवीन कायदेकानु, सुधारणा अस्तित्वात येतात व तेथील उद्योगधंदे सुरळीत व चांगले चालतात. हा काळ सुस्थिति दर्शविणारा असतो परंतु वरील गुरु-शनि युतियोग त्या राष्ट्राच्या किंवा शहराच्या कुंडलीमधील केन्द्राच्या अंशात, अर्थात् लग्न, चतुर्थ, दशम किंवा सप्तम केन्द्राच्या अंशावर होतो किंवा युतिकाळाच्या कुंडलीमध्यें हा योग केन्द्रस्थानावर होतो तो मंगळ, हर्शल, नेपच्यून किंवा युतिकाळच्या रविचंद्रावरोबर अशुभ दृष्टियोगामध्ये झालेला पाहाण्यास मिळेल तर त्या प्रदेशामध्यें तत्केन्द्रदर्शक गोष्टींमध्ये व ज्या ग्रहाबरोबर अशुभदृष्टियोग झालेला असतो त्याच्या धर्माप्रमाणें तेथें ह्या दृष्टियोगाच्या काळामध्ये जेव्हा जेव्हा अनिष्ट ग्रह पापग्रह गोचरीनें उत्तेजित करण्यास येतात म्हणजेच पापग्रह जेव्हा गोचरीनें वरील गुरु-शनि युतियोगाबरोबर युतियोग, प्रतियोग, केन्द्रयोग, अर्धकेन्द्रयोग किंवा सार्ध केन्द्रयोग करतात किंवा दिनवर्ष पद्धतीप्रमाणें जेव्हां अशुभ कालदर्शिका घडतात, त्या त्या काळीं त्या त्या प्रदेशामध्यें अनिष्ट परिस्थिति प्राप्त होऊन त्या प्रदेशामध्यें संकटपरंपरा निर्माण झालेली पाहाण्यास मिळते, परंतु वरील गुरु-शनि युतियोग युतिकाळच्या रविचंद्राबरोबर शुभसंबंधित असता व पापग्रहाच्या अशुभ संबंधात नसतां, तत्केन्द्रानें दर्शविल्या जाणाऱ्या गोष्टींमध्यें विशेष सुधारणा होऊन देश प्रगतिपथावर जातो व तेथील प्रजाजन नूतन सुधारणा झाल्याकारणानें किंवा नवीन कायदेकानु झाल्यानें सुखी होतात व देशांत शांतता नांदते.

गुरु-शनि युतियोगामध्यें आणखी एक विशिष्टता पाहाण्यास मिळते ती ही, कीं हा युतियोग एकदा जेथें झालेला असतो तेथून पुढील वीस वर्षांनीं येणारा युतियोग हा पहिल्यादा ज्या राशीमध्यें झालेला असतो तेथून नवव्या राशीमध्यें किंवा मागें असलेल्या त्याच तत्वाच्या पाचव्या राशीमध्यें घडतो व पुन्हा पहिल्या योगानतर चाळीस वर्षांनीं येणारा दुसरा युतियोग हा पहिल्या योगापासूनच्या पुढल्या पाचव्या राशीमध्ये किंवा पहिला युतियोग ज्या तत्वाच्या राशीमध्ये झालेला असतो तेथूनच्या पाठीमागील त्याच तत्वाच्या नवव्या राशीमध्यें होतो सरासरी साठ वर्षांनीं येणारा हा युतियोग पुन्हा पहिला युतियोग ज्या राशीमध्यें झालेला असतो त्याच राशीमध्यें घडतो ह्याप्रमाणें हें गुरु-शनि युतियोगाचे चक्र सरासरी २०० वर्षेपर्यंत एकाच तत्वाच्या राशीमध्यें होत असनें व पुढें २०० वर्षांनीं येणारा युतियोग त्याच तत्वाच्या राशीमध्यें न होता दुसऱ्या तत्वाच्या राशीमध्यें होतो ह्याप्रमाणें राशिचक्राच्या चार तत्वाचें संपूर्ण भ्रमण किंवा राशिचक्राच्या बारा राशींचें भ्रमण हा गुरु-शनि युतियोग ८०० वर्षांमध्यें पूर्ण करतो

फलज्योतिष शास्त्रामध्यें राशिचक्राच्या बारा राशींचे खालीलप्रमाणें विभाग केलेले आहेत. (१) **अग्नि राशि** – मेष, सिंह व धनु, (२) **पृथ्वी राशि** – वृषभ, कन्या व मकर, (३) **वायु राशि** – मिथुन तुला व कुम्भ; (४) **जल राशि** – कर्क, वृश्चिक व मीन, (५) **चर राशि** – मेष, कर्क, तुला व मकर, (६) **द्विस्वभाव राशि** – मिथुन, कन्या, धनु व मीन, (७) **स्थिरराशि** – वृषभ, सिंह, वृश्चिक व कुम्भ

गुरु शनि युतियोग एकाच तत्वाच्या राशीमध्यें अनेक वर्षे राहातो ही गोष्ट प्राचीन ज्योतिर्विदांच्या लक्षामध्यें आल्यामुळें जे हा गुरु-शनि युतियोग

नव्या तत्त्वाच्या राशीमध्यें येतो त्या युतियोगाला त्यानीं **महापरिवर्तन** दर्शविणारा गुरु-शनि युतियोग (**Great Mutation Conjunction**) असें अभिधान राष्ट्रीय ज्योतिषविभागामध्यें आंग्ल ज्योतिर्विदांकडून दिलें गेलें आहे. इंग्लंडमध्यें सतराव्या शतकामध्यें होऊन गेलेला एक बुद्धिमान् खवेत्ता सर जार्ज व्हाईट म्हणतो, "राष्ट्रांचीं जीं महास्थित्यंतरें होतात त्याच्या मुख्य कारणांपैकीं विश्वनियंता हें आद्य-कारण असून चौथें कारण गुरु-शनि युतियोग आहे." झडकीलच्या टेक्स्ट बुक ऑफ ॲस्ट्रालाजी, पृष्ठें ३३५-३६ पानावर दिलेला उतारा पाहा.

**महापरिवर्तन** दर्शविणारा गुरु-शनि युतियोगाचा अंमल जवळ जवळ २०० वर्षें राहातो असें आंग्ल ज्योतिर्विदांचें मत असल्या-कारणानें ह्या युतियोग काळाच्या कुंडलीवरून पुढील अनेक वर्षांचें देशासंबंधीं भविष्य करण्यास मदत होते. गुरु-शनि ह्यांची युति ज्या वेळीं चर राशीमध्यें होते आणि विशेषेंकरून चर राशीच्या अगदीं आरंभींच म्हणजे पहिल्या चार-पाच अंशात होते, त्या वेळीं अतिशय मोठमोठे फेरफार करणारीं तीव्र फळें पाहाण्यास सापडतात, असें अनेक ज्योतिर्विदांचें मत आहे. ह्या युतियोगकाळीं दोन ग्रहांच्या अर्थात् गुरु व शनि ह्यांच्या क्रांतीमध्यें अधिक अंतर असल्यास युतियोग फलाची तीव्रता कमी होते. तसेंच ह्या युतियोगाच्या फलाचा विचार करतेवेळीं गुरु-शनि युतियोग प्रथमच्या १० अंशात आहे किंवा १० च्या पुढील दुसऱ्या दहा अंशांत आहे किंवा राशीच्या २० अंशापुढील पुढील दहा अंशात आहे, ह्याचाही विचार केला पाहिजे. प्रत्येक राशीच्या दहा-दहा अंशाच्या विभागास **द्रेष्काण** असें नाव आहे. राशीच्या पहिल्या दहा अंशाचा द्रेष्काण

स्वामी त्या राशीचा अधिपति ग्रहच असतो. परंतु पुढील अकरा ते वीस अंशापर्यंतचा त्या राशीचा दुसरा द्रेष्काणाधिपति त्या राशीपासून जी पाचवी राशी असते, तिचा स्वामी होतो एकवीस ते तीस अंश ह्या राशीच्या तिसऱ्या विभागाचा स्वामी त्या राशीपासून जी नववी राशी असते तिचा तृतीय द्रेष्काणाधिपति होतो. उदाहरणार्थ, वृषभ राशीच्या पहिल्या दहा अंशाच्या प्रथम द्रेष्काणाचा अधिपति शुक्र आहे व पुढील अकरा ते वीस ह्या वृषभ राशीचा द्वितीय द्रेष्काणाधिपति वृषभेपासून पाचवी राशी कन्या, तिचा अधिपति बुध आहे, म्हणून तो द्वितीय द्रेष्काणाधिपति होतो. वृषभ राशीच्या २१ ते ३० अंशाचा अर्थात् तृतीय द्रेष्काण स्वामी, वृषभेपासून येणारी नववी राशि मकर आहे, तिचा अधिपति शनि हा वृषभेचा तृतीय द्रेष्काणाधिपति होतो ह्याप्रमाणें इतर राशींचे द्रेष्काणाधिप जाणावे.

सामान्यत गुरु-शनि युतियोगाचा परिणाम राज्यव्यवस्था, अधिकारी वर्ग, धार्मिक आचारविचार, व्यापारक्षेत्रामधील सांपत्तिक घडामोडी व उद्योगधंदे ह्यावर होतो राजकीय हक्कामध्ये आंतरराष्ट्रीय व परराष्ट्रीय प्रश्न उपस्थित होऊन युद्धें व रक्तपात होतात काहीं प्रसंगीं भूकंप होऊन लोकसंहार होतो. सामान्यत राज्यव्यवस्थेंत बदल किंवा सुधारणा होणें हा ह्या युतीचा धर्म आहे ह्या गुरु-शनि युतीचा परिणाम एक युति होऊन दुसरी युति होईपर्यंत म्हणजे नेहमींप्रमाणें वीस वर्षे असतो परंतु महापरिवर्तन दर्शविणारा गुरु-शनि युतियोगाचा अमल दुसरा महापरिवर्तन गुरु-शनि युतियोग येईपर्यंत राहातो हा काळ सरासरी २०० वर्षांचा

आहे. चर राशीमधील होणारा युतियोग राजकारणासंबंधीं अनेक राष्ट्रीय घडामोडी दर्शवितो; स्थिर राशीमधील युतियोग अर्थव्यवस्था, भूकंपादि उत्पात, ह्यांवर विशेष परिणाम करतो, तर द्विस्वभाव राशीमध्यें होणारा गुरु-शनि योग हा रोगांच्या साथी आणतो व त्यानें मानवी संहार होतो. या गुरु-शनि युतियोगासंबंधानें विचार करतांना ते कोणत्या तत्त्वाच्या राशीमध्यें घडत आहेत हेंही लक्षामध्यें घेतलें पाहिजे. बारा राशि अग्नि, पृथ्वी, वायु व जल ह्याप्रमाणें मेषराशीपासून चार तत्त्वांत विभागल्या आहेत.

## महापुरुषांचे जन्म केव्हां होतात?

ह्यासंबंधानें विचार करतां असें पाहाण्यास मिळतें, कीं ज्या ज्या वेळीं महापरिवर्तन दर्शवणारा गुरु-शनि ह्यांचा युतियोग घडतो, त्या त्या वेळीं मोठमोठ्या ज्ञानी व जगाला धर्माचा आदेश देणाऱ्या व्यक्ति जन्म पावलेल्या पाहाण्यास मिळतात, अशी इतिहास साक्ष देत आहे.

(१) इसवी सनापूर्वी ६६२ ह्या वर्षी गुरु-शनि युतियोग धनु ह्या अग्नितत्त्वाच्या राशीमधील २० व्या अंशांत झाला होता व ह्याच वेळीं अग्निपूजन करणाऱ्या पारशी लोकांचा धर्मसंस्थापक **झोरोस्टर** ह्याचा जन्म झालेला आहे.

(२) इसवी सनापूर्वी ५६३ च्या ऑक्टोबर महिन्यामध्यें गुरु-शनि युति वृषभ राशीच्या ५ व्या अंशांत झालेली आहे. ह्या वेळीं महात्मा **गौतम बुद्धाचा** जन्म झाला व बुद्धधर्माचा उदय झाला.

(३) इसवी सनापूर्वी २८४ ह्या वर्षी गुरु-शनि युति मिथुन राशीच्या दुसऱ्या अंशामध्यें झाली. ह्या वेळीं प्रसिद्ध तत्त्ववेत्ता **ॲरिस्टॉटल** ह्या महाभागाचा जन्म झाला.

( ४ ) इसवी सन ५७१ मध्ये वृश्चिक राशीच्या ४ थ्या अंशामध्यें गुरु-शनि युति झालेली आहे ह्या वेळीं मुसलमान धर्मसंस्थापक **महंमद पैगंबर** ह्याचा जन्म झालेला आहे.

इसवी सनापूर्वी ५५२ ते ४८५ च्या काळामध्यें मॅजियन पारशी ज्योतिर्विदानें **ज्यामस्पि** नावाचा ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आहे. त्यांत ग्रहाच्या युतियोगावरून पुढील भविष्यें कथन केलेलीं आहेत. त्यांत खिश्चन धर्मसंस्थापक येशु ख्रिस्त ह्याच्या जन्माचें भविष्य दिलेलें होतें, इतकेंच नव्हे तर परशिआमध्ये रूढ असलेला **म्याजिअन** पारशी लोकांचा जो धर्म ह्याचा ऱ्हास पुढें इस्लाम धर्मसंस्थापक महमद पैगंबर ह्याचा जन्म होऊन त्याचे अनुयायी धर्मप्रसार कसा करतील व परशिआ मधील पारशी धर्म कसा नष्ट होईल ह्याचें सविस्तर विवेचन केलेलें होतें, असा उल्लेख पाहावयास मिळतो कसेंही असो, वाचकांच्या ध्यानामध्यें येईल, कीं गुरु-शनि ह्या दोन ग्रहांच्या युति व त्यामुळे देशावर होणारे परिणाम, इत्यादिसंबंधानें पश्चिमेकडील पूर्वीच्या ज्योतिर्विदानीं चांगलेंच संशोधन केलेलें दिसत आहे

आता आपण आपल्याकडील पांचशें सहाशें वर्षांपूर्वीं महापरिवर्तन करणारे जे गुरु-शनि युतियोग झाले त्याचा आम्हा भारतवासीय जनते वर कसा परिणाम झाला ह्याचा थोडासा विचार करू या

नवीन कालगणनेच्या पद्धतीप्रमाणें तारीख १ नोव्हेंबर, १३६५ ह्या दिवशीं गुरु-शनि ह्याची प्रथम युति वृश्चिक राशीच्या ७ व्या अंशात झाली आहे. वृश्चिक ह्या जलराशीमधील गुरु-शनि महापरिवर्तन दर्शविणारी युति झाल्यानंतरच जलमार्गानें पूर्वेकडील प्रदेशामधून येणारे

मसाल्याचे पदार्थ मिरी, सुंठ, वगैरे पदार्थांचा व्यापार जो अरबस्तान मार्गानें मुसलमान व्यापारी, विशेषत खुष्कीच्या मार्गानें भूलोक करीत असत, त्या प्रदेशाला जाण्याकरिता डच, पोर्तुगीज, वगैरे दर्यावर्दी लोकानीं प्रयत्नास सुरवात केली व त्या अनेक प्रयत्नामध्यें कोलंबस ह्याला अमेरिका खंडाचा शोध लागला, तर पोर्तुगीज दर्यावर्दी वास्कोद गामा ह्यानें आफ्रिका खंडाच्या दक्षिणेकडील शेवटचें भुशिर केप ऑफ गुडहोप ह्याला वळसा घालून सिंधु समुद्रामध्यें — अरबियन समुद्रामध्यें — प्रवेश करून भारताच्या पश्चिमेकडील किनाऱ्यावरील कालीकत बंदरामध्यें तारीख ७ मे १४९८ रोजीं नांगर नांगरल्या व कालीकतचा अरब राजा झामोरीन ह्याला यथेच्छ नजराणा वगैरे देऊन खूप केलें व व्यापार करण्याची परवानगी मिळविली पोर्तुगालमध्यें परत जाऊन पोंचल्यावर गामाच्या झालेल्या सत्काराचा ध्वनि साऱ्या युरोपभर दुमदुमला मारीं युरोपियन राष्ट्रें अगाशासारखीं ह्या सुवर्णभूमींतील व्यापारावर स्वत चें उखळ पांढर करून घेण्यासाठीं ह्या सपन्न देशामध्यें घुसलीं, नव्हे तुटूनच पडलीं ! त्या दिशेनें पहिलें पाऊल टाकलें पोर्तुगीजानींच ! समुद्रकांठचीं व्यापारी कार्टें मजबूत करण्याकडे त्यानीं विशेष लक्ष दिलें, त्यामुळें अनेक भानगडी उत्पन्न झाल्या, त्यात उत्तम दारुगोळ्याचें मरा पोर्तुगालमधून आणून त्यानीं झामोरीनचा व तेथें असलेल्या मुसलमान मतांविरुद्धाचा पराजय केला पोर्तुगालचा अल्बुकर्क व्यापार रक्षा ओलांडून भारतभूमीवर कायमचें ठाणें मांडण्याच्या विचारानें प्रेरि झालेला होता, त्यानें जुन्या पद्धतीप्रमाणें ता १७ फेब्रुवारी, १५१० रोजी गुर्जरांच्या सुनराम भारताच्या पश्चिम किनाऱ्याकडील गोव्याच्या भूमीव पोर्तुगीज ध्वज फडकविला !

आग्ल ग्रथकार पोर्तुगालची राशि मीन देत आहेत ; परतु पोर्तुगीजानीं केलेलीं भारतामधील अनेक हत्याकांडें, त्याची चिकाटी वगैरे पाहाता व त्याचा अमल भारतभूमीवर इतरापेक्षा जास्त काळ राहिला व त्याना पोलीस ॲक्शन किंवा युद्ध केल्याखेरीज जाण्याची बुद्धि व सौजन्य सुचले नाहीं आणि वृश्चिक ह्या मगळाच्या खुनशी धर्माप्रमाणें जाळपोळ, वगैरे नाश व देश उध्वस्त करून जाण्याची ठरविलेली योजना, ह्याचा विचार करता पोर्तुगालची राशि वृश्चिक आहे असें आमचें ठाम मत आहे तारीख १९ डिसेंबर, १९६१ ह्या दिवशीं सकाळीं ९ वाजून ३० मिनिटें (स्टॅं टा) ह्या वेळीं भारताचा तिरगी झेंडा गोव्याच्या भूमीवर फडकून, गेली ४५२ वर्षें चालू असलेलें पारतत्र्याच्या शृंखलेचें ग्रहण सुटलें ह्याच सन १३६५ च्या वृश्चिक राशीमधील गुरु-शनि युतिकाळामध्ये मुसल्मानी सत्ता भारतात चागली दृढ झाली ; परतु त्या सत्तेचा शेवट पुढें येणाऱ्या महापरिवर्तन करणाऱ्या सन १६०३ मध्यें धनुराशीच्या ९ व्या अशामध्यें गुरु शनि युति झालेल्या युतिकाळाच्या आत झालेला आहे. महमद पैगबर ह्याचा जन्मही वृश्चिक राशीच्या गुरु-शनि युतियोगामध्यें झाला व भारतात त्याच धर्माची दृढसत्ता पुन्हा गुरु-शनि युतियोग वृश्चिकेमध्यें झाला तेव्हा झाली. मुसल्मान समाज, त्याची मनोवृत्ति, त्याच्या धर्माचा ध्वज, त्यावरील हिरव्या रगाच्या ध्वजावर पचकोणावरील चद्राची कोर, इत्यादि गोष्टींचा विचार करता ह्या समाजावर व धर्मावर कर्क-वृश्चिक राशि आणि चद्र, शुक्र व मगळ ह्याचा सबर पुष्कळ असल्याने वाटतो.

## आंग्लसत्तेचा व महाराष्ट्राचा उदय

कै चिटणीस महाराष्ट्राची धनुराशि मानीत असत. महाराष्ट्राचे लग्नकेन्द्री धनुराशीचा पहिला द्रेष्काण उदित असावा असे आम्हाला वाटतें. तारीख १९ डिसेंबर, १६०३ ह्या दिवशीं दुपारीं स्टॅ. टा १ वाजून ४४ मिनिटें ह्या वेळीं धनुराशीच्या ८ अंश १९ कलेमध्यें गुरुशनि महापरिवर्तन करणारी युति झालेली आहे. ह्याच काळामध्यें महाराष्ट्रामध्यें नवचैतन्य उत्पन्न करून, धर्माची ग्लानि दूर करून, **"मराठा तितुका मेळवावा"** हें सूत्र देऊन, महाराष्ट्रात एकीचें बीजारोपण करून, मोगलाच्या ताब्यामधून सुटण्याचा व स्वतंत्रतेचा आदेश देणाऱ्या **रामदासस्वामीं**सारख्या सत्पुरुषाचा अवतार झाला. ह्याच काळात दुसरे संतश्रेष्ठ **तुकाराम** ह्याचाही जन्म झालेला आहे धार्मिक भूमिका तयार करण्याचें कार्य ह्याप्रमाणें चाललें असता तेथेंच वीरत्वाचे, नीतीचे व सामर्थ्याचे आदेश धारण करणारे छत्रपति **शिवाजीमहाराज** ह्याचा जन्म झाला. इतकेंच नव्हे, तर ह्या काळात अनेक वीररत्नें जन्माला आलीं ह्याच काळात **हिंदुपदपातशाही** स्थापन होऊन मोंगलसत्ता जर्जर करून, दिल्लीपति मोंगल बादशाहाला मुठींत ठेवणारे महाराष्ट्रीय चमकले. हें ह्या महाराष्ट्राच्या लग्नामधील महापरिवर्तन करणाऱ्या गुरुशनियोगाचें फळ महाराष्ट्रामध्यें अनुभवाला आलेलें पाहाण्यास मिळालें आहे.

इंग्लंडची राशि मेष मानतात त्या राशीच्या भाग्यस्थानामध्यें गुरुशनि महापरिवर्तन होणारा योग घडताच इंग्लंडचा भाग्यरवि अखंड पृथ्वीवर तळपू लागला भारतात व्यापार करण्यास आलेल्या ईस्ट इन्डिया कंपनीच्या नोकरांनीं भारतातील दुही, कुटुंबातील भांडणें

ह्याचा लाभ घेऊन मराठ्यांचें राज्य, ज्यानीं मोंगलाचे राज्य बुडविलें त्यांचें राज्य बुडवून भारतावर साम्राज्यसत्ता स्थापन केली ! ती पण ह्याच महापरिवर्तनकाळाच्या धनुराशीच्या गुरु-शनि युतिकाळ्यत !

## मकर राशीमधील महापरिवर्तन युतीनें काय घडविलें ?

एकोणिसाव्या शतकामध्यें ८०० वर्षांनीं पुन्हा गुरु-शनि युति मकर राशीच्या ९ व्या अंशामध्यें झाली. अर्थात् टाल्मीनें मानलेल्या सायन मकरराशीमध्यें म्हणजे हिंदुस्थानच्या राशीमध्यें हा महापरिवर्तन दर्शविणारा योग घडला होता ह्याच युतियोगावरून प्रसिद्ध आंग्ल ज्योतिर्विद् झडकील पहिला ह्यानें भारतवर्षामध्ये होणाऱ्या १८५७ सालच्या स्वातंत्र्ययुद्धाचें भविष्य (झडकीलस लीगसी टु ब्रिटिश किंग) "ब्रिटनच्या राज्याला झडकील ज्योतिर्विदाची भविष्याची देणगी" ह्या नावाच्या पुस्तकात १८४६ मध्यें प्रसिद्ध करून, त्यात भारतामधानें पुढीलप्रमाणें भविष्य करून राज्यकर्त्यांचे डोळे उघडण्याचा सुंदर प्रयत्न केला "आता ह्यापुढें येणाऱ्या काळामध्यें पूर्वेकडील आशियाई राष्ट्रें उदयास येत असून हा योग भारताच्या मकर राशीमध्यें कलकत्ता ह्या राजधानीच्या शहरीं नवमस्थानामध्यें होत असल्याकारणानें हिंदुस्थान आता पुढें प्रगतीच्या मार्गावर जात असून तेथील धार्मिक भावनेला जोर येऊन ब्रिटिश राजवटीची सत्ता १८५७ सालामध्यें उलथून पाडण्याकरिता व राज्यक्रांतीकरता धार्मिक भावनेनें प्रेरित असें बंड होईल व तें शमन करण्यास ब्रिटिश राजसत्तेनें योग्य असें राजकीय धोरण बांधून सावधानता बाळगली नाहीं तर आपलें चंबुगबाळें घेऊन इंग्लंडला परत यावें लागेल." ज्योतिर्विद झडकील ह्यानें केलेल्या भविष्याचा अनुभव किती ततोतंत मिळाला आहे ह्यामधानें येथें चर्चा करण्याचें कारण दिसत

नाहीं. हिंदुस्थानची त्या वेळची राजसत्ता ईस्ट इन्डिया कंपनीच्या हातामध्ये होती व ह्या सत्तेमध्ये अनेक अप्रिय अशा गोष्टी घडल्या. अनेक स्वतंत्र मुसलमानी व हिंदु राजे ह्यांची राज्यें खालसा झाली. हम करेसो कायदा ह्या सोटेशाही राज्यतंत्राला कंटाळून हिंदु व मुसलमान एकत्र होऊन १८५७ सालचें क्रांतिकारक युद्ध झालें. ब्रिटिश राजसत्तेला ह्या क्रांतीच्या बंडाचा पराजय करता आला व नंतर ता. १ नोव्हेंबर, १८५८ रोजी व्हिक्टोरिया राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. त्यानें ईस्ट इन्डिया कंपनीची सत्ता नष्ट होऊन हिंदुस्थानची राज्यसत्ता ब्रिटिश साम्राज्याला जोडली जाऊन नवीन युगाचा आरंभ झाला.

ह्याच गुरुशनि युतियोगाच्या कुंडलीवरून सन १९२४ मध्ये त्या काळीं आम्ही प्रसिद्ध करीत असलेल्या **ज्योतिर्मालाऽभिनावृत्ति** मासिकामध्यें त्या काळीं चालत असलेल्या महात्मा गांधींच्या " हिंदु मुसलमान एकी व एक वर्षांत स्वराज्य " ह्याप्रमाणें चाललेल्या घोषणेवर खालील-प्रमाणें आम्हीं आमचे विचार प्रसिद्ध केले होते : " हिंदुस्थानला स्वतंत्रता मिळण्याचा काळ आलेला नाहीं व हिंदु-मुसलमान ह्यांची एकीही होईल असें दिसत नाहीं. महात्माजी जे एकीचे प्रयत्न करीत आहेत ते फुकट जातील व ते ज्याप्रमाणें घोषणा करीत आहेत त्याप्रमाणें एका वर्षांत भारतवर्षाला स्वतंत्रता प्राप्त होणार नाहीं. पुढें सन १९३० व १९३१ ह्या सालामध्यें भयंकर राष्ट्रीय चळवळीची लाट उसळेल व सन १९३२ मध्यें स्वतंत्रतेचे हक्क देण्याचीं बोलणीं होतील; परंतु त्यावरून काहींच निष्पन्न न झाल्याकारणानें सन १९४२ मध्यें हिंदुस्थानमध्यें स्वातंत्र्याच्या व स्वराज्याच्या भावनेची चांगलीच जागृति होऊन

सन १९४७ मध्यें ब्रिटिश साम्राज्याच्या लोखडी अधिकारी चौकटीचे तुकडे तुकडे होतील व हिंदुस्थान स्वतंत्र होइल "

**मकरराशिमध्यें होणारे युतियोग** – प्रथमचा योग १८४२ त्यानंतर दुसरा योग ६० वर्षांनीं १९०१ मध्यें व तिसरा योग १९६१ हे योग मकरराशीचा देश जो भरतखंड त्यात जागृति होण्याची पताका फडकवीत आहेत कारण हे योग भरतखंडाच्या मकर लग्नीं होत होते धर्मप्रवृत्तिदर्शक गुरु व तत्वज्ञानदर्शक शनि ह्याची युति भरतखंडाच्या राशीमध्यें होत असता साचलेल्या पाण्याप्रमाणें ह्या देशातील धर्म राहाणें अशक्य झालें प्रथमचा १८४२ चा योग आमच्या देशाच्या केन्द्रस्थानीं झालेला आहे ह्या कुंडलीमधील सर्वव्यापी जागृति दर्शविणारी ग्रहस्थिति विचार करण्यासारखी आहे ह्या कुंडलीमध्यें गुरु व शनि हे अनुक्रमें धर्मस्थान व दशमस्थान ह्याचे अधिपति आहेत नवमदशम ह्या स्थानाच्या अधिपतींची युति महत्त्वदर्शक अशा नवमस्थानीं झाली असल्यामुळें धार्मिक चळवळींना जोर येऊन त्यामध्ये नवमन्वतर उदयास येत आहे ह्याची जाणीव महात्मा दयानंद सरस्वति ह्याचे कार्य, तसेंच थिऑसॉफिकल सोसायटीच्या चळवळीचें कार्य हीं चालू असताच शेवटीं आर्यधर्माची पताका परद्वीपातही रोवली गेली शिकागो येथे भरलेल्या धर्मपरिषदेमध्यें आर्यऋषींच्या धर्माचा – आत्मविद्येचा संदेश सर्व मानव जातीस जाहीर करण्याचें जें कार्य स्वामी विवेकानन्द ह्यानीं केलें तें आज सर्वांच्या नजरेसमोरच आहे ह्या मकरेमधील गुरु-शनि युतीच्या वेळपासून हिंदुधर्म जिवंत आहे हें सर्व जगास कळलें प्रगति ही जिवंतपणाचे लक्षण होय हिंदुधर्माच्या प्रगतीचा धर्मांतराचा एक दरवाजा आतापर्यंत बंद होता पण तोही आस्ते कदम उघडण्यास सुरुवात झाली परधर्मांत बाटून गेलले लोक

किंवा परधर्मीय लोक ह्याना हिंदु धर्मामध्यें येता येत नव्हतें, परतु तोही अडसर काढला गेला व हिंदुधर्मामध्यें कोणालाही येण्याचा मार्ग मोकळा होऊ लागला जिकडे तिकडे सामाजिक सुधारणेच्या नव्या मनूच्या वाऱ्याचे प्रवाह जोरानें वाहू लागलेले दिसू लागले व गेल्या शभर सव्वाशें वर्षांमध्यें भारताचा कायापालट झालेला प्रत्येक क्षेत्रामध्यें दिसू लागला आहे

सन १८४२ सालामधील महापरिवर्तन दर्शविणारी गुरु-शनि युति मकर राशीच्या ९ व्या अशात अर्थात् मकर राशीच्या पहिल्या मकर ह्या चर धर्माच्या द्रेष्काणमध्यें दशमस्थानामध्यें झाली असल्याकारणानें तिनें पधरा-सोळा वर्षांच्या आतच अधिकारक्षेत्रामध्यें क्राति घडवून आणली आहे वाचकाच्या सोईकरिता आम्ही ही कुडली प्रकरण १३ मध्यें प्रसिद्ध करीत आहोत

त्यानतर पुन्हा जो साठ वर्षांनीं गुरु-शनि युतियोग झालेला आहे तो युतियोग मकर राशीच्या दुसऱ्या द्रेष्काणमध्यें सन १९०१ सालामध्यें झालेला आहे मकर राशीचा दुसरा द्रेष्काण हा वृषभ ह्या स्थिर धनस्थानद्योतक राशीमध्यें झाल्याकारणानें अर्थक्षेत्रामध्यें, तसेंच कायदेकानू, राजतत्र, वगैरेमध्यें महत्त्वाच्या सुधारणा घडून, दिल्ली हें भारताचें राजधानीच शहर होऊन, नवी दिल्ली बाधली गेली ह्यानतर भारतामध्यें सर्व क्षेत्रामध्यें उन्नति होत गेलेली पाहाण्यास मिळत आहे ह्याच काळामध्यें भारताच्या उद्योगधद्यामध्यें झपाट्यानें प्रगति झालेली दिसत आहे त्यानतर पुन्हा ६० वर्षांनीं म्हणजे फेब्रुवारी १९६१ च्या १९ व्या तारखेला मकर राशीच्या तिसऱ्या द्रेष्काणमध्यें म्हणजे कन्या द्रेष्काणमध्यें गुरु-शनि युतियोग झाला आहे व ह्यापुढें १४ सेप्टेंबर

सन २०२० मध्यें पुन्हा गुरु-शनि युतियोग मकर राशीच्या १७ व्या अंशात अर्थात् मकर राशीच्या दुसऱ्या वृषभ द्रेष्काणमध्यें होईल व त्यानंतर सन २०८० मध्यें येणारा गुरु-शनि युतियोग कुंभ राशीच्या ४ थ्या किंवा ५ व्या अंशामध्यें मार्च महिन्यामध्यें येईल व येथून कुंभ ह्या वायु व स्थिर राशीमध्यें होणारा महापरिवर्तन दर्शविणारा युतियोग खरोखर विश्वबंधुत्व, शास्त्रीय ज्ञान, आत्मज्ञान व अध्यात्मदर्शक नवयुगाची ध्वजा फडकावील. एकीनें राहाणें, एकत्र संघटित होऊन कार्य करणें, इत्यादि विस्तृत सामाजिक सुधारणाचा उद्घोष करील व्यक्तित्वाच्या ठिकाणीं समाज व संघटनाचें साम्राज्य अस्तित्वात येण्याचा शुभ संदेश देईल असे वाटतें. कुंभ राशीचें स्वरूप "खांद्यावर जलकुंभ घेऊन सिंचन करणाऱ्या पुरुषाचें आहे." त्यामुळें ह्या काळामध्यें विद्युत् शक्ति, गॅस, मॅग्नेटिक, प्राणशक्ति, इत्यादि सृष्टीमधील अनेक गुप्त शक्तींचें ज्ञान प्राप्त होऊन मानवसमाज ज्ञानानें श्रेष्ठत्व धारण करील.

असो. आता आपण सन, १८४२ सालीं, २६ जानेवारी रोजीं झालेला महापरिवर्तन दर्शविणारा गुरु-शनि युतियोग जो मकर राशीच्या ९ व्या अंशात झाला आहे, त्या कुंडलीमध्यें १८५७ सालच्या बंडाचे वेळीं व सन १९३० व १९३१ मधील राष्ट्रीय चळवळ, तसेंच १९४२ सालमधील 'भारत छोडो' ची घोषणा व **सन १९४७ ऑगस्ट तारीख १५ रोजीं** भारत व पाकिस्तान अशीं दोन नवीन राष्ट्रें अस्तित्वात आलीं त्या वेळीं गोचर ग्रहाची स्थिति ह्या कुंडलीमध्यें कशी होती व दिवर्ष पद्धतीप्रमाणें कोणकोणत्या कालदर्शिका आलेल्या होत्या, ह्याचें विवेचन पुढील १३ व्या प्रकरणामध्यें केलेलें पाहाण्यास मिळेल.

प्रकरण बारावें

# ग्रहणें

रवि, चद्र आणि पृथ्वी ज्या वेळीं एकाच समान्तर रेषेंत येतात, त्या वेळीं ग्रहणें होतात. रविचद्राच्या सयोगकाळीं, अमावास्येच्या काळीं, जर राहू किंवा केतु ह्यापासून १८½ अशापेक्षा कमी अतरावर असून चद्राचा शर १ अश, ३४ कला ह्यापेक्षा जास्त नसेल, तर पृथ्वीवर कोठेंतरी सूर्यग्रहण होण्याचा सभव असतो आणि चद्र, राहू अथवा केतु ह्यापासून १४¼ अशापेक्षा कमी अतरावर असून, चद्राचा शर १ अश, २३ कलापेक्षा जास्त नसेल, तर पृथ्वीवर सूर्यग्रहण निस्सशय होतें पौर्णिमेच्या वेळीं जर चद्र, राहू अगर केतूपासून १२½ अशापेक्षा कमी अतरावर असून चद्राचा शर १ अश, ३ कलापेक्षा जास्त नसेड, तर पृथ्वीवर कोठेंतरी चद्रग्रहण होणें सभवनीय आहे. पौर्णिमाकाळीं जर चद्र, राहू अगर केतु ह्यापासून ९¾ अशापेक्षा कमी अतरावर असून, चद्राचा शर ० अश, २२ कलापेक्षा जास्त नसेल, तर चंद्रग्रहण पृथ्वीवर कोठेंतरी नि सशय होतें

सूर्यग्रहणकाळची कुडली माडणें असता ज्या वेळीं रविचद्राचे अतर शून्य होतें, त्या वेळीं अमा पूर्ण होण्याच्या वेळेची कुडली माडली पाहिजे त्याचप्रमाणें चद्रग्रहणकाळीं ज्या वेळीं चद्र व रवि ह्यामधील अतर ततोतत १८० अशाचें होतें, त्या वेळेची कुडली माडली पाहिजे, किंवा पौर्णिमान्त होण्याच्या काळची कुडली माडली पाहिजे ग्रहणारभकाळची कुडली घेऊन फलादेश पाहाण्याची पद्धत कोठेंही प्रतिपादन केलेली आढळत नाहीं व इष्टस्थळीं ग्रहणाचीं फळें कशीं अनुभवाला येतील हें पाहाणें असतां, तेथील प्रदेशाचे अक्षाश रेखाश घेऊन कुडली माडली पाहिजे.

राष्ट्राचें भविष्य वर्तवितेवेळीं त्या त्या वर्षामधील होणाऱ्या ग्रहणांचा, मग तीं चंद्राचीं असोत किंवा रवीचीं असोत, प्रमुखत्वानें विचार केला पाहिजे, ही गोष्ट विद्यार्थ्यांनीं अवश्य लक्षांत ठेवावी. सूर्य व चंद्र ह्यांच्या ग्रहणांपैकीं सूर्यग्रहणें अधिक महत्त्वाचीं आहेत. सूर्य संक्रमणापेक्षा तीं कमी महत्त्वाचीं नाहांत. ग्रहणाचा विचार करतांना तीं कोणत्या राशींमध्ये होत आहेत, हें प्रथम पाहिलें पाहिजे. राशिचक्रांतील द्वादश राशींचे गुणधर्म व स्वभाव ह्यांना धरून त्यांचीं फळें अनुभवास येतात. राशींचे स्वभावानुरूप चर, स्थिर आणि द्विस्वभाव असे जे तीन विभाग केलेले आहेत, त्यांपैकीं **चर** राशींतील ग्रहणें म्हणजे मेष, कर्क, तुला व मकर ह्या चर राशींमधील ग्रहणें, तीव्र फलदायी असतात, परंतु त्यांचीं फळें चिरकाळ टिकणारी नसतात. **चर** राशींतील ग्रहणाचा संबंध देशामधील राज्यव्यवस्था, आंतरराष्ट्रीय व परराष्ट्रीय राजकारण, राजकीय चळवळी आणि सुधारणा ह्यांच्याबरोबर असलेला आढळतो. **स्थिर** म्हणजे वृषभ, सिंह, वृश्चिक व कुंभ राशींतील ग्रहणांचे परिणाम फार दीर्घ काळपर्यंत टिकणारे असून, त्यांचा संबंध आधिभौतिक संकटें, देशामधील संपत्ति, पिकें, खनिज द्रव्यें आणि मालमत्ता ह्यांच्याशीं असतो **द्विस्वभाव** म्हणजे मिथुन, कन्या, धनु व मीन राशींमधील ग्रहणें दीर्घकाळ फलादेश दर्शवीत नाहींत व त्यांचा संबंध देशामधील सामान्य लोकांची स्थिति, त्यांचे व्यापार, आरोग्य, शिक्षण, धार्मिक चळवळी, गुन्हे, सफर आणि प्रवास ह्यांचेबरोबर आढळतो.

द्वादश राशींचे तत्त्वानुरूप जे चार विभाग केलेले आहेत, त्यांपैकीं **अग्नितत्त्वाच्या** म्हणजे मेष, सिंह व धनु राशींमधील ग्रहणें देशामध्यें अस्वस्थता, नानाविध चळवळी, तंटेबखेडे, मारामाऱ्या, (परिस्थितीप्रमाणें)

युद्धें व लढाया, अधिकारी व उच्चवर्ग ह्याच्यामध्यें मृत्यु, अवर्षणें होऊन जनतेवर नवीन करांचें ओझें लादलें जातें व हवेमध्ये उष्णता फार वाढते **पृथ्वीतत्त्वाच्या** म्हणजे वृषभ, कन्या व मकर राशींमध्यें होणारीं ग्रहणें देशामधील उत्पन्नें, पिकें, शेतकी, व्यापार व सापत्तिक स्थिति ह्याच्यामध्ये अव्यवस्था उत्पन्न होऊन अधिकारारूढ पक्षास त्रास होतो **वायुराशीमधील** म्हणजे मिथुन, तुळा व कुंभ राशींमध्यें होणाऱ्या ग्रहणांनीं वादळे व भयंकर तुफानी हवा ह्यापासून फार नुकसान होतें, परराष्ट्रीय भानगडी उपस्थित होतात परिस्थितीप्रमाणे कायदे करणाऱ्या संस्थास हा काळ फारच दगदगीचा जातो **जलराशी**मधील म्हणजे कर्क, वृश्चिक व मीन ह्या राशींमध्यें होणाऱ्या ग्रहणामुळे अतिवृष्टि, महापूर, समुद्रामधील वादळें, रोगराई, साथीचे रोग आणि गुप्त गुन्हे घडतात, मृत्युसंख्या वाढते आणि प्रसिद्ध पुरुषाचे मृत्यु होतात राशिचक्रातील **मनुष्यराशींचा** म्हणजे मिथुन, कन्या, तूळ, धनु व कुंभ म्हणजे संबंध मानवजातींशीं, **पशुराशींचा** म्हणजे मेष, वृषभ, सिंह, धनु (उत्तरार्ध) व मकर ह्याचा संबंध जनावराशीं, **कीटकराशींचा** म्हणजे वृश्चिक व कर्क ह्याचा संबंध कीटकाशीं आणि **जलचरराशींचा** म्हणजे कर्क, मकर व मीन राशींचा संबंध जलचराशीं आहे हा संबंध ग्रहणाचा विचार करताना लक्षात ठेवला पाहिजे

साधारणपणें वर लिहिल्याप्रमाणें राशींच्या गुणधर्मानुरोधानें ग्रहणाचीं फलें कोणत्या स्वरूपाचीं अनुभवास यतील, ह्याचा स्पष्ट बोध होईल असें वाटतें काहीं ज्योतिषी ( आंग्लज्योतिर्विद ) राशींच्या द्रेष्काणाचाही विचार करण्यास सांगतात उदाहरणार्थ, मेष राशीच्या पहिल्या द्रेष्काणात होणाऱ्या ग्रहणामध्यें मेष राशीचे पूर्ण गुणधर्म दिसून येतात

मेष राशीच्या दुसऱ्या द्रेष्काणात होणाऱ्या ग्रहणामध्ये सिंह राशीच्या गुणधर्मांचा अंश आलेला आढळतो तर मेष राशीच्या तिसऱ्या द्रेष्काणामध्यें होणाऱ्या ग्रहणामध्यें धनुराशीच्या गुणधर्माची छटा दिसून येते द्रेष्काणावरून फलामध्यें सूक्ष्मता येते हें खरें, परंतु नवीन विद्यार्थ्यांनीं त्याचा कांहीं काळपर्यंत विचार केला नाहीं तरी चालेल ह्या शाखेंत त्याची थोडी बहुत प्रगति झाल्यावर द्रेष्काणाचीं फलें लक्षात घ्यावीं

साधारणपणें ग्रहणें ज्या राशीमध्यें होतात, त्या राशीच्या अमलाखालच्या देशावर व शहरावर त्याचा शुभाशुभ परिणाम ग्रहणकाळीं रवि, चंद्र ज्याप्रमाणें शुभ अशुभ दृष्टियोगानें संबंधित असतात, या अनुरोधानेंच झालेला पाहाण्यास मिळतो तसेंच, पृथ्वीवरील ज्या भागामध्यें हीं ग्रहणें दृश्य असतात, तेथें त्याचे परिणाम फार स्पष्ट दिसून येतात जातकामध्यें जन्मकालचे रवि चंद्र, लग्नाचे उदित व माध्याह्न केन्द्रीं उदित असणारे अंश किंवा जन्मस्थ ग्रह ह्यावर ग्रहणें पडलीं असता, त्या त्या जातकाला फलादेशाचा अनुभव येतो त्याचप्रमाणें राष्ट्रीय ज्योतिष विभागामध्येंही त्या त्या देशाशीं संबंधित असणाऱ्या कुंडल्यांच्या केन्द्राच्या उदित अंशावर, तसेंच कुंडलींतील ग्रहावर ग्रहणें होत असता, त्या त्या देशामध्येंही फलादेशाचा अनुभव आलेला पाहाण्यास मिळतो ग्रहणकाळीं रवि चंद्र पापयुक्त व पापग्रहाच्या अशुभ दृष्टियोगामध्यें असता, अशुभ असाच अनुभव येतो तसेंच कुंडलीमधील पापग्रहाच्या अंशावर ग्रहण होत असून, तें अशुभ ग्रहाच्या अशुभ दृष्टियोगानें संबंधित असता, फारच कटुतम आपत्तींबरोबर त्या त्या देशाना किंवा त्या त्या व्यक्तींना झगडावें लागतें

देशभिन्नत्वामुळे ग्रहणकाळच्या कुडल्या निरनिराळ्या येतात आणि म्हणून राशींवरून सागितलेल्या सामान्य फलाबरोबरच त्याच्या स्थानफलाचाही विचार केला असता, कोणत्या देशात कोणत्या प्रकारचीं फलें अनुभवास येतील, हें सहज निश्चित करता येतें. रवि-चंद्राच्या ग्रहणाचीं स्थानपरत्वें अनुभवास येणारीं फलें कोणत्या तऱ्हेचीं येतील, ह्याचा विचार करतेवेळीं पृष्ठ ३६ ते ४० ह्यामध्यें रवि-चद्र सयोगाचीं स्थानपरत्वें फलें दर्शविलीं आहेत, तींच लक्षात ध्यावयाचीं आहेत. चद्रग्रहणकाळीं रवि-चद्र प्रतियोग घडत असल्याकारणानें, तो ज्या दोन स्थानामधून होत असतो, तीं दोन्ही स्थानें फलादेशात समिश्र झालेलीं आढळतात हीं फलें पाहाताना रवि चद्राबरोबर इतर ग्रहाचे कोणते दृष्टियोग होत आहेत, हें अवश्य पाहिलें पाहिजे कारण ग्रहणकाळीं रवि चद्राबरोबर शुभ दृष्टियोग होत असल्यास, सुधारणा व भरभराट झालेली दिसून येते. परतु अशुभ दृष्टियोग मोठ्या सकटपरपरेचे द्योतक असतात. स्थानपरत्वें ग्रहणाचीं फलें पाहाताना ज्या राशींमध्ये ग्रहणें होतात, त्या राशींचे **कारकत्व** लक्षात ठेवलें पाहिजे मेषादि द्वादश राशि तन्वादि द्वादशस्थानाच्या द्योतक आहेत, म्हणजे वृषभ राशीमध्यें होणारें ग्रहण निवक्षित देशाच्या लाभस्थानीं झालें, तर त्या देशाच्या कायदे करणाऱ्या सस्थेमध्ये सापत्तिक बाबतीं-सबधीं विचारविनियोग प्रमुखत्वानें केला जातो

चद्रग्रहणे जर खग्रास नसतील किंवा केन्द्रस्थानात होत नसतील किंवा पापग्रहानें पीडित अर्थात् अशुभ ग्रहानें युक्त किंवा अशुभदृष्टियोगानें सबधित नसतील, तर त्याचा परिणाम पुष्कळच सौम्य आढळतो. मामान्यत **चंद्रग्रहणा**चा परिणाम सामान्य जनतेवर घडतो व **सूर्यग्रहणा**चा परिणाम राजे, अधिकारीवर्ग, राजशकटाची धुरा वाहाणारे लोक व देशामधील राजकारण ह्यावर घडतो

ग्रहणाच्या फळाची कल्पना उत्तम रीतीनें यावी, म्हणून त्याचीं राशिफळें व स्थानफळें ह्याचा विचार कसा करावा ह्यासंबधात केलेलें विवेचन विद्यार्थ्यांला पुष्कळच मार्गदर्शन करील आता ग्रहणाच्या विचारामध्यें तीं किती काळ टिकतात आणि त्याचीं फलें केव्हा दृष्टोपत्तीस येतात, हें कळलें म्हणजे ग्रहणाचा विचार पूर्ण होईल ह्यासंबधात आग्ल ज्योतिर्विदांनी अनेक मतें प्रसिद्ध केलीं आहेत, त्या सर्वांचा येथे ऊहापोह करण्याची आमची इच्छा नाहीं **चंद्रग्रहणापेक्षा सूर्यग्रहणाचा** अमल जास्त काळपर्यंत असलेला अनुभवास येतो **ग्रहण काळच्या रवि-चंद्राबरोबर पुढील काळांत ज्या ज्या वेळी गोचरीचे ग्रह अशुभ दृष्टियोग करतात त्या त्या वेळी ग्रहणांचीं वाईट फळे अनुभवास येतात,** असें अनेक कुडल्याचा विचार करताना आमच्या पाहाण्यात आलें आहे ह्या साध्या नियमाच्या आधारानें ग्रहणफलाचा काळ पुष्कळच बरोबर ठरविता येतो गोचरीचे ग्रह ज्या ज्या वेळीं ग्रहणकाळच्या रविचद्राबरोबर केन्द्रयोग, प्रतियोग आणि अशुभ-ग्रह-युतियोग करतील त्या त्या वेळीं ग्रहणानीं दर्शित केलेल्या अशुभफलाची प्राप्ति होते आणि ग्रहणांनी शुभफळें दर्शित केलीं असता जेव्हा गोचरीच्या ग्रहाचे ग्रहण-बिंदूबरोबर शुभयोग होतात, तेव्हा शुभफलाची प्राप्ति होते वरील विवेचनावरून वाचकाच्या लक्षांत येईल, कीं ग्रहणाची फलमर्यादा रवि सग्रहणापेक्षा जास्त काळपर्यंत अनुभवास येत असल्यामुळें, त्याच्याकडे विशेष लक्ष देणें इष्ट आहे साधारणपणें सूर्यग्रहण लागल्यापासून सुटेपर्यंत जितके तास दिसतें, तितकीं वर्षे सूर्यग्रहणाचा अमल राहातो चद्रग्रहणाचा अंमल जितके तास तें दिसतें, तितके महिने राहातो

प्रकरण १३ वें

# कांहीं मेदिनीय कुंडल्यांमधील कालनिर्णय-विचार

रवीचीं चार मुख्य संक्रमणें, अमान्त किंवा पौर्णिमान्त काळ, ग्रहणें, इत्यादि कुंडल्यांचे चार केन्द्रावर जे उदित अंश असतात, तसेंच रवि, चंद्र, लक्ष्मीसहम, इत्यादिकांच्या अंशावरून ज्या ज्या वेळीं नेपच्यून, हर्शल, शनि किंवा मंगळ, वगैरे ग्रहांचें गोचरीनें भ्रमण होणें, किंवा वरील उत्तेजक राशींच्या अंशाबरोबर ज्या ज्या वेळीं वरील ग्रहांचे केन्द्रादि शुभाशुभ योग घडतात, तेव्हां त्या त्या तारखांच्या सुमारास ज्या स्थळांच्या त्या कुंडल्या असतात, तेथें तेथे शुभाशुभ फलादेशाच्या घटना घडलेल्या अनुभवास आलेल्या पाहाण्यास मिळतात, असें विवेचन दहाव्या प्रकरणामध्यें केलेलें वाचकांच्या ध्यानीं असेलच तसेंच, ज्या ज्या वेळीं वरील शीघ्र संस्कार ग्रहण करणाऱ्या राशि, अंश, कलेमध्यें एखादा ग्रह वक्री होतो, स्तंभी होतो किंवा मार्गी होतो त्या त्या वेळीं त्या ग्रहाच्या स्वभावगुणधर्माप्रमाणें शुभाशुभ फलें त्या त्या तारखेच्या सुमारास त्या त्या स्थळीं अनुभवास येतात आता आपणास गुरु-शनि महापरिवर्तन युतियोग अथवा औपक्रमिक काऱ्या किंवा एखाद्या देशविषयक विशिष्ट घटना घडणाऱ्या आरंभकाळच्या कुंडलीवरून पुढील कालनिर्णय आंग्लज्योतिर्विद्‌ कसा करतात, ह्याचा विचार प्रस्तुतच्या प्रकरणामध्यें केलेला आहे

तारीख २६ जानेवारी, १८४२ सालीं मकरराशीमध्यें झालेल्या गुरुशनि महापरिवर्तन करणाऱ्या युतियोगाच्या कुंडलीवरून प्रसिद्ध आंग्लज्योतिर्विद्‌ पहिला झडकील ह्यानें डायरेक्शन पद्धतीच्या आधारेंच

सन १८५७ सालचें भारतवर्षांमधील क्रांतिकारक बडाचें भविष्य सन १८४६ मध्यें आपल्या "झडकील्स लीगसी टु ब्रिटिश किंग" ह्या पुस्तकामध्यें प्रसिद्ध केलें होतें, तसेंच, शनिगुरुयुतियोगाच्या कुडल्यावरून प्रसिद्ध ज्योतिर्विद् सफारिअल ह्यानेंसुद्धा आपल्या अनेक पुस्तकामध्यें डायरेक्शन पद्धतीप्रमाणें अनेक भविष्यें केलेलीं पाहाण्यास मिळत आहेत

गोचर ग्रहपद्धतीखेरीज प्रायमरी व सेकण्डरी अशा भविष्यकाल निर्णय करण्याच्या दोन पद्धति आंग्लज्योतिर्विदामध्यें आहेत प्रायमरी पद्धतीनें कालनिर्णय करण्याच्या पद्धतीला त्रिकोणमितीचे व गणिताचें चांगलेंच ज्ञान असावें लागतें व साधारणपणें इतका गणिताचा खटाटोप करणारे फारच थोडे ज्योतिषी पाहाण्यास मिळतात जवळ-जवळ गेल्या पन्नास-साठ वर्षामध्यें सेकण्डरी – ज्याला आम्हीं **दिनवर्ष पद्धति** असें नाव दिलें आहे—तीच पद्धति आज सर्वत्र रूढ आहे. ह्या पद्धतीमध्यें जन्मानतरचा एक दिवस हा **सव्य** दिनवर्ष पद्धतीमध्यें एका वर्षाबरोबर घेतला आहे तर **अपसव्य** दिनवर्ष पद्धतीप्रमाणें जन्मापूर्वींचा एक दिवस हा एका वर्षाबरोबर मानलेला आहे. ह्या दोन दिनवर्ष पद्धतींनीं व गोचर ग्रहाच्या आधारें पुढील कालनिर्णय करण्याची प्रथा आहे तसेंच, प्रायमरी डायरेक्शनप्रमाणेंच वर्षास एक अश ह्याप्रमाणें इष्ट वर्षाला येणारा अशाचा धृवाक (आर्क) सर्व ग्रहात व सर्व भावात मिळवून किंवा उणें करून सव्य व अपसव्य पद्धतीच्या येणाऱ्या कालदर्शकिकाच्या आधारें भविष्य करण्याची पद्धति, "**मूलांग कालनिर्णय पद्धति**" (रॅडिआक्स डायरेक्शन पद्धति), जी सन १९१५ पासून विशेष रूढ होत आहे, त्याच पद्धतीच्या साह्यानें आम्हीं जीं भविष्यें केलीं होतीं व ज्याचा

अनुभव चागल्या रीतीनें आलेला पाहाण्यास मिळाला आहे, त्याचाच येथें थोडाबहुत विचार करणें आहे त्याकरिता प्रथम आपण मकर राशीमधील महापरिवर्तन कुडली विचारार्थ घेतली आहे व त्यानतर इतर महत्त्वाच्या कुडल्याचा विचार करू

तारीख २६ जानेवारी, १८४२ रोजीं सायन मकर राशीच्या ८ अश, ५४ कला व १ विकलेमध्ये चाद्व एकोणिसाव्या शतकामध्यें पहिल्यादाच ही महापरिवर्तन दर्शविणारी युति सकाळीं स्टँ टाईम ११ वाजता झाली आहे त्या वेळेची सायन भावचलित कुडली खालीलप्रमाणें आहे.



**ग्रहांच्या क्रांति** – रवि १८ अ. ४० क. (दक्षिण), चंद्र १८ अ. ४ क. (उत्तर), मंगळ ६ अ. २२ क. (द.), बुध १८ अ. ५३ क. (द.), गुरु २३ अ. ४ क (द.), शुक्र २१ अ. २७ क. (उ.), शनि २२ अ ३२ क. द, हर्शल ३ अ. ५६ क. (द.), नेपच्युन १६ अ. ३५ क. (द.), प्लुटो ८ अ. १७ क. (द.), लग्न ८ अ. ६ क. (उ.), दशम २२ अ ४६ क. (द.).

भारतवर्षाचें दिल्ली हें राजधानीचें शहर सन १९११ च्या दिल्ली दरबारनंतर झालेलें आहे. तत्पूर्वी राजधानीचें शहर कलकत्ता होतें व ह्या शनिगुरुयुतिकाळची कलकत्ता ह्या राजधानीच्या शहराची कुंडली मांडली असता पूर्वक्षितिजावर वृषभ राशिचे ३ अंश, २९ कला उदय पावत आहेत व माध्यान्ह केंद्रीं मकरराशीचा २४ वा अंश उदित होत आहे व ही गुरु-शनि-युति नवम अर्थात् धर्मस्थानामध्यें येत आहे

क्रांतिकारक चळवळीचा उगम धार्मिक तत्वावर झाला व प्रथम बंडाची सुरुवात तारीख १० मे, १८५७ रोजीं एकदम झालेली आहे. ह्यापूर्वीच इंग्रज व त्यांची हिंदी फौज ह्यांच्यामध्यें अशांतता चालू झालेली होती ह्यावेळीं अपसव्य पद्धतीप्रमाणें दशमचलित नवमस्थानामधील गुरु-शनि युतियोगा-बरोबर युक्त झालेलें होतें व ह्याच्या सार्ध केन्द्रयोगामध्यें मंगळ व हर्शल ह्या दोन ग्रहांची युति गोचरीनें ६ मे, १८५७ ह्या दिवशीं वृषभराशीच्या २४ अंश, ३२ कलेमध्यें झालेली आहे. मंगळ हर्शल मूळचे व्ययस्थानामध्यें युतीमध्यें आहेत चलित रवि सत्यदिन वर्षपद्धतीप्रमाणें कुंभ राशीच्या २० व्या अंशात आलेला आहे, चलित चंद्रभ्रमण कुंभ राशींमधून होत होतें. हर्शल-मंगळ गोचरीनें चलित रवीच्या केन्द्रयोगामधून जात होते. गोचर शनीचें भ्रमण मूळ गुरुशनियुतियोगाच्या

प्रतियोगामध्यें होत होते सन १८५६ व १८५७ सालामधील ग्रहणें मेष व तुला राशींमधून म्हणजे गुरुशनियुतियोगाच्या केन्द्रामधून होत होतीं तारीख १० मे, १८५७ च्या अगोदरपासूनच अस्वस्थतेला सुरवात झाल्याचें स्पष्ट दिसत आहे मूळच्या रवीच्या केन्द्रामधून मगळाचें गोचरीनें भ्रमण होऊं लागले व रवि व मगळ गोचरीनें चलित रवीच्या केन्द्रयोगात येण्याच्या सुमारास जेन्हा गोचरीनें चद्र वृश्चिकेमधून मगळाच्या प्रतियोगात येऊं लागला व ह्या महिन्याची पौर्णिमा (अर्थात् रविचद्र प्रतियोग) तारीख ९ मे रोजीं झाली व तिनेंच हा क्रातिकारक बडाचा भडका चेतविला आहे, हें पाहाण्यासारखें आहे ह्यावरून वाचकाच्या सहज लक्षात येईल, कीं मूळचे योग गोचरीनें उत्तेजित झाल्यानतरच होणाऱ्या घटना घडत असतात

सन १९३० मध्यें हर्शलाचें भ्रमण मेषेमधून, शनीचे भ्रमण मकरेमधून, गुरूचें भ्रमण कर्केमधून व मगळाचें भ्रमण मकर, मेष व कर्क ह्या राशींमधून होत असताना भारतवर्षामध्यें मिठाच्या सत्याग्रहाची चळवळ चालू होती त्यात अनेक लोक कारागृहात गेले, तर अनेकान स्वर्गाची वाट धरावी लागली ह्या काळ राजसत्तेला अत्यत त्रासाचा व अस्वस्थतेचा असा गेलेला पाहाण्यास मिळाला आहे ह्या वेळेचीं ह्या अनिष्ट ग्रहाचीं भ्रमणे ह्या गुरुशनियुतीच्या केंद्रातून अशुभ दृष्टियोगामध्यें होत होतीं तसेच, ह्या ग्रहाचें गोचर भ्रमण केन्द्रावरून होत होतें

सन १९४० ते १९४१ ह्या काळामध्यें गुरु-शनियुतियोग तीन वेळा झालेले पाहाण्यास मिळतात पहिला युतियोग ८ ऑगस्ट, १९४० ह्या दिवशीं वृषभ राशीच्या १४ अश, २८ कलेमध्यें झाला होता दुसरा योग तारीख १९ ऑक्टोबर, १९४० रोजीं वृषभ राशीच्या १२ अश,

३१ कलेमध्यें झाला होता व तिसरा योग तारीख १५ फेब्रुवारी, १९४१ मध्यें सकाळीं स्टॅ. टा. ११ वाजून, ४० मिनिटानीं वृषभ राशीच्या ९ अंश, ८ कलेमध्यें झालेला आहे. जेव्हा मोठे ग्रह एकापेक्षा अनेक वेळा युतियोगामध्यें येतात, त्या वेळीं शेवटलाच योग फार महत्त्वाचा असतो व त्याच शेवटल्या कुंडलीवरून भावी फलादेश द्यावयाचा असतो. कारण त्याचा अमल पुढें येणाऱ्या वीस वर्षांच्या कालापर्यंत असतो. ह्याच योगाच्या कालमध्यें म्हणजे सन १९४७ सालीं भारताला स्वतंत्रता प्राप्त झाली आहे. ह्या युतियोगाची कुंडली देशामध्यें त्या काळीं जी 'क्विट् इंडिया' ("भारत छोडो") ही घोषणा झाली त्याचें पूर्ण दिग्दर्शन करीत आहे. हा गुरुशनियुतियोग मूळच्या सन १८४२ सालच्या महापरिवर्तन दर्शविणाऱ्या युतियोगाच्या त्रिकोण दृष्टियोगामध्यें होत आहे व सन १९४२ सालच्या कुंडलीच्या लग्नामधून होत असून तो त्या काळचें दशमस्थान व गुरुशनियुति ह्याच्या पंचमातून व त्रिकोण दृष्टियोगामध्यें होत असल्याकारणानें लवकरच राजकीय घडामोडींमध्यानें महत्त्वाच्या कायदेकानूमध्ये होणारा फेरफार दिग्दर्शित करीत आहे. ही कुंडली राजसत्तेला विघातकच आहे. लग्नीं हर्शल उदित आहे व त्याच्याबरोबर दशमात केन्द्रयोगामध्यें रवि आहे. चंद्र राहूनें युक्त असा आहे व तो रवि व हर्शल ह्याच्या अशुभदृष्टियोगामध्यें आहे. अष्टमात मंगळ असून ह्या कुंडलीच्या दशमस्थानावरील उदित अंश त्याच्यावरोबर अर्ध केन्द्रयोगामध्यें आहे. शनिगुरुयुति व्ययस्थानामध्यें असून दशमबिंदु त्याच्या बरोबर केन्द्रयोग करीत आहे. शनीचें गोचरीनें भ्रमण ह्या शनिगुरुयुतियोगाच्या केन्द्रामधून व दशमस्थानाच्या प्रतियोगामधून होत असताना आंग्ल राज्यकर्त्यांनीं भारतावरील राजसत्ता सोडलेली आहे.

सन १८४२ साली शनिगुरुयुतियोगकाळच्या कुंडलीमध्यें सव्य व अपसव्य पद्धतीच्या कालदर्शिकाही ह्या घटनेला पूरक अशाच आहेत. ह्यावेळीं सव्यदिनवर्षपद्धतीप्रमाणें शनि चलित होऊन दशमबिंदुजन्म ह्याच्याबरोबर युक्त होत आहे. लग्न चलित होऊन व्ययस्थानामधील मगळाबरोबर सार्ध केन्द्रयोग करण्यास येत आहे. चलित लग्नबिंदु जन्मचंद्राबरोबर व जन्मराहूबरोबर युतियोग सन १९४५ व १९४६ ह्या सालामध्यें करीत आहे. चलित दशम हें जन्मचंद्राबरोबर प्रतियोगात येत आहे व चलित रवि जन्मशनि व गुरु ह्याच्याबरोबर सार्ध केन्द्रयोग करण्यास येत आहे. अपसव्य पद्धतीप्रमाणें चलित राहु जन्मरवीबरोबर युति करीत आहे. चलित दशम चलित शनीच्या केन्द्रयोगामध्यें आलेलें आहे. चलित दशम चलित मगळाच्या केन्द्रयोगात येत आहे; चलित रवि जन्म प्लुटोबरोबर प्रतियोग करीत आहे; चलित रवि हा जन्मकाळच्या लग्नाच्या प्रतियोगामध्यें आलेला आहे. मूळाग कालनिर्णय पद्धतीनें ह्या वर्षी अशुभ योगच होत होते व ते सर्व गोचरीनें उत्तेजित होणार होते व त्यामुळेंच सन १९४७ हें वर्ष आग्लसत्तेला विघातक जाईल व भारत स्वतंत्र होईल किंवा त्यामधानें महत्वाचे कायदेकानु अमलात येतील असें भविष्य सन १९२४ मध्यें आम्हीं त्या काळीं प्रसिद्ध करीत असलेल्या **ज्योतिर्माला** नावाच्या मासिकात प्रसिद्ध केलें होतें.

## भारत स्वतंत्र झाला त्या काळची सायनभावचलित कुंडली

तारीख १५ ऑगस्ट, १९४७ रोजीं म्हणजे गुरुवार रात्रीं स्टँ. टाईम १२ वाजून एक मिनिट झाले असता, अर्थात् तारीख १४ वी पुरी होऊन १५ वी लागण्याच्या वेळीं जाहीर झाल्याप्रमाणें भारत व पाकिस्तान अशीं दोन राष्ट्रें हिंदुस्थानामध्यें पूर्वीच्या राजसत्तेच्या

खलित्यानुसार अस्तित्वात आलीं. भारत स्वतंत्र झाल्याची घोषणा दिल्ली येथें मोठा समारंभ होऊन करण्यात आली व पाकिस्तान कराची येथें निर्माण झालें. भारत स्वतंत्र झाला त्या वेळची सायन भावचलित जन्मकुंडली खालीलप्रमाणें आहे.




**ग्रहांच्या क्रांति**

रवि १४ अ. उ. २८; चंद्र २४ अ. उ. ४६; मंगळ २३ अ. उ. ४१; बुध १९ अ. उ. ३५; गुरु १६ अ. द. ३९; शुक्र १७ अ. उ. ३२; शनि १७ अ. उ. २९; हर्शल २३ अ. उ. ३८, नेपच्युन २ अ. द. ७; प्लुटो २३ अ. उ. २२, लग्न २० अ. उ. २०; दशम १६ अ द. २७.

ही कुंडली कशी आहे, काय दर्शवीत आहे, इत्यादिमवधानें सविस्तर विवेचन ह्या ल्हानशा पुस्तकामध्यें करणें शक्य नाहीं. त्यासाठीं एक स्वतंत्र विवेचनात्मक पुस्तकच लिहावें लागेल. ह्या कुंडली मध्यें धनस्थानामधील हर्शल व कर्केचा नीच क्षेत्रामधील मंगळ असून तो षष्ठस्थानामध्यें पडलेल्या गुरूबरोबर सार्ध केन्द्रयोग करण्यास जात आहे. ही स्थिति सांपत्तिक दृष्टीनें भारताला कर्जाच्या खाईमध्येंच लोटणारी आहे. जनता कराच्या बोजामुळें त्रस्त होईल. राहाणीचें मान उच्च होण्याऐवजीं दोन्ही टोकें कशीं मिळतात ह्याचाच विचार प्रजाजनांना करण्याचा प्रसंग येईल हा मंगळ पंचमामधील नेपच्यूनच्या केन्द्रयोगामध्यें जात असल्याकारणानें नेत्याच्या अव्यावहारिक धोरणामुळें जनता व्यसनाधीनतेमधून मुक्त होण्याच्या ऐवजीं देशांत गुंडगिरी वाढेल पोलीस व संरक्षण खातें, मिलिटरी, नेव्ही, आर्मी, इत्यादींवर भरमसाट खर्च करावा लागेल धनाधिपति चंद्र कर्केचा स्वगृहीं आहे व षष्ठस्थानामध्यें असलेला गुरु हा त्याच्याबरोबर त्रिकोण दृष्टियोग करण्यास जात आहे. हा भविष्यत्‌यशाल्योग स्थिरग्रहाच्या गतीनें होणार असल्यानें भावी पिढ्याकरितां अत्यंत शुभ आहे. षष्ठस्थानाचा अधिपति व व्ययस्थानाचा अधिपति मंगळ ह्यानें शुक्र व रवीबरोबर केलेला अशुभदृष्टियोग सोडून, आतां तो चलित होऊन पुढें आलेला आहे, हें फार चांगलें झालेलें आहे. सरासरी २० वर्षांनीं म्हणजे सन १९७७–७८ च्या सुमारास तो गुरूबरोबर शुभदृष्टियोग करण्यास येईल. ही स्थिति सांपत्तिक दृष्टीनें बरीच अनुकूल अशी होत आहे. ह्या कुंडलीमधील चतुर्थामधील शनि भाग्याधिपति व दशमाधिप ह्याची स्थिति चांगली नाहीं, त्यामुळें देशांत राहाण्याच्या घराचा तुटवडा, अन्नधान्याची तूट व देशांतील शेतीच्या

पिकाची कमतरता, इत्यादींचा पूर्ण बोध करीत आहे हर्षी हा शनि चलित होऊन मगळाच्या अर्धकेंद्रयोगामध्यें आला असून तो मूळचा शुक्राशेवर युक्त झालेला आहे चलित शनीनें मूळच्या दशमाबरोबर केलेला प्रतियोग सोडला आहे, तरी तो दशमाच्या समकातियोगामध्यें बराच काळ राहाणारा आहे शनीचें गोचर भ्रमण कुंभेमधून सन १९६२ पासून सुरू झाले आहे व नेपच्युन गोचरीनें त्याच्या केन्द्रामधून व मूळ गुरूलग्न भ्रमण करणार असून तो मूळ रवीच्या केन्द्रयोगात येणार आहे ही स्थिति सन १९६७ पर्यंत राहील त्यामुळे हा काळ भारताला अनिष्टच आहे असे मानवें लागतें

भारतवर्षाच्या इतिहासामध्यें दुसरी एक अत्यंत महत्त्वाची अशी घटना तारीख २६ जानेवारी, १९५० ह्या दिवशीं दिल्ली येथें घडून आलेली आहे त्या वेळचे गव्हर्नर जनरल श्रीयुत चक्रवर्ती राजगोपालाचारी ह्यानीं सकाळीं १० वाजून, १८ मिनिटें स्टँ टा ह्या वेळीं भारत लोकसत्ताक झाल्याचें आज्ञापत्र जाहीर रीतीनें वाचलें व पुढें नियोजित अध्यक्ष श्रीयुत बाबू राजेंद्रप्रसाद ह्यानीं शपथ घेतली भारतवर्षाच्या अध्यक्षाचा ध्वज उभारण्यात आला व गव्हर्नर जनरलचा ध्वज उतरला गेला. ही घटना फारच महत्त्वाची असल्याकारणानें ह्या औपक्रमिक काळाची कुंडली ही बर भारत स्वतंत्र झाला त्या १५ ऑगस्ट, १९४७ च्या कुंडलीपेक्षा अधिक महत्त्वाची आहे तारीख २६ जानेवारी, १८४२ च्या महापरिवर्तन दर्शक गुरुशनियुतियोगाच्या कुंडलीबरोबर ह्या कुंडलीचें अत्यंत साम्य असल्याकारणानें भारतवर्षासंबधानें पुढील काळचें भविष्य वर्तवीत असताना ह्याच कुंडलीस प्राधान्य द्यावें, असें आमचें मत आहे.

# प्रजासत्ताक भारताची सायन भावचालित कुंडली

सायनलग्न

मेष ५° ४६ मीन

कुंभ २८°

मकर २८°

मकर ३°-४९ दशम

धनु १०°

वृश्चिक १३°

तुला ५° ४६

सप्तम

सिंह २८° कन्या

कर्क २८°

चतुर्थ कर्क ३° ४९

मिथुन १०°

वृषभ १३°

रवि १८ अ. ५२ क. ( द. ); चद्र १५ अ. ३३ क. (उ.), मगळ ० अ. ५८ क. ( द. ) बुध १८ अ. ५७ क. ( द.); गुरु १७ अश ४१ क. ( द.); शुक्र १० अ. २७ क. ( द. ) शनि ६ अ. २३ क (उ.); हर्शल २३ अ. ४२ क. (उ.) नेपच्युन ५३ अ. १९ क. ( द. ) प्लुटो २३ अ. ३२ क. (उ. ); लग्न २० अ. १७ क (उ. ); दशम २३ अ. २३ क ( द. ).

ह्या प्रजासत्तात्मक भारतवर्षाच्या कुंडलीसबधानें आम्ही आमचे विचार येथें थोडक्यात देत आहोंत. ह्या कुंडलीचें व सन १८४२ सालामधील मकर राशीमधील महापरिवर्तन दर्शविणाऱ्या

गुरुशनियुतियोगाच्या कुंडलीबरोबर पुष्कळच साम्य आहे ह्या वेळीं तीच अग्रेसरत्व पत्करणारी व धडाडीनें कार्य करणारी राशिचक्रामधील आद्य मेषराशि पूर्वक्षितिजावर उदय पावत आहे परंतु लग्नाधिपति मंगळ हा आपल्या क्षेत्रस मुख राशीमध्ये केन्द्रामध्यें असून तो एकादशस्थानामधील रवि, गुरु व शुक्र ह्यांच्यामध्यें परम स्नेह दृष्टियोगामध्यें आहे तसेच, लग्नीं उदित असणारा राशीचा अंश हा रवि-गुरु व शुक्र ह्यांच्या स्नेहदृष्टीमध्यें आहे. ही स्थिति भाग्य, ऐश्वर्य, यश, मदत व स्नेहसंबंध ह्या दृष्टीनें फारच अप्रतिम झालेली आहे परंतु येथें लग्नेशाला भीरुत्वाचा कलंक लागलेला आहे लग्नेश मंगळ हा केतूनें युक्त असा सप्तम स्थानामध्यें असल्या कारणानें परदेशस्थ राष्ट्रें भारतासंबंधाने काय बोलतील ह्याचा आम्ही वाजवीपेक्षा फाजील तऱ्हेनें विचार करण्यातच कालक्रमण करीत असून स्वतःवर भीरुत्व ओढवून घेत आहोंत परकीय शत्रूला अर्थात् उघड प्रतिस्पर्ध्यांना आम्ही ठोशास ठोसा देण्याची राजनीति अवलंबीत नसल्यामुळे स्वजनद्रोही ठरत असून भारतवासीयांची ससेहोलपट शत्रूकडून उघड होत आहे

सन १८४२ च्या कुंडलीमधील रवीवरून गुरूचें गोचरीनें भ्रमण होत असता व त्या कुंडलीमध्यें चलित रवि हर्शलबरोबर शुभदृष्टियोग, तसेंच चलित गुरूबरोबर शुभदृष्टियोग कर्कराशीमधून व त्या कुंडलीच्या चतुर्थ स्थानामधून जात असतानाच ही अत्यंत महत्त्वाची घटना घडत आहे. ब्रिटिश साम्राज्यामधून भारत स्वतंत्र झाला त्या वेळेच्या कुंडलीपेक्षां ही कुंडली पुष्कळच यश दर्शविणारी अशी आहे लग्नाधिपति मंगळ हा केतुयुक्त झाल्याकारणानें प्रजासत्तात्मक भारताला उघड शत्रूचें फारच भय आहे व त्याकरिता भारताला अखंड सावध राहावें लागेल व ही चिंता किंवा भीतीचें वातावरण बराच काळपर्यंत राहील लग्नेश निर्बली

व केतूनें ग्रासला गेल्याकारणानें बराच काळपर्यंत परराष्ट्रें आपणास काय म्हणतील ह्याच न्यूनगंडानें भारत व्यथित झालेला दिसेल. भारताचा नेता अर्थात् दशमाचा अधिपति शनि हा अत्यंत शांत, थंड, पंगु व तत्त्वज्ञानप्रिय ग्रह कन्येमध्यें आहे. अर्थात् तो बुधाच्या क्षेत्रात असल्याकारणानें त्याची वृत्ति बुधाच्या धर्माप्रमाणे दिसेल. बुध दशमात असून तो शनीबरोबर अन्योन्य क्षेत्रसंबंधात आहे; त्यामुळें भारतामध्यें शांतताप्रिय व सहिष्णु असें वातावरणच प्रामुख्याने दीर्घकाळपर्यंत ठेवण्याचा कसोशीनें प्रयत्न केला जाईल व गुद्द्यास गुद्दा देण्याचे कार्य करण्याच्या मानसिक धैर्याचा जो उणेपणा भासत आहे तो शनीच्या एका भ्रमणापर्यंत अर्थात् ३० वर्षेपर्यंत जागें शक्य दिसत नाहीं. लग्नेश केतुयुक्त झाल्याकारणानें प्रजाजन उघड शत्रूंच्या आक्रमणाने त्रस्त झालेलेच पाहावे लागतील व त्यामुळें देशात बरीच खळबळ व बोभाटा वर्तमानपत्रद्वारें होईल. बुध तृतीयेश व षष्ठेश हा मंगळाच्या–लग्नेशाच्या–केन्द्रयोगात आहे.

ह्या कुंडलीचा लग्नेश जो मंगळ त्यावरून चलित केतु हा २८ वर्षानंतर पुढें जाईल; अर्थात्, तेव्हाच हें लग्नेशाला लागलेलें भीतीचें ग्रहण सुटेल. सन १९७७ नंतर पुढें येणारा काळ भारतवर्षाला एक श्रेष्ठतम राष्ट्र बनविणारा येईल व हल्लींची त्याची भीरुत्वाची स्थिति पूर्णपणें नष्ट होऊन भारतवर्ष खात्रीनें आपलें अस्तित्व टिकविण्यास अनेक उघड शत्रूंना नेस्तनाबूद करील. ह्याच वेळीं चलितरवि मूळ दशमावरोबर शुभदृष्टियोग करण्यास येईल व तो मूळ चंद्राच्या शुभदृष्टियोगात येईल. ह्याच सुमारास चलित दशम पण मूळ रवीबरोबर युक्त होण्यास येत असून पुढील पंधरा-वीस वर्षांमध्यें तें अनेक शुभयोगानीं युक्त होत आहे. हा काळ भारतवर्षाच्या इतिहासामध्यें सुवर्णाक्षरानीं लिहिण्याइतका महत्त्वाचा आहे.

. सन १९७२ नंतर शनी मकरेतून गोचरीने धनुराशीमध्ये येत आहे व त्याचे भ्रमण पुढे नवमस्थानामधून होणार आहे. हा काळ भारतवर्षाला परदेशाबरोबरच्या व्यापारविस्ताराला फारच अनुकूल असून, भारतीय प्रजा पुष्कळ प्रमाणात परदेशामध्ये जाऊन तेथें उद्योगधंदे अस्तित्वात आणून, आपल्या वसाहती तेथें स्थापन करील हा काळ आर्थिक व सामाजिक दृष्टीनें फारच महत्वाचा आहे. ह्या काळात भारत धर्माची व तत्वज्ञानाची पताका सर्वत्र फडकवील ह्या काळामध्ये भारतवर्ष इतर राष्ट्रांना खऱ्या आगमशास्त्राचा व अध्यात्मविद्येचा साक्षात्कार करून देईल धनुराशीचा व महाराष्ट्राचा घनिष्ठ संबंध आहे, त्यामुळें ह्या वेळीं महाराष्ट्र आपली कूपमंडूक वृत्ति सोडून, ज्ञानप्रसारार्थ महत्वाचें कार्यक्षेत्र काबीज करील. सन १९६७ ते १९७० सालामध्यें मेष व वृषभ राशींमधून गोचरीनें होणारे शनीचें भ्रमण भारतवर्षाला सुखकर जाणार नाहीं. राजकारणामध्ये अनेक बखेडे उत्पन्न होतील व परकीय शत्रूबरोबर उघड तोंड देण्याचा प्रसंग उद्भवेल. परंतु त्यातूनच भारतवर्षामध्यें सर्वत्र एकी होऊन, उघड शत्रूबरोबर जोराचा प्रतिकार करण्याचे सामर्थ्य नवीन येणारा नेता उत्पन्न करील आणि तो चांगले स्नेहसंबंध खात्रीनें निर्माण करील

## मुंबई शहराची कुंडली

तारीख १४ एप्रिल, १९४४ ह्या दिवशीं दुपारीं स्टँ. टाईम ३ वाजून ३० मिनिटांच्या सुमारास, मुंबई शहराच्या गोदीमध्यें उभ्या असलेल्या आगबोटीवर प्रचंड आग लागून भयंकर स्फोट झाला व गोदीच्या आजूबाजूच्या अनेक घरादारांचा नाश होऊन, जिकडेतिकडे वैदान मैदान

झालें. ह्या स्फोटामुळें प्राणहानिही भयंकरच झाली. हा स्फोट कां झाला, ह्याचा आपणास विचार करण्याचें कारण दिसत नाहीं. ही स्थिति मुंबई शहराच्या वृश्चिक लग्नीं २० अंश व मध्यान्ह केन्द्रीं सिंह राशीचे २२ अंश किंवा भूम्याक्षांशरेखांश पद्धतीनें येणारें लग्न कन्या १२ अंश, २२ कला व दशम मिथुन २२ अंश, ४२ कला, घेऊनही ह्या घटनेचा बोध होत नाहीं. तसेंच, ह्या स्फोटासंबंधानें आगाऊ कोणीं भविष्य केलेलें आमच्या पाहाण्यांत आलेलें नाहीं. मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचें आंदोलन चालू असतांना ता. १६ जानेवारी, १९५६ रोजीं गोळीबार होऊन जी प्राणहानि झाली, तिचाही बोध वरील लग्न व दशमाच्या राशीचे अंश घेऊन होत नाहीं.

मुंबईचीं पूर्वीचीं बेटें किती होतीं व तीं पोर्तुगालच्या ताब्यांत कशीं आलीं, वगैरे वर्णनात्मक इतिहास वाचकांस इतरत्र वाचण्यास मिळेल. येथें इतकेंच सांगणें इष्ट आहे, कीं भारतामधील इंग्रज सत्तेचे त्या वेळचे अधिकारी हम्फी कुक ह्यांनीं इंग्लंडच्या राजाला लग्नामध्यें आंदण म्हणून दिलेल्या ह्या प्रदेशाचा ताबा नव्या पद्धतीच्या तारखेच्या कालगणनेप्रमाणें तारीख १८ फेब्रुवारी, १६६५ ह्या दिवशीं घेतला व त्यानंतर ह्या प्रदेशाची एकसारखी भरभराट होत जाऊन शेवटीं भारत स्वतंत्र झाला त्या वेळीं हा प्रदेश भारतराष्ट्राकडे नैसर्गिक रीतीनें आला आहे.

हा प्रदेश पोर्तुगालच्या सत्तेखालीं सन १५३५ ते १६६५ म्हणजे शें-सव्वाशें वर्षेपर्यंत होता व त्यामध्यें उद्योगधंदे, व्यापार, वगैरेंची वृद्धि न होतां तो पूर्वस्थितीमध्येंच राहिला; परंतु हा प्रदेश इंग्रज सत्तेखालीं आल्यानंतर जीं निरनिराळीं बेटें होतीं तीं जोडलीं जाऊन ह्या

प्रदेशामध्यें व्यापाराची भरभराट होत गेली व मुबई बदराचा दिवसें-दिवस विकास होत गेला आणि तें भारतवर्षामधील मोठें व्यापाराचे केंद्र व प्रख्यात बदर झालेलें आज आपणास पाहाण्यास मिळत आहे असें का व्हावें, ह्याचें कोडें ज्योतिषशास्त्राधारें चागलें सुटत असून एकमेकाचे स्नेहसबध कसे असतात व त्याचा परिणाम कसा पाहाण्यास मिळतो, ह्याचें हें एक प्रत्यक्ष प्रतीक आहे पोर्तुगाल व मुबई ह्याच्यामध्यें अर्थात् ग्रहामध्ये व राशीमध्ये मैत्रीचे द्योतक सतत सबध आढळत नाहींत ह्याच्या उलट आग्लसत्ता आणि मुबई शहर ह्याच्यामध्ये मैत्रीचे सबध फारच चागले झाल्ले आहेत, म्हणूनच मुबई बदर आग्ल सत्तेखालीं आल्यावर पूर्वीप्रमाणें ह्रा खात पडलें नाहीं आग्ल ग्रथकार पोर्तुगालची राशि मीन मानतात, परतु आमच्या मतें हें राष्ट्र पूर्णपणें वृश्चिक राशीच्या अमलाखालीं आहे मुबई शहराच्या लग्नीं मिथुन राशि असून माध्यान्ह केंद्रीं कुभ राशि आहे व मुबईच्या कुडलीमध्यें चद्र मेष राशीमध्ये आहे इग्लडची राशि मेष असल्याचें आग्ल ग्रथकार मानतात लडन शहराच्या लग्नीं मिथुन राशीचा १३ वा अश उदय पावत असून दशमस्थानीं कुभ राशीचा ८ वा अश आहे चद्र कुभ राशीच्या १४ व्या अशात आहे रवि मिथुन २१ अश व शनि-मगळयुति सिंह राशीच्या १० व्या अशात चतुर्थ स्थानामध्यें असल्याचा उल्लेख पूर्वीच्या आग्ल ज्योतिर्विदानीं केलेला आहे

सन १७५० पासून मुबई बदरामधून कापसाची निर्यात वगैरे होण्यास सुरुवात होऊन कापसाच्या व्यापाराची वृद्धि झाली व त्यामुळें कुलाबा कॉटनग्रीन निर्माण झालें ह्यापूर्वी कापसाचा व्यापार मुबईच्या उत्तरेकडे असलेल्या कल्याण बदरामधून अरबस्तान वगैरे बाहेरच्या देशाशीं होत असे त्यानतर सन १८०० च्या

नंतर मुंबईमध्यें अनेक सुधारणा होऊन कापड तयार करण्याच्या गिरण्या अस्तित्वांत आल्या. मुंबई युनिव्हर्सिटी, पोस्ट व तार ऑफीस, रेल्वे, गोद्या, मोठे रस्ते, ट्रॅम्वे, नगरपालिका, इत्यादि गोष्टीही आल्या आहेत. मिथुन राशीप्रमाणें ट्रान्स्पोर्ट, रेल्वे, पोस्ट, टेलिफोन, कापसाचा व्यापार, गिरण्या, इत्यादि सर्वांची सुरवात मुंबई येथें प्रथमच झालेली आहे हें पाहाण्यासारखें आहे. ह्याप्रमाणें भराभर सुधारणा होत जाऊन मुंबई शहराची एकसारखी भरभराट व वाढच होत गेलेली पाहाण्यास मिळत आहे.

आमच्या मतें सन १६६५ मध्यें तारीख १८ फेब्रुवारी (न्यू स्टाईल) या दिवशीं लोकल टाईम बारा वाजण्याच्या सुमारास हम्फी कुक ह्या ब्रिटिश अंमलदारानें मुंबई बंदराचा ताबा घेतला. तीच कुंडली ह्या सर्व परिस्थितीचा बोध करीत असल्याकारणानें मुंबई शहराची तीच औपक्रमिक कालाची कुंडली घेणें योग्य ठरतें.

ह्या दिवशीं खालीलप्रमाणें स्पष्ट सहाभाव व स्पष्ट ग्रहांची स्थिति होतीः

**लग्न** मिथुन ७ अं. २७ क., द्वितीय कर्क ३ अंश, तृतीय कर्क २८ अंश, चतुर्थ सिंह २५ अं. ४४ क., पंचम कन्या २७ अंश, षष्ट वृश्चिक ३ अंश, **ग्रह** – रवि मीन ० अंश, १३ कला २६ वि., चंद्र मेष ५ अंश २० कला, मंगळ मीन ५ अंश ३६ क., बुध मीन २ अं. ० क. (व), गुरु कुंभ ६ अं. ४७ क., शुक्र मेष ७ अं. ८ क., शनि मकर ६ अं. २५ क., हर्शल कुंभ १७ अं. २ क., नेपच्यून मकर १८ अं. ५४ क., राहू सिंह १ अं. ३४ क., प्लुटो मिथुन २७ अंश ३ क., धन–सहम कर्क ७ अं. २१ कला.

वर दिलेल्या ह्या माहितीवरून कोणालाही मुंबई शहराची सायन भावचलित कुंडली सहज तयार करून घेता येईल

पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें प्रत्येक देशाच्या कुंडलीमधील चार केन्द्रावरील अंश म्हणजे लग्न, चतुर्थ, सप्तम व दशम या केन्द्रावरील उदित अंशावरून तसेंच रवि, चंद्र, धन सहम ह्यांच्यावरून जेव्हां जेव्हां गोचरीनें ग्रहांचीं भ्रमणें होतात, तेव्हां तेव्हां गोचर ग्रहाच्या गुणधर्माप्रमाणें व ज्या केन्द्राचें उदित अंशावरून भ्रमण होत असतें, तन्द्योतक विशिष्ट गोष्टींमध्यें अनेक घडामोडी त्या त्या देशांत किंवा शहरांत झालेल्या अनुभवास येतात लग्नबिंदू-वरून नेपच्यून, हर्शल, शनि किंवा मंगळ ह्याचें गोचरीनें भ्रमण होणें किंवा लग्नाच्या उदित अंशावर मंगळ वक्री होतो, तेव्हां तेथील प्रजाजनांवर अनेक आपत्ति येतात, रोगाच्या साथी येऊन किंवा अग्निप्रलय, इत्यादि अपघात वगैरे होऊन भयंकर प्राणहानि होते, ह्याप्रमाणेंच इतर केन्द्राचा अनुभव त्या केन्द्रानें दर्शविल्या जाणाऱ्या गोष्टींमध्ये आढळून पाहाण्यास मिळतो रवि गोचरीनें बिघडत असतां अधिकारी वर्ग त्रस्त होतो, चंद्रावरून अशुभ ग्रहाचें गोचरीनें भ्रमण होत असतां प्रजाजनांना पीडा प्राप्त होते, तर धनसहमावरून होणारें अशुभ ग्रहाचें गोचर भ्रमण सांपत्तिक दृष्ट्या हानिकारक ठरतें

सन १९४२ ते १९४४ ह्या तीन सालामधील मुंबई शहराचा इतिहास पाहाण्यासारखा आहे ह्या काळात युरोपखंडामध्ये दुसरें महायुद्ध चालू होतें व ह्या युद्धाची झळ लागून मुंबई शहराचा नाश होईल असें अनेक व्यापारी व धनिक ह्यास वाटत होतें व त्यामुळें मुंबई शहर सोडून बरेच लोक बाहेरगांवीं निघून गेले होते, आणि मुंबईची वस्ती फारच कमी झालेली होती ह्याच काळांत ता ८ ऑगस्ट, १९४२ च्या दिवशीं कॉंग्रेसनें "क्विट इंडिया" (हिंदुस्थान छोडो) हा ठराव पास केला होता व

त्यामुळें अनेक राजकारणी नेत्याची धरपकड झाली होती व मुंबई येथें गोळीबार होऊन अनेकांची प्राणहानि होऊन पुष्कळच धादळ उडालेली होती.

तारीख २१ मार्च, १९४२ रोजीं जें मेष संक्रमण, सकाळीं ११ वाजून ४१ मिनिटांनीं झालेलें आहे, त्या काळच्या कुंडलीमध्यें फारच अशुभ योग झालेले आहेत. वृषभराशीमध्यें व्ययस्थानामध्यें चंद्र शनिहर्शलनें युक्त असून लग्नाधिपति बुध हा दशमांत होता व तो व्ययस्थानामध्यें मिथुन राशीच्या ८ अंश, १५ कलेमध्ये असलेल्या मंगळाबरोबर मीन राशीच्या ५ अंश, ५० कलेमधून केन्द्रयोग करीत होता. शनि गोचरीनें वक्री मार्गी होऊन मंगळावरून व बुधाच्या केन्द्रामधून भ्रमण करीत होता. जून-जुलै मध्यें शनिहर्शलचें भ्रमण मुंबईच्या कुंडलीच्या उदित अंशाजवळ होत होतें. त्यामुळें आपत्तिरूप भय जनतेमध्ये येऊन जो तो मुंबई सोडून बाहेरगांवीं जाऊं लागला होता. तारीख १२ ऑगस्ट, १९४२ चें सूर्यग्रहण चतुर्थ केन्द्रावर पडलें होतें. शनि हर्शल लग्न केन्द्रावरून गोचरीनें भ्रमण करीत होते. ह्याच वेळीं मंगळाचें गोचर भ्रमण ग्रहणकाळच्या रविचंद्रावरून व्हावयाचें होतें. ह्याच सुमारास पूर्वीं दर्शविलेला कॉंग्रेसचा ठराव पास झाला होता. धरपकड होऊन अनेकजणास जेलमध्यें जावें लागलें व नंतर हुल्लड व तुफान गोळीबार होऊन प्राणहानि झाली. चतुर्थ स्थानामधील ग्रहण दशमस्थानदर्शक राजसत्तेबरोबर प्रतियोगांत होत होतें व त्यावरून मंगळाचें भ्रमण होत होतें. त्यामुळें राजसत्तेविरुद्ध चळवळ होऊन ह्या शहरावर आपत्ति आलेली होती. ह्या वेळीं अर्थात् ग्रहण-काळच्या लग्नाचा उदित अंश शनि-हर्शलच्या केन्द्रयोगामध्यें होता व गोचर मंगळ लग्न उदय पावत असून तोही वरील शनि-हर्शलच्या

केन्द्रयोगामध्यें होता. वरील मुंबई शहराच्या लग्नाच्या केन्द्रयोगामध्ये शनि-हर्शल आहेत व मंगळ मूळच्या मुंबई शहराच्या कुंडलीमधील बुध-मंगळ युति योगाच्या प्रतियोगामध्यें असून मुंबई शहराच्या लग्नबिंदूच्या केन्द्रयोगामध्यें आहे.

तारीख १४ एप्रिल, १९४४ रोजीं मुंबई बंदरामध्यें दारूगोळा घेऊन आलेल्या आगबोटीमध्यें ११ वाजण्याच्या सुमारास आग लागली व दुपारीं ३ वाजून ५ मिनिटाच्या सुमारास जेथे दारूगोळा होता त्या ठिकाणीं आग गेली व दारूगोळ्यानें पेट घेतल्याकारणानें मुंबई बंदराला भूकंपाचा जसा धक्का बसतो तसा मोठा स्फोट होऊन पहिला धक्का बसला व ह्या शहराचा कांहीं भाग हादरून गेला नंतर पुन्हा २० ते २५ मिनिटांनीं स्फोटामुळें दुसरा धक्का बसून बंदराच्या आसपासच्या चांगपाच मैलाच्या प्रदेशामध्ये अग्नीचा वर्षाव झाला व त्या प्रदेशाचें खेदान मैदान होऊन असंख्य प्राणहानि झाली व अनेक माणसें घायाळ झालीं.

मंगळ-हर्शल युति सन १९४३ च्या ९ सेप्टेंबर ह्या दिवशीं मिथुन राशीच्या ८ अंश ५० कलेमध्यें झालेली आहे ह्याच दोन ग्रहाचा दुसऱ्यांदा युतियोग तारीख ३० डिसेंबर, १९४३ ह्या दिवशीं मिथुन ५ अंश ३७ कलेमध्यें झाला आहे व त्या वेळीं हे दोन्ही ग्रह वक्री होते व तारीख १६ जानेवारी, १९४४ ह्या दिवशीं पुन्हा ह्या दोन ग्रहाची तिसऱ्यांदा युति मिथुन ५ अंश ८ कलेमध्यें झालेली आहे, ह्या वेळीं हर्शल वक्र स्थितीमध्यें होता ह्याप्रमाणें हे तिन्ही युतियोग आपण जे मुंबई शहराचें लग्नीं अंश घेतले आहेत, त्यांवरच होत होते. तारीख ७ मार्च, १९४४ ह्या दिवशीं शनि-मंगळ युतियोग मिथुन राशीच्या

१९ अश ५४ कलेमध्यें झालेला आहे गोदीमध्यें तारीख १४ एप्रिल, १९४४ रोजीं जो दुसरा स्फोट दुपारीं ३ वाजून २१ मिनिटें स्टँ टा ह्या वेळीं झाला व ज्यानें आजूबाजूला अग्निवर्षाव केला, त्या वेळच्या कुडलीमध्यें दशमात शनि मगळ युतियोग होता मिथुन राशीचे १५ अश मध्यान्ह केंद्रीं होते व कन्या राशीचे १५ अश पूर्वकेंद्रावर उदय पावत होते मिथुन धनु राशीचे १९-२० अश अग्निभयदर्शक अंश आग्ल ज्योतिर्विदानीं अनुभवानीं ठरविले आहेत

ह्या वर्षाकरिता विचारामध्यें घ्याव्या लागणाऱ्या मकर सक्रमण काळच्या ता २२ डिसेंबर, १९४३ च्या कुडलीच्या मध्यान्ह केन्द्रावर मिथुन राशीचे ७ अश ३० कला असून हर्शल-मगळ हे लग्नीं उदित असणाऱ्या कन्या राशीच्या ७ अश ५ कलेवरोवर केंद्रयोग करीत असून चतुर्थ स्थानाच्या प्रतियोगामध्यें आहेत व ह्या वेळचा चद्र हा दशमात असलेल्या मिथुन राशीच्या २२ अश ३५ कलेमध्यें वक्री असलेल्या शनीवरोवर सार्ध केंद्रयोग करण्यास जात आहे तारीख २० मार्च, १९४४ रोजीं मेष सक्रमणाच्या वेळीं पूर्व क्षितिजावर धनु राशीचा ३ अश उदित होत असून मध्यान्ह केंद्रावर कन्या राशीचा ७ अश उदय पावत आहे अर्थात् चतुर्थ आणि दशमकेंद्र शनिहर्शलयुतियोगाच्या केन्द्र दृष्टियोगात आलेले आहेत व हर्शल ह्या कुडलीमध्य सप्तमामध्यें वसत आहे व ह्या वेळेचा चद्र सप्तमस्थानामधील शनि मगळाच्या सार्ध केंद्रयोगामध्ये आहे स्फोट होण्यापूर्वीची तारीख २४ मार्च, १९४४ ची अमान्तकाळची कुडली, तसच, तारीख ८ एप्रिल, १९४४ ह्या दिवशींची पौर्णिमान्तकालची कुडली ह्यामध्यही अग्निप्रलय, स्फोट, प्राणहानि, इत्यादि आपत्ति दर्शक ग्रहस्थितिच पाहाण्यास मिळत असून वर दर्शविलेले हर्शल मगळ

युतियोग व शनि मंगळयुतियोगाच्याच अशानें लग्न, दशम, चतुर्थ व सप्तमस्थानावराल अश दृष्टियोगानें पीडित झालेलेच पाहाण्यास मिळत आहेत

तारीख १५ एप्रिल, १९५० ह्या दिवशीं सकाळीं स्टँ टा ८ वाजून ३० मिनिटांनीं उत्तरेकडील अनेक गावें जोडून **बृहत् मुंबईच्या** प्रतिष्ठापनेची घोषणा करण्यात आली, त्या वेळची सायन भावचलित कुंडली खालीलप्रमाणें पाहाण्यास मिळत आहे लग्न-कुंभ २८ अश ५२ कला, द्वितीय मेष ६ अ, तृतीय वृषभ ९ अ, चतुर्थ मिथुन ७ अ, पचम कर्क २ अ, षष्ठ कर्क २८ अ, रवि मेष २४ अ २९ क. १२ वि, चद्र मेष ० अ १४ क, मगळ कन्या २३ अ ५९ क, (व), बुध वृषभ १३ अ ३५ क, गुरु कुंभ २९ अ ५८ क., शुक्र मीन ९ अ २७ क, शनि कन्या १३ अ २१ क, (व), हर्शल कर्क १ अ ३१ क, नेपच्यून १५ अ ४५ क., (व), प्लूटो सिंह १५ अ ४९ क., (व), राहु मेष ६ अ ३५ क.

वर आम्हीं दर्शविलेली मुबइ शहराची औपचारिक काळची कुंडली व ह्या प्रस्तुतच्या बृहत् मुबईची कुंडली ह्याचा अन्योन्य सबध ध्यानामध्यें ठेवण्यासारखा आहे मुबईच्या कुंडलीच्या दशमावर उदित असणारी राशि येथे लग्नरेन्द्रीं उदय पावत आहे व सप्तम स्थानावर उदित असणारी राशि व जवळजवळ तेच अश येथें दशम केन्द्रीं उदय पावत आहेत, दोघाचा चद्र एकाच राशीमध्य आहे ह्या कुंडलीच्या सप्तमस्थानामध्यें शनि-मगळाची असलेली युति फारच अशुभ फळ देणारी आहे सन १९६४ ते ६६ ह्या दोन-तीन वर्षांमध्यें हर्शल प्लुटोचें भ्रमण ह्या शनीवरून व दशम चतुर्थाच्या केन्द्रामधून होत असून शनीचें

भ्रमण त्याच्या प्रतियोगामध्यें होणार असल्याकारणानें आम्हास सन १९६६ अखेरपर्यंतचा काळ भयंकर आपत्तिप्रद वाटत आहे ह्याच काळामध्यें लग्नबिंदु चलित होऊन तो शनीच्या प्रतियोगात येत असून पुढें तो शनि मगळ-युतियोगाच्या मध्यबिंदूबरोबर प्रतियोग करणार आहे, व जवळजवळ त्याच वेळीं दशम चलित होऊन जन्ममगळाच्या केन्द्र योगामध्यें येईल ह्या काळात रोगराइ, दंगे, अग्निप्रलय, अत्याचार ह्यासारख्या अनेक घातपाती कृत्यामुळें जनता त्रस्त होऊन तिला अनेक आपत्तींना तोंड देण्याचा प्रसग उद्भवेल.

सन १८६५ च्या दुसऱ्या कायद्यान्वयें तारीख १ जुलै, १८६५ ह्या दिवसापासून **मुंबई नगर पालिके**च्या घटनेचा कायदा अस्तित्वात आला त्या वेळेची सहाभाव व स्पष्टग्रह स्थिति खालीलप्रमाणें आहे ही कुडली तारीख ३० जून, १८६५ रोजीं मध्यरात्रीं मुबई टाईम बारा वाजून एक मिनिटाची माडलेली आहे

लग्न मेष ११ अ. १८ क, द्वितीय वृषभ १५ अ तृतीय मिथुन १३ अ, चतुर्थ कर्क ८ अ ८ कला, पचम सिंह ४ अ, षष्ठ कन्या ५ अंश, रवि कर्क ८ अ ५५ क ६ वि, चद्र तुला ५ अ ५७ क, मगळ सिंह २२ अ ६ क, बुध कर्क ७ अ ३८ क, गुरु धनु २२ अ १२ क. (व) शुक्र वृषभ २४ अ २९ क, शनि तुळ २३ अ ३७ क, हर्शल कर्क ० अ १७ क, नेपच्युन मेष १० अ ३३ क, प्लुटो वृषभ १३ अ ४२ क, राहु तुला २६ अ ३६ कला, धनसहम कर्क ८ अ १७ कला ह्या तीन कुडल्यामध्य एकमेकाबरोबर असलेला सबध ज्योतिर्विद्यार्थ्यांच्या सहज लक्षात येण्यासारखा आहे

# कांहीं औपक्रमिक कालांच्या कुंडल्या

## ( १ ) नवी दिल्ली शिलान्यास कुंडली

तारीख १५ डिसेंबर, सन १९११ ह्या दिवशीं सकाळीं स्टँ. टाईम १० वाजता नव्या दिल्लीची कोनशिला त्या वेळेचे प्रिन्स ऑफ वेल्स ह्यानीं दिल्लीदरबार झाल्यावर बसविली आहे.

*लग्न कुंभ ४ अं. १९ क., धन मीन १४ अ., तृतीय मेष २१ अ.,* चतुर्थ वृषभ १९ अं. १० क., पचम मिथुन १४ अ., षष्ठ कर्क ८ अं.

**स्पष्टग्रह** – रवि धनु २२ अ. २ क., चद्र तुला २ अ. २० क., मंगळ वृषभ २५ अ. ३३.क., बुध मकर ७ अ. ४१ क., गुरु धनु १ अ. ८ क, शुक्र वृश्चिक ६ अ. २३ क., शनि वृषभ १४ अं. १३ क. ( व. ), हर्षल मकर ७ अ. २१ क., नेप. कर्क २३ अ. १२ क., प्लुटो मिथुन २८ अ. ३ क. ( व. ), राहु मेष २७ अ. ५८ क.

**दिल्ली नगरपालिका संस्था** ( कॉर्पोरेशन ) तारीख ७ एप्रिल, १९५८ ला कायदेशीर रीतीनें प्रस्थापित होऊन ती तारीख १४ एप्रिल, १९५८ रोजीं रात्रीं स्टँ. टा. १२ वाजून १ मिनिटानें दिल्ली येथें अस्तित्वात आली आहे.

लग्न धनु २८ अं. ० क., धन कुंभ १ अं, तृतीय मीन ६ अ., चतुर्थ मेष १० अ., पचम वृषभ ९ अ., षष्ठ मिथुन ९ अ.

**स्पष्टग्रह** – रवि मेष १६ अं. २६ क. ४७ वि., चंद्र वृश्चिक २२ अं. ५८ क., मंगळ कुंभ १४ अं. ५७ क., बुध वृषभ ० अं. ५० क., गुरु तुला २८ अं. ७ क. (व.), शुक्र मीन ० अं. ५ क., शनि धनु २५ अं. ४२ क., हर्शल सिंह ७ अं. ३४ क., नेपच्युन वृश्चिक ३ अं. ५३ क., प्लुटो कन्या ० अं. ४ क., राहू वृश्चिक २ अं. ४० क.

(२) **कलकत्ता :** कलकत्ता येथील एक विद्वान् ज्योतिर्विद् श्रीयुत फकीरचंद्र दत्त ह्यांनीं आपल्या पुस्तकामध्यें मिस्टर जान कारनाक ह्या गृहस्थानें कलकत्ता शहराची स्थापना जुन्या तारखेच्या पद्धतीप्रमाणें तारीख २४ नोव्हेंबर, १६९० ह्या दिवशीं केली असें म्हटलें असून त्या दिवसाच्या माध्यान्ह समयाची कुंडली दिलेली आहे, ती खालीलप्रमाणें आहे. नवीन पद्धतीप्रमाणें ही कुंडली ता. ४ डिसेंबर, १६९० च्या प्रत्यक्ष माध्यान्ह काळची आहे. लग्न मीन ५ अं. २०. क., धन मेष १३ अं., तृतीय वृषभ १५ अं., चतुर्थ मिथुन १२ अं. ३८ क., पंचम कर्क ६ अं., षष्ठ सिंह ३ अं., **स्पष्टग्रह** – रवि धनु १२ अं. ३९ क., चंद्र मकर २० अं. २० क., मंगळ वृश्चिक २५ अं. १२ क., बुध वृश्चिक २७ अं., ४२ क. गुरु मीन २९ अं. ३० क., शुक्र मकर २८ अं. १२ क., शनि वृश्चिक २३ अं. ५४ क., हर्शल वृषभ २८ अं. ६ क., नेपच्यून मीन १२ अं. १८ क., प्लुटो कर्क २६ अं. ८ क., राहू मीन १२ अं. ५३ क.

वरील ग्रंथकारानें दिलेली तारीख २४ ऑगस्ट होती. रवि व दशम धनु १२ अं. दिलेले होते. ऑगस्टमध्यें धनेमध्यें रवि येणें शक्य नसल्यामुळें महिना ऑगस्टऐवजीं नोव्हेंबर असावा असें वाटून गणित करून पाहातां व ग्रह तपासतां तें खरें ठरलें. आम्हीं गणिताप्रमाणें जे

ग्रह आहे ते येथें दिले आहेत प्रथकारानें दिलेले ग्रह बरोबर नाहींत बुध, शुक्र, चंद्र येच चुकलेले आहेत व फारच स्थूल आहेत

**(३) अहमदाबाद :** ह्या शहराच्या स्थापनेचा जो काळ मिराते अहमदी ह्या ग्रंथामध्ये दिलेला आहे आणि जी कुंडली व ग्रहस्थिति दिलेली आहे तिचा मेळ बसत नाहीं व नक्की वर्षाचाही निर्णय होत नाहीं अहमदाबाद येथें प्रसिद्ध होत असलेल्या 'ज्योतिषदर्शन' मासिकामध्ये संशोधन करून एक कुंडली प्रसिद्ध केलेली आहे, ती खालीलप्रमाणें आहे हिजरी वर्ष ८१३ माह जिल्काद ता १ गुरुवार, फाल्गुन शुद्ध ७, संवत् १४६७ शके १३३२ सूर्योदयात् घटी १५ पळें ३५, लग्न कर्क २ अ १४ क., धन कर्क २५ अ , तृतीय सिंह २१ अ , चतुर्थ कन्या २१ अ , पंचम तुला २५ अ , षष्ठ धनु ० अ ग्रह – रवि मीन १६ अ , चंद्र मेष २४ अ , मंगळ मीन ९ अ , बुध मीन ७ अ , गुरु कन्या ७ अ , शुक्र वृषभ १ अ , शनि वृषभ ७ अ , हर्शल कुंभ ७ अ , नेपच्यून मिथुन २९ अ , राहु मीन २३ अ , ही कुंडली जुन्या तारखेच्या गणनेप्रमाणें ता २६ फेब्रुवारी, सन १४११ ची आहे

**अहमदाबाद कॉर्पोरेशन :** तारीख १ जुलै, सन १९५० ह्या दिवशीं सकाळीं स्टँ टा १० वाजता अस्तित्वात आली आहे ह्या वेळीं लग्न कन्या २ अ २१ क, दशम धनु २ अ , एकादश कर्क ३ अ , द्वादश सिंह ३ अ , धन तुळा ० अ व तृतीय वृश्चिक ० अ ह्याप्रमाणें सहा स्पष्ट भाव आहेत ग्रह – रवि कर्क ८ अ ४६ क., चंद्र मकर २७ अ ९ क, मंगळ तुळा ८ अ ८ क, बुध मिथुन २० अ ५ क, गुरु मीन ७ अ २५ क (व), शुक्र मिथुन ४ अ २४ क, शनि कन्या १४ अ २४ क, हर्शल कर्क ५ अ २६ क,

नेपच्यून १४ अं. ३५ क., प्लुटो सिंह १६ अ. ३ क.. राहु २ अं. ३१ क., धनसहम मीन २० अं. ५४ क.

**पुणें**—कै० जिनराव चिटणीस ह्या शहराची कन्या राशि मानीत असत, आमच्या मतें ह्या शहराच्या लग्नीं कन्या राशीचा ८ किंवा ९ वा अंश असावा.

दुसरा बाजीराव पेशवा हा पुणें सोडून रात्रीं पळून गेला व स्वामिभक्त बाळाजीपंत नातू ह्यानीं ब्रिटिशांकडून मिळणाऱ्या मलिद्याला बळी पडून शनिवारवाड्यावर इंग्रजाचें युनियन जॅक संध्याकाळच्या सुमारास उभारून भारतांतील मराठ्याची हिंदुपदपातशाही नेस्तनाबूद केली. त्या दिवसाची कुंडली ही पुण्याच्या ह्या घटनेचा पूर्ण बोध करीत आहे. ह्या कुडलीमध्यें पुणें शहराच्या वरील लग्नाचा पूर्ण बोध होत आहे. पुण्यात प्रथम युनियन जॅक फडकलें तारीख १७ नोव्हेंबर, १८१७ सायंकाळीं ५ वाजण्याच्या सुमारास–(स्थानिक वेळ). लग्न वृषभ १९ अं. २८ क., दशम कुंभ ८ अ. ३० कला, एकादश मीन ८ अं., द्वादश मेष १३ अ., द्वितीय मिथुन १७ अं., तृतीय कर्क १२ अ.

**ग्रह**—रवि वृश्चिक २४ अं. ४९ क., चंद्र मीन १४ अं. २९ क., मगळ मिथुन २३ अं. ५२ क., बुध वृश्चिक १७ अं. १९ क., गुरु धनु १५ अ. ५३ क., शुक्र तुला २७ अ. १७ क., शनि कुंभ २९ अ. ३१ क., हर्शल कुंभ १४ अं. ४३ क., नेपच्यून धनु २२ अ. ५९ क., प्लुटो मीन २५ अं. १२ क., राहु वृषभ १७ अ. २८ क.

**पुणें म्युनिसिपल कॉर्पोरेशन** तारीख १५ फेब्रुवारी १९५० रोजीं अस्तित्वात आली, म्हणजे तारीख १४ च्या मध्यरात्रीं

स्टँ टा बारा वाजता त्या वेळेचे स्पष्टभाव व ग्रह खालीलप्रमाणें आहेत लग्न वृश्चिक १२ अ २५ क, दशम सिंह १२ अं, एकादश कन्या १५ अं, व्यय तुला १५ अ, धन धनु १२ अ, तृतीय मकर १२ अं ग्रह—रवि कुभ २५ अ ३० क, चद्र मकर २९ अं २० क, मगळ तुळा ११ अ २ क (व), बुध २९ अ ५८ क., गुरु कुभ १७ अं २ क, शुक्र ३ अ ५० क (व), शनि १७ अ ३६ क. (व), हर्शल कर्क १ अं १० क. (व), नेपच्यून तुला १७ अ १९ क, प्लुटो सिंह १६ अ ४७ क., राहु ९ अ ३८ क.

तारीख १२ जुलै, १९६१ रोजीं दिवसा साडेदहाच्या सुमारास पानशेत धरण फुटल्यानें खडकवासल्याच्या धरणाला चीर गेली, पुण्यात पाणी आलें, भयकर आपत्ति ओढवली आणि हजारों घरें पडलीं व अनेक माणसे मेलीं हें पाणी दुपारीं चारनतर उतरण्यास लागलें व रात्रीं १० वाजण्याच्या सुमारास पूर्णपणें गेलें परतु ह्या घटनेनें पुण्यात हाहाकार उडाला ह्या कालाच्या वरील कुडलीमधील सव्य व अपसव्य कालदर्शिका व गोचर ग्रह पूर्ण बोध करीत आहेत ह्या वेळीं अपसव्य पद्धतीप्रमाणें मूळच्या कन्या राशीमधील शनीबरोबर चलित चतुर्थ केन्द्र सार्ध केद्र योग करीत होते, तर चलित लग्नबिंदु मूळ शनीबरोबर अर्ध केन्द्रयोग करीत होता सव्यपद्धतीप्रमाणेंही लग्न व चतुर्थ चलित अशुभ दृष्टियोगात आले आहेत, तर चलित चद्राचें भ्रमण मृत्युस्थानामधून मूळ नेपच्यून मगळाच्या केन्द्रयोगामधून होत होतें गोचरीनें नेपच्यूनचें भ्रमण मूळ लग्नबिंदूवरून होत होतें तर शनीचें गोचरीनें भ्रमण मूळ बुध चद्रावरून होत आहे मगळ प्लुटोयुति कन्या राशीच्या ७ व्या अशात होत आहे व तारीख १२ जुलै रोजीं होणारा

रविचंद्रसंयोग मूळ व्ययस्थानामधील नेपच्यून-मंगळाच्या केन्द्रामध्ये कर्क राशीच्या २० व्या अंशांत होत आहे, हें ध्यानांत घेण्यासारखें आहे.

**सुरत**—ह्या शहरामध्यें सन १९३३-३४ च्या सुमारास आम्हांस एका धनिक मित्राच्या सहवासांत एकान्तामध्यें वास करण्यास सवड मिळाली व तेथील सृष्टिसौंदर्य, जरीचीं कामें, टासा सिल्क, इत्यादि विणकामाचे उद्योगधंदे, बागा, दुधाचे पदार्थ, बासुंदी, मलई, बर्फी, बालपापडी, तेथील गृहिणींची पाकक्रियाची प्रसिद्धी, वगैरे पाहातां ह्या शहरावर वृषभ राशीचा अमल असावा असा भास होत होता. पुढें ह्या शहराची नगरपालिका केव्हा अस्तित्वांत आली ह्यासंबंधांत विचार करतां ह्या शहरासंबंधीं माहिती देणारा व नुकताच प्रसिद्ध झालेला जो एक ग्रंथ पाहाण्यास मिळाला त्यात तारीख १५ मे, १८५२ रोजीं, नगरपालिका अस्तित्वात आल्याचा उल्लेख आढळला. तारीख १४ मे, १८५२ रात्रीं १२ वाजता (लो. टा.) म्हणजे तारीख १५ लागण्याच्या सुमाराची कुंडली घेता खालीलप्रमाणें सहा भाव व स्पष्ट ग्रह येत आहेत. **लग्न**—कुंभ १३ अं. २२ क., द्वितीयभाव मीन २८ अं., तृतीय मेष २६ अं., चतुर्थ वृषभ २४ अं. ५१ क., पंचम मिथुन २० अं., षष्ठ कर्क १५ अं. **ग्रह**—रवि वृषभ २४ अं. ३७ क., चंद्र मेष ६ अं. २८ क., मंगळ सिंह १५ अं. ३८ क., बुध वृषभ ४ अं. ३७ क., गुरु वृश्चिक १७ अं. ३३ क. (व), शुक्र कर्क ९ अं. २५ क., शनि ९ अं. ३० क., हर्शल ५ अं. ४२ क., नेपच्यून मीन ११ अं. १६ क., प्लुटो वृषभ ० अं. ४१ क., राहु कर्क ९ अं. २५ क., धनसहम धनु २५ अं. १३ क.

हें शहर सांपत्तिक दृष्टीनें व व्यापाराच्या दृष्टीनें १५ ते १७ व्या शतकांमध्यें धनाढ्य म्हणून प्रसिद्ध होतें. ह्या कुंडलीमधील वृषभेमधील

शुभदृष्टियोगात असलेली ग्रहस्थिति ह्या गोष्टीचा व वर दर्शविलेल्या उद्योगधंदे इत्यादींचा पूर्ण बोध करीत आहे ह्या शहराला तापी नदीच्या पुरामुळे अनेक वेळा हानि पोचल्याचा इतिहास आहे अलीकडे १६ सेप्टेंबर १९५९ ह्या दिवशीं तापी नदीला भयंकर पूर आला व त्यामुळें ह्या शहराची भयंकर दुर्दशा झाली ह्या वेळीं नेपच्यूनचें गोचरीनें भ्रमण मूळच्या वृश्चिकेमधील ग्रहाच्या प्रतियोगात होत होतें, तर हर्शलचें गोचरीनें भ्रमण मूळच्या लग्नाच्या समोरून व सप्तमात असलेल्या मंगळावरून होत होतें गुरूचें भ्रमण मूळच्या रवीच्या समोरून व दशमावरून होत होतें राहूचें भ्रमण मूळच्या चंद्राच्या समोरून होत होतें व गोचर मंगळाचें भ्रमण ह्या राहूवरून व मूळच्या चंद्राच्या समोरून होत होतें २३ मार्च, १९५९ रोजीं झालेल्या चंद्रग्रहणावरून व ८ एप्रिल १९५९ रोजीं झालेल्या सूर्यग्रहणावरून आणि मूळ रवि व दशमबिंदु ह्यांच्या अशुभ योगामध्ये गोचरीनें मंगळ भ्रमण करण्यास सुरुवात करण्याच्या काळामध्यच ह्या शहरावर आपत्ति आलली पाहाण्यास मिळत आहे

भारतवर्षाच्या भाषेच्या धोरणानें राज्यव्यवस्थेकरिता तारीख १ नोव्हेंबर, १९५६ रोजीं निरनिराळे विभाग करण्यात आले आहेत अथात् हे सोळा प्रांत तारीख ३१ ऑक्टोबर, १९५६ ह्या दिवशीं मध्यरात्रीं बारा वाजता अस्तित्वात आले आहेत त्या वेळेचे स्पष्ट ग्रह खालीलप्रमाणें आहेत राजधानीच्या प्रत्येक शहरावरील त्याच्या अक्षांश रेखांशाप्रमाणें भाव स्पष्ट केले असता ते निरनिराळे येतील, परंतु ग्रह तेच राहातील

**स्पष्टग्रह**—रवि वृश्चिक ८ अं १७ क., चंद्र तुला १४ अं १८ क., मंगळ मीन १६ अं ० क., बुध वृश्चिक ० अं ४३ क.,

गुरु कन्या २३ अ. ५० क., शुक्र कन्या २९ अ. ५७ क., शनि धनु २ अ. १४ क., हर्शल ६ अं. ५६ क., नेपच्यून वृश्चिक ० अ. २८ क., प्लुटो कन्या ० अ. १० क., धनसहम १० अं. ३५ क.

१. **राजस्थान** – राजधानीचें शहर **जयपूर.** अक्षाश २६ अ. ५५ क. ( उ ), रेखाश पूर्व ७६ अं. ५२ कला. लग्न सिंह ११ अ. ७ क., दशाम वृषभ ६ अं. ४५ क.

२. **उत्तरप्रदेश** – राजधानीचें शहर **लखनौ.** अक्षाश उत्तर २६ अं. ५१ क, रेखाश पूर्व ८० अ. ५५ क., लग्न सिंह १४ अ. ४१ क., दशाम वृषभ ११ अं.

३. **पंजाब** – राजधानीचें शहर **चण्डीगड.** अक्षाश उत्तर ३० अं. ४१ क., रेखाश ७६ अ. ५२ क. पूर्व, लग्न सिंह १२ अं. ३८ क, दशाम वृषभ ६ अं. ४५ क. चण्डीगडची कोनशिला केव्हा बसविली ती माहिती मिळाली नाहीं.

४. **हिमाचल प्रदेश** – राजधानी **सिमला.** अक्षाश ३१ अं. ६ क. उत्तर, रेखाश ७७ अ. १० क. पूर्व, लग्न सिंह १२ अ. ५० क., दशाम वृषभ ७ अ.

५ **बिहार** – राजधानी **पाटणा.** अक्षाश २५ अ. ३५ क. उत्तर, रेखाश ८५अ. १५क पूर्व, लग्न सिंह १७ अं. ३९क, दशाम वृषभ १५ अं.

६. **पश्चिम बंगाल** – राजधानी **कलकत्ता.** अक्षाश उत्तर २२ अ. ३० क., रेखाश पूर्व ८८ अ. २१ क, लग्न सिंह १९ अ. ३२ क., दशाम वृषभ १८ अ. क.

७ **आसाम**–राजधानी **शिलांग** अक्षाश उत्तर २५ अ ३४ क, रेखाश पूर्व ९१ अ ५४ क, लग्न सिंह २३ अ ४९ क, दशम वृषभ २२ अ

८ **ओरिसा** – राजधानी **कटक** अक्षाश २० अ २६ क, उत्तर, रेखाश ७५ अ ५४ क, पूर्व लग्न सिंह १७ अ १५ क, दशम वृषभ १६ अ हल्लीं ओरिसाची राजधानी **भुवनेश्वर** आहे ह्या शहराच्या पायाचा दगड पतप्रधान पडित जवाहरलाल नेहरू ह्यानीं तारीख १३ एप्रिल, १९४८ रोजीं सकाळीं बसविला आहे

९ **मध्यप्रदेश**–राजधानी **भोपाळ** अक्षाश २३ अ १६ क, उत्तर रेखाश ७७ अ २३ क पूर्व, लग्न सिंह १० अ ५ क, दशम वृषभ ७ अ १५ क

१० **आंध्र प्रदेश**–राजधानी **हैदराबाद.** अक्षाश १७ अ २७ क, उत्तर रेखाश ७८ अ ३० क, पूर्व लग्न सिंह ९ अ ८ क, दशम वृषभ ८ अ १५ क तारीख १ ऑक्टोबर, १९५३ ह्या दिवशीं कर्नुल येथें अक्षाश १५ अ ५० क, उत्तर रेखाश ७८ अ ३ क पूर्व पतप्रधान नेहरू ह्याच्या हस्तें सकाळीं स्टँ टा ९ वाजता प्रथम आंध्र राज्य स्थापन करण्यात आलें व पुढें निझामशाहीमधील प्रदेश भारतामध्ये जोडल्यानतर त्यातील काहीं भाग महाराष्ट्रात व काहीं प्रदेश आंध्रमध्यें विलीन करण्यात आला त्यानतर आंध्र प्रदेशाचे राजधानीचें शहर कर्नुल्च्या ऐवजीं हैदराबाद हें झाले वरील समयीं पूर्व क्षितिजावर वृश्चिक १७ अ २५ क. उदय पावत आहे, तर माध्याह्न केंद्रीं सिंह १७ अ ३३ क आहे चद्र कर्क २२ अं ४० कलेमध्यें आहे आणि रवि ७ अ ४० क. आहे

११. **म्हैसूर** – राजधानीचें शहर **बेंगलोर.** अक्षांश १२ अं. ५८ क., उत्तर रेखांश ७७ अं. ३५ क., पूर्व. ह्या संस्थानाचें माजी राष्ट्रपति डॉक्टर राजेंद्रप्रसाद ह्यांनीं तारीख १ नोव्हेंबर, १९५६ रोजीं दुपारीं ४ वाजतां विद्युत् रोषणाईनें उद्दीपित होणाऱ्या भारत–वर्षाच्या नकाशामध्यें ह्या राज्याच्या सीमा दर्शविणाऱ्या स्थितिदर्शक चित्राचें रोषणाईचें बटन दाबून उद्घाटन केलें. त्या वेळेचें लग्न मेष २४ अं. १४ क., दशम मकर १९ अं. १५ क., चंद्र तुळा २३ अं. ५० क., रवि वृश्चिक ९ अं. १ क. बाकीचे ग्रह पूर्वी दिलेले आहेत ते घेतले तरी चालतील. सर्व प्रांत अस्तित्वांत आले रात्रीं १२ वाजल्यानंतर तारखेचा बदल होतो त्या वेळीं व ह्या प्रांताचें त्या वेळेचें लग्न सिंह ५ अं. ४९ क. व दशम ६ अंश वृषभ आहे. स्पष्ट ग्रह पूर्वी दिलेले आहेत.

बेंगलोर – शहर कॉर्पोरेशनची प्रतिष्ठापना तारीख ८ डिसेंबर, १९४१ रोजीं करण्यांत आली. तारीख ७ डिसेंबर, १९४१ रोजीं रात्रीं स्टँ. टाईम १२ वाजून १ मि. लग्न कन्या ११ अं. ४९ क., दशम मिथुन १३ अंश, रवि धनु १५ अं. २० क., चंद्र कर्क १० अं. ५ क., मंगळ कन्या २१ अं. ४६ क., बुध धनु २४ अं. ५ क., गुरु कुंभ १ अं. १८ क., शुक्र कुंभ १ अं. १८ क., शनि कन्या १८ अं. ५८ क., हर्शल कर्क ३ अं. ४३ क. (व.), नेपच्यून तुळा १८ अं. ५२ क., प्लुटो सिंह, १८ अं. ७ क., धनसहम मेष ६ अं. ३४ क.

**मद्रास** – राजधानीचें शहर **मद्रास.** अक्षांश १३ अं. ६ क., उत्तर, रेखांश ८० अं. १५ क. पूर्व, लग्न सिंह ९ अं. २५ क., दशम वृषभ १० अं.

१३. **केरळ** – राजधानीचें शहर **त्रिवेंद्रम्.** अक्षांश ८ अं. ३०

क. उत्तर, रेखांश ७६ अं ५७ क. पूर्व, लग्न सिंह ५ अं ३४ क., दशम वृषभ ७ अंश

१४ **मणिपूर** – राजधानीचें शहर **इम्फळ.** अक्षांश २४ अं ५० क. उत्तर, रेखांश ९३ अं ५८ क., लग्न सिंह ३५ अं ३५ क., दशम वृषभ २६ अं

१५ **त्रिपुरा** – राजधानी **अगरताला.** अक्षांश २३ अं ५२ क उत्तर, रेखांश ९१ अं १६ क. पूर्व, लग्न सिंह २१ अं ५५ क., दशम वृषभ २० अं ३० क

१६ **महाराष्ट्र** – ह्याच दिवशीं संयुक्त गुजरात व महाराष्ट्र हा प्रदेश अस्तित्वात आला परंतु पुढें तारीख १ मे, १९६० ह्या दिवशीं हीं दोन्ही राज्यें स्वतंत्र करण्यात आलीं महाराष्ट्राची राजधानी **मुंबई** आहे अक्षांश १८ अं ५८ क. उत्तर, रेखांश ७२ अं ५० कला पूर्व, लग्न मकर १९ अं २३ क, दशम वृश्चिक १ अं ९ क.

१७ **गुजरात** – राजधानी **अहमदाबाद.** अक्षांश २३ अं २ क उत्तर, रेखांश ७२ अं ३७ क लग्न मकर १७ अं १५ क., दशम वृश्चिक ० अं ५३ क. ५ स्पष्टग्रह रवि वृषभ १० अं २४ क., चंद्र कर्क ४ अं ३१ क, मंगळ मीन २१ अं ५७ क., बुध मेष २२ अं ४९ क., गुरु मकर ३ अं २७ क, शुक्र मेष २६ अं १७ क, शनि मकर १८ अं. २५ क. (व), हर्शल सिंह १६ अं ५७ क., नेपच्यून ७ अं ४२ क, प्लुटो कन्या ३ अं ३८ क, राहू कन्या २२ अं २० क ह्या वरील कुंडल्यामध्यें ग्रह तेच राहात आहेत परंतु लग्न व दशम ह्यांमध्यें एक दीड अंशाचा फरक आहे तेव्हां ह्यानें काहीं फरक होतो काय किंवा फलादेशामध्यें काहीं भिन्नता आढळते काय, असा प्रश्न ज्योतिर्विद्यार्थ्यांकडून केला जाण्याची शक्यता आहे आम्ल प्रयत्नारांनी

राशिचक्रामधील ३६० अशाचीं निरनिराळीं फलें वर्णन केलेलीं आहेत. त्या आधारें लग्न व दशम स्थानावर आलेल्या अशाचा फलादेश वाचला असता एक अश फरक झाला तरी किती फरक पडतो ह्याची त्याना सहज कल्पना येईल आर्य ग्रंथकार ह्याच्याही पुढें गेलेले आहेत त्यानीं प्रत्येक अर्ध्या अशाच्या फलादेशाचा विचार करण्याकरिता पष्ट्यश चक्र दिलेलें आहे. त्यात प्रत्येक अर्ध्या अशाला विशिष्ट नाव दिलेले आहे त्यावर कोणी मनन केल्यास त्याच्या चर्मचक्षूपुढें त्या नावामध्ये आलेल्या गर्भित फलादेशाची इमारत सहज उभी राहील असे आम्हाला वाटतें उदाहरणार्थ, आपण महाराष्ट्र व गुजरात ह्या दोन राज्याचें लग्न व दशम केंद्रावर असलेलें अश-कलाचें आपलें पष्ट्यश चक्र काय दर्शन घडवीत आहे, तें पाहू या महाराष्ट्र लग्न मकर १९ अ. २३ क हें **विष्णु** किंवा **लक्ष्मी** पष्ट्यशामध्यें आहे तर गुजरातचें लग्न मकर १७ अ. १५ क. आहे हें **आर्द्रा**—पष्ट्यश विभागावर आहे महाराष्ट्राचें दशम वृश्चिक १ अ. ९ क. म्हणजे **पयोधरा** किंवा **सुधा** अशामध्यें आहे, तर गुजरातचें दशम वृश्चिक ० अ. ५३ क **भ्रमण** अशात आहे महाराष्ट्राचें राजधानीचें शहर मुंबई हें उत्पन्नात व श्रीमतींत प्रख्यात आहे लक्ष्मीचें वास्तव्य ज्या व्यापारक्षेत्रात आहे, तो व्यापार व उद्योगधदा फारच मोठ्या प्रमाणात अखिल भारतवर्षामध्यें मुंबई येथें होत आहे, तर **आर्द्रा** अश गुजरातचा असल्यामुळें हा प्रात पेट्रोलरूपी जलानें अत्यन्त समृद्ध होत आहे व दशमावरील भ्रमण अशाप्रमाणें राजधानीचें अस्तित्व भ्रमणमय स्थितीमध्यें आहे ह्याच्या उलट, महाराष्ट्राचा दशमावरील बिंदु **सुधा** किंवा **पयोधरा** अशामध्यें असल्याकारणानें राजधानीचें मुंबई शहर प्रख्यात बंदर असून सर्वांचा समावेश करणारें असे आहे. जागेच्या अभावामुळें अश फलादेश देता येत नाहींत.

१८ **गोवा**—राजधानी **पणजी.** अक्षांश १५ अ ३० क उत्तर, रेखांश ७३ अ ४० क. पूर्व गोव्यावर भारताचा पूर्ण अधिकार प्रस्थापित झाल्याची घोषणा होऊन तेथें सर्वाधिकारसूचक भारतीय ध्वज सकाळीं स्टँ टा ९ वाजून ३० मिनिटांनीं उभारण्यात आला लग्न कुंभ ३ अ २६ क, धन मीन ८ अ, तृतीय मेष १३ अ, चतुर्थ वृषभ १४ अ, पंचम मिथुन ११ अ, षष्ठ कर्क ६ अ, ग्रह रवि धनु २७ अ १ क, चंद्र वृषभ २२ अ १९ क, मंगळ धनु २५ अ ५० क, बुध धनु २७ अ २ क, गुरु कुंभ ७ अ ४४ क, शुक्र धनु १७ अ ३८ क, शनि मकर २८ अ १६ क, हर्शल कन्या ० अ ८ क (व), नेपच्यून वृश्चिक १२ अ ३८ क, राहू सिंह २० अ ४१ क, प्लुटो कन्या १० अ ७ क (व), धनसहम कर्क ८ अ ४४ क

१९ **नाग प्रदेश**—राजधानी **कोहिमा** अक्षांश २५ अ ४१ क उत्तर, रेखांश ९४ अ ९ क पूर्व तारीख १ डिसेंबर, १९६३ रोजीं अस्तित्वात आलें तारीख ३० नोव्हेंबर, १९६३ रोजीं मध्यरात्रीं स्टँ टा १२ वाजून १ मिनिट, लग्न कन्या २१ अ ३९ क., धन तुला १८ अ, तृतीय वृश्चिक २० अ, चतुर्थ धनु २१ अ ३० क, पंचम मकर २२ अ, षष्ठ कुंभ २३ अ, **ग्रह** रवि धनु ७ अ ४९ क ४१ वि, चंद्र मिथुन ३ अ ४६ क, मंगळ धनु २६ अ ३६ क, बुध धनु २१ अ ५४ क., गुरु मेष ९ अ ३५ क (व), शुक्र मकर १ अ २४ क, शनि कुंभ १७ अ ४८ क., हर्शल कन्या ९ अ ५७ क, नेपच्यून वृश्चिक १६ अ १२ क, प्लुटो कन्या १४ अ ७ क., राहू १३ अ १ कला, धनसहम मीन १७ अ ३६ क

२०. **काश्मीर** – राजधानीचें शहर **श्रीनगर.** अक्षांश ३४ अं. ५ क. उत्तर, रेखांश पूर्व ७४ अं. ५० क. अमृतसर (अक्षांश ३१ अं. २७ क. उत्तर, रेखांश ७४ अं. ५५ क. पूर्व. येथें ब्रिटिश व राजा गुलाबसिंग ह्यांच्यामध्यें तारीख १६ मार्च, १८४६ रोजीं तह होऊन हें राज्य निर्माण झालेलें आहे. भारत व पाकिस्तान अशीं दोन राष्ट्रें निर्माण झाल्यानंतर भारतामधील सर्व संस्थानिक स्वतंत्र झाले होते. तारीख २२ ऑक्टोबर, १९४७ ह्या दिवशीं पाकिस्तानचें सैन्य व त्या प्रदेशामधील इतर टोळीवाल्या लोकांची धाड श्रीनगरवर पडली व पुढें तारीख २६ रोजीं काश्मीरच्या महाराजानें भारताबरोबर सामीलनामा करण्याच्या करारावर सही केली व त्यानंतर त्या वेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड माऊंटबॅटनसाहेब ह्यांनीं तारीख २७ ऑक्टोबर रोजीं हें संस्थान भारतामध्यें सामील केलें. तारीख १६ मार्च, १८४६ च्या माध्यान्ह काळची अर्थात् दुपारचे १२ वाजून ३३ मिनिटें ह्या स्थानिक वेळेची कुंडली घेतली असतां ती वरील स्थितीचा चांगला बोध करते. ह्या वेळीं पूर्वक्षितिजावर कर्क लग्नाचे १५ अं. २६ क. उदय पावत आहे व माध्यान्ह केंद्रावर मेष राशीचा २ रा अंश आहे. रवि मीन २५ अं. २० क., चंद्र वृश्चिक २ अं. २८ क., मंगळ वृषभ २३ अं. ५८ क., बुध मेष ५ अं. १४ क., गुरु वृषभ १० अं. ११ क., शुक्र मीन ५ अं. ७ क., शनि कुंभ २५ अं. १३ क., हर्शल मेष ९ अं. २४ क., नेपच्यून कुंभ २६ अं. ४२ क., प्लुटो मेष २३ अं. ४१ क., राहू वृश्चिक ९ अं. ३७ क., व लक्ष्मीसहम कुंभ २२ अं. ३४ क. तारीख २७ ऑक्टोबर, १९४७ रोजीं जो सामीलनामा मान्य करण्यांत आला त्या दिवसाची दिल्ली येथील

स्टॅ. टाईम बारा वाजण्याची कुंडली मांडली असतां हा दिवस किती अशुभ आहे व भारतवर्षाला काश्मीरमुळें केवढा त्रास व कष्ट सोसावे लागत आहेत ह्याचा पूर्ण बोध वरील कुंडली करीत आहे. प्रत्येक कार्याला शुभ मुहूर्त कां पाहावा, ह्याचें हें प्रत्यक्ष उदाहरणच आहे.

२१. **कोचीन**—उत्तर, रेखांश ७६ अं. १५ क. पूर्व, तारीख १ ऑगस्ट १९३६ ह्या दिवसापासून कोचीन हें एक महत्त्वाचें मोठें बंदर आहे, असें सेंट्रल गव्हर्नमेंटनें जाहीर केलें. ह्या तारखेचा आरंभ मध्यरात्रीपासून होतो. त्या काळचें लग्नदशम व ग्रहस्थिति खालील-प्रमाणें आहे. अक्षांश ९ अं. ५८ क. उत्तर, रेखांश ७६ अं. १५ क. पूर्व, लग्न वृषभ ९ अं. ४८ क., दशम कुंभ ० अं. ४५ क., रवि सिंह ८ अं. २० क., चंद्र मकर ८ अं. १७ क., मंगळ कर्क २३ अं. ५० क., बुध कर्क १६. अं. ३८ क., गुरु धनु १४ अं. ४७ क., शुक्र कर्क १७ अं. १७ क., शनि मीन २१ अं. ५४ क., हर्शल ९ अं. ३० क., वृषभ नेपच्यून कन्या १५ अं. ७ क., प्लुटो कर्क २७ अं. १७ क., राहू १ अं. ४० क.

२२. **पाकिस्तान**—ता. १५ ऑगस्ट १९४७. **कराची** अक्षांश २४ अं. ५१ क., रेखांश ६७ अं. ४ क. पूर्व., लग्न वृषभ १७ अं ३३ क., धन मिथुन १६ अं., तृतीय कर्क १० अं., दशम कुंभ ४ अं. ३८ क., एकादश मीन ४ अं., द्वादश मेष ६ अं. ह्या कुंडलीमध्यें पूर्वी स्वतंत्र भारताच्या कुंडलीमध्यें जे स्पष्टग्रह दिलेले आहेत ते घ्यावेत. तारीख १४ ऑगस्ट, १९४७ रोजीं रात्रीं दोन्ही राष्ट्रें स्टॅ. टा. १२ वा. १ मिनिटानें अस्तित्वांत आलीं. परंतु स्थानिक वेळ भिन्न झाल्या-कारणानें सर्व भावावर येणारे राशि अंश निराळे आलेले आढळतील व त्याचमुळें फलादेशामध्येंही पुष्कळच भिन्नता पाहाण्यास मिळत आहे.

प्रकरण १५ वें

# कुंडल्या कशा मांडाव्यात ?

आम्हीं आमच्या 'जातक मार्गोपदेशिका, खड १ ला' ह्या पुस्तकामध्यें इच्छित स्थळाच्या व काळाच्या सायन भावचलित कुडल्या कशा माडाव्यात तें दिलें असून त्याला लागणाऱ्या भावसाधनादिकासबंधानें भरतखडामधील ७ ते ३२ अक्षाशापर्यंतचीं सुटसुटीत कोष्टकेंही दिलेलीं आहेत व त्याचा उपयोग कसा करावा ह्याबद्दल सर्व माहिती दिलेली आहे. वाचकानीं त्याचा अभ्यास केला असता त्याना स्पष्टग्रहसहित व स्पष्टभावासहित इच्छित स्थळाची कुंडली माडण्यास मुळींच अडचण पडणार नाहीं. येथें प्रकरण २ मध्यें सागितल्याप्रमाणें राष्ट्रीय भविष्य वर्तविण्यास निरनिराळ्या ठिकाणच्या कुंडल्या कशा तयार करून घ्याव्यात, ह्याची थोडक्यात माहिती देण्याचें योजिलें आहे. निरनिराळ्या अक्षाशावरील भावचलित कुडल्या माडण्याकरिता आग्लभाषेंत प्रसिद्ध झालेलें रॅफेलचें ० अश ते ५३ अंश अक्षाशाचें, भावसाधनाचीं कोष्टकें दिलेलें पुस्तक विकत घ्यावें. त्याना इग्रजी आकडे व राशींचीं चिन्हें ओळखता येतात ते हें पुस्तक सहज उपयोगात आणू शकतील ह्या कोष्टकात प्रथम सपातिक विषुवकाल (ह्यालाच नाक्षत्रकाळ असें म्हणतात) दिलेला आहे. नतर दशम केंद्रावर उदित असणारी राशि व अंश, त्यानतर द्वादश, व नतर एकादशस्थानावरील उदित राशी व अश येतो. पुढें लग्नावर उदित असणारी राशि अश कला, त्यानतर धनस्थानावरीळ व शेवटीं तृतीय स्थानावरचे राशि अश दर्शविलेले असतात. प्रत्येक स्पष्ट आलेल्या भावामध्यें १८० अंश

निरयिर्ति असता त्याचा समोरचा भाव स्पष्ट होतो ह्याप्रमाणें बारा भाव स्पष्ट मिळतात.

प्रथम ज्या वर्षामधील कुंडली मांडावयाची असेल त्या वर्षाचें रॅफेलचें पंचांग घ्यावें. ह्या पचांगामध्यें दिलेले ग्रह ग्रीनिच येथील दुपारचे बारा वाजण्याचे स्पष्ट दिलेले असतात व तीच ग्रहाची स्पष्ट स्थिति भारतवर्षामध्यें सध्याकाळचे स्टँडर्ड टाईम पांच वाजून तीस मिनिटांची असते प्रथम ज्या वेळेची कुंडली मांडावयाची असेल तो काळ ग्रीनिच टाईममध्यें फिरवून घ्यावा नतर ज्या महिन्याच्या ज्या तारखेची कुंडली मांडावयाची असेल तो महिना व ती तारीख रॅफेल पचांगात पाहावी व इष्ट तारखेच्या समोर जो सांपातिककाळ – नाक्षत्रकाळ दिलेला आहे तो घ्यावा व ग्रीनिच टाइममध्यें तयार करून घेतलेला इष्टकाळ हा ग्रीनिच टाईम दुपारच्या बारानंतर जेवढे तास असेल तेवढे तास व मिनिटें मिळवावीत आणि नतर प्रत्येक तासाला १० सेकद ह्याप्रमाणें आलेला सस्कार मिळवावा परंतु जर इष्टकाळ ग्रीनिच बारापूर्वीचा असेल तर तो बारापूर्वी जेवढे तास मिनिटें असेल तेवढा वजा करावा व पूर्वीप्रमाणें तासाला दहा सेकदप्रमाणें येणारा सस्कार वजा करावा ह्याप्रमाणें तास-मिनिटें-सेकदमध्ये आलेला नाक्षत्रकाळ हा लडन येथील दशमाचा याम्योत्तर लवनकाळ येतो लडनच्या भावसाधन कोष्टकावरून भाव घेतले असता लडन येथील द्वादश भाव मिळतील व त्यात रॅफेलच्या त्या वर्षाच्या पचांगावरून इष्टकाळाच्या गणितानें तयार केलेले ग्रह भरले असता लडन येथील सायन भावचलित कुंडली तयार होईल आतां आपणास निरनिराळ्या स्थळाच्या कुंडल्या कशा येतात हें पाहाणें असल्यास इष्ट स्थळ जितक्या रेखांशावर असेल त्या रेखांशाला

४ नें गुणावें व तास, मिनिटें व सेकदामध्ये जें उत्तर येईल, तें वरील लडन येथील जो दशमाचा याम्योत्तर लग्नकाळ आलेला असेल त्यात इष्टस्थळ पूर्वेस असता मिळविणें व ही जी नाक्षत्रकाळाची बेरीज येईल, ती इष्टस्थळाच्या अक्षांशाच्या भावसाधन कोष्टकातून पाहून ज्या नाक्षत्रकाळ जवळ आपला नाक्षत्रकाळ मिळत असेल ( अर्थात् थोड्या फरकानें ) त्याच्या समोरचे स्पष्ट सहाभाव घ्यावे व त्यात १८० अंश मिळवून दुसरे सहाभाव तयार करून घ्यावे आणि त्यात पूर्वीचे जे लडनचे–ग्रीनिचचे स्पष्ट ग्रह तयार केलेले आहेत तेच मांडावे, म्हणजे इष्टस्थळाची सायनभावचलित स्पष्टग्रहासहितची कुंडली तयार मिळेल जर जन्मस्थळ पश्चिम रेखांश वरील असेल तर पूर्वीप्रमाणें रेखांश संस्कार तासात्मक करून नंतर पूर्वीच्या लडन येथील आलेल्या नाक्षत्रकाळामधून वजा करावे व भावसाधन कोष्टकावरें इष्ट अक्षांशावरील भाव घ्यावा आणि त्यात वरील ग्रह मांडावे ह्याप्रमाणें आपण एकदा इष्ट काळावरून ग्रीनिच येथील कुंडली तयार करून घेतली म्हणजे इतर अक्षांशावरील कुंडल्या अल्पश्रमात सहज तयार करता येतात

आता आपण एक कुंडली उदाहरणार्थ घेऊ या तारीख १९ फेब्रुवारी, १९६१ ह्या दिवशीं सकाळीं इं स्टँ टा ५ वाजून ३० मिनिटांनीं गुरु–शनि युतियोग मकर राशीच्या २५ अंश १२ कला व १ विकलेमध्यें झालेला आहे वरील स्टँ टाईम मधून ५ कलाक ३० मिनिटें वजा करणें कारण भारतवर्षाचा स्टँडर्ड टाईम पूर्व रेखांश ८२ अंश ३० कलेवर आहे वजा घेल्यावर तारीख १८ फेब्रुवारी १९६१ ह्या दिवशीं ग्रीनिच येथें रात्रीं बारा वाजता हा युतियोग होत आहे असं उत्तर येतें

तारीख १८ फेब्रुवारी १९६१ चा सांपातिक काळ ( नाक्षत्रकाळ ) २१ ता. ५२ मि. ५० से. आहे. + १२ तास ( माध्यान्हानंतर म्हणून अधिक ) + २ मिनिटें ( प्रत्येक तासाला १० सेकंदांप्रमाणें संस्कार. १२० से. = २ मिनिटें ) = ३३ ता. ५४ मि. ५० से. ( नाक्षत्रकाळ केव्हांही २४ तासांपेक्षां जास्त असत नाहीं. ) म्हणून २४ तास वजा केल्यावर उत्तर ९ ता. ५४ मि. ५० से. येतें. हा लंडन येथील दशमाचा याम्योत्तर लंघनकाळ आला व लंडन येथील भावसाधन कोष्टक अक्षांश ५१ अं. ३२ क. उत्तर, ह्यामध्यें पाहातां आपणास स्पष्ट सहा भाव मिळतात. आपला नाक्षत्रकाळ ९ ता. ५३ मि. १ से. ह्याच्या समोर खालील भाव दिलेले आहेत. लग्न वृश्चिक १० अं. ५१ कला, द्वितीय धनु ९ अंश, तृतीय मकर १७ अंश, दशम सिंह २६ अंश, एकादश कन्या २८ अं., द्वादश तुळा २३ अं. आपणास सूक्ष्म लग्न व इतर भाव करणें असतां दोन नाक्षत्रकाळांमधील फरक व दोन भावां-मधील अंतर घेऊन त्रैराशिकानें स्पष्ट अंश, कला, विकला येतील त्या घ्याव्या. ह्या कुंडलीमध्यें तारीख १८ फेब्रुवारी, १९६१ च्या ग्रहांमध्यें १२ तासांची गति मिळविली असतां स्पष्ट ग्रह येतील व ते ह्या कुंडलीमध्यें मांडल्यावर ह्या गुरु-शनि युति-योगाची लंडन येथील भावचलित कुंडली तयार होईल.

आतां आपणांस पृथ्वीवरील निरनिराळ्या ठिकाणांवर लग्न केंद्रीं व दशमावर कोणते अंश उदय पावत आहेत व त्या त्या स्थळाची कुंडली कशी येते हें पाहावयाचें आहे. त्याकरितां प्रथम इच्छित स्थळाचे रेखांश व अक्षांश काय आहेत ते निश्चित करावे. उदाहरणार्थ, आपणास दिल्ली येथील ही कुंडली मांडावयाची आहे. दिल्ली रेखांश ७७ अं. १२ कला

पूर्व=५ ता. ८ मि. ४८ से. अक्षांश २८ अ. ४२ क. उत्तर. वरील लंडन येथील आलेल्या दशमाच्या नाक्षत्रकाळामध्ये ९ तास ५४ मिनिटें ५० सेकंद; ह्यांत दिल्लीचा तासात्मक रेखांश संस्कार ५ तास ८ मिनिटें ४८ सेकंद मिळविल्यावर बेरीज १५ तास ३ मिनिटें ३८ सेकंद असें उत्तर येतें व दिल्लीच्या अक्षांशाच्या कोष्टकामध्यें हा नाक्षत्रकाळ पाहाता याच्या जवळचा नाक्षत्रकाळ १५ तास २ मिनिटें ८ सेकंद मिळतो. त्यापुढें दशम वृश्चिक १८ अ., एकादश धनु १३ अंश, द्वादश मकर ६ अ., लग्न कुंभ १ अंश ५८ कला, द्वितीय मीन ११ अंश, तृतीय मेष १८ अंश, मिळत आहेत. पूर्वी सांगितल्याप्रमाणें ह्या वेळेचे स्पष्ट ग्रह रवि मीन ० अंश, ६ क., ५१ वि., चंद्र मेष १९ अ. ३२ क., मंगळ कर्क ० अ. ५८ क., बुध मीन ६ अ. ११ क., गुरु शनि २५ अ. १२ क १ वि., शुक्र मीन १५ अ. ९ क., हर्शल सिंह २३ अ. २४ क. (व.), नेपच्यून वृश्चिक ११ अ. १४ क. (व.), प्लुटो कन्या ७ अ, राहू कन्या ६ अंश, ४२ कला., ह्या कुंडलीमध्यें मांडले असता दिल्ली येथील भावचलित कुंडली तयार होईल.

आता आपण युनायटेड स्टेट्स् ऑफ अमेरिकाचें राजधानीचें शहर वॉशिंग्टन डी सी येथें ह्या वेळेचे भाव कसे येतात तें पाहू या. ह्या शहराचे रेखांश ७७ अ. ४ कला. पश्चिम आहेत. म्हणजे ते ५ तास ८ मिनिटें १६ सेकंद पश्चिम आहेत. म्हणून इतके तास, मिनिटें व सेकंद ग्रीनिचच्या दशमाच्या नाक्षत्रकाळामधून वजा करावे लागतील. (९ ता. ५४ मि. ५० से. उणें ५ ता. ८ मि. १६ से.)=४ ता. ४६ मि. ३४ से. हा दशमाचा नाक्षत्रकाळ आला व तो ह्या शहराचे अक्षांश ३८ अ. ५५ क. उत्तर ह्या अक्षांशाच्या भावसाधन कोष्टकांत पाहिल्यास व ह्याच्या जवळचा

नाक्षत्रकाळावरून भाव घेतल्यास लग्न कन्या ६ अं ३५ क, दशम मिथुन ३ अंश, द्वितीय तुला १ अंश, तृतीय तुला २९ अं, एकादश कर्क ७ अं, द्वादश सिंह ९ अं ह्याप्रमाणें स्पष्ट भाव येतात पूर्वीचे स्पष्ट ग्रह केलेले आहेत तेच ह्या कुंडलीमध्यें मांडले असता वॉशिंग्टन डी सी येथील गुरुशनि युति-योगाची भावचलित कुंडली तयार होईल

वरील विवेचनावरून वाचकांच्या हें सहज ध्यानात येईल कीं, पृथ्वीवरील निरनिराळ्या स्थळप्रमाणें कुंडलीच्या बारा भावारंभीं निरनिराळ्या राशींचे अंश येतात, परंतु ग्रह सर्व ठिकाणाचे एकत्र असतात तसेंच, त्याच्यामध्ये होणाऱ्या दृष्टियोगामध्ये फरक झालेला आढळत नाहीं परंतु ते निरनिराळ्या स्थळीं भावावर उदय पावणाऱ्या राशीप्रमाणें त्यांना निरनिराळीं स्थानें व भावाधिपत्य प्राप्त होतें तसेंच, निरनिराळ्या भावामध्ये आल्याकारणानें भावानुरोधानें त्यांच्या भावफलामध्यें व दृष्टियोगाच्या फलादेशामध्यही पुष्कळ फरक झालेला पाहाण्यास मिळतो



# निरनिराळ्या प्रदेशांच्या कुंडल्या मांडण्याकरितां लागणाऱ्या कांहीं शहरांचे अक्षांश व रेखांश

रेखांश हे अंशामध्ये व तास-मिनिटें-सेकंदात दिलेले आहेत. सर्व शहरांचे अक्षांश उत्तर आहेत ज्यांच्या पुढें + व – असें चिन्ह दर्शविलेलें आहे, त्यात + पूर्व व – पश्चिम रेखांश समजावेत.

| शहरें | अक्षांश | रेखांश | ता. मि. से. |
|---|---|---|---|
| अगरताळा | २३°-५२′ | ९१°-१६′ | ६-५-४+ |
| पोर्ट ब्लेअर (अन्दमान) | ११-४० | ९२ ४६ | ६-११-४+ |
| अलिगड | २७-५४ | ७८-०५ | ५-१२-२०+ |
| इम्फल | २४ ५० | ९३-५८ | ६-१५ ५२+ |
| एडन | १२-४८ | ४५-०० | ३-०-०+ |
| कराची | २४-५१ | ६७ ०० | ४ ४८ ०+ |
| कलकत्ता | २२ ३६ | ८८-१८ | ५-५४-१२+ |
| काबुल | ३४-४१ | ६९-१२ | ४-३६ ४८+ |
| खटमडू ( नेपाळ ) | २७ ४२ | ८५-१७ | ५ ४१-८+ |
| ग्रीनिच ऑब्झरव्हेटरी | ५१-२९ | ०-० ० | ०-० ० |
| चण्डीगड | ३०-४० | ७६-५२ | ५ ७-२८+ |
| जयपूर | २६-५५ | ७५-५२ | ५-३-२८+ |
| जेरुसलेम | ३१-४७ | ३५-१४ | २-२०-५६+ |

| शहरें | अक्षांश | रेखांश | ता. मि. से. |
|---|---|---|---|
| तेहराण ( इराण ) | ३५-४५ | ५१-१५ | ३ २५-०+ |
| टोकिओ ( जपान ) | ३५-३९ | १३९-३२ | ९ १८ ८+ |
| डाका | २३ ४३ | ९०-२५ | ६ १ ४०+ |
| दिल्ली | २८-३८ | ७७-१३ | ५ ८ ५२+ |
| त्रिवेन्द्रम | ०८-३० | ७६-५७ | ५ ७ ४८+ |
| न्यू यॉर्क ( अमेरिका ) | ४० ४५ | ७४ ०० | ४ ५६-०- |
| पटणा | २५-३७ | ८५ १० | ५ ४०-४०+ |
| पॅरीस | ४८-५० | ०२ २० | ०९-२०- |
| पुनाक ( भुतान ) | २७ ३५ | ८९ ५० | ५ ५९-२०+ |
| पेकिंग ( चायना ) | ४० ०० | ११६-३० | ७ ४५-०+ |
| बेंगलोर | १२ ५८ | ७७-३५ | ५ १० २०+ |
| बॅन्कॉक | १४ ० | १००-३० | ६ १८-०+ |
| भुवनेश्वर ( ओरिसा ) | २०-२८ | ८५ ५४ | ५ ४३-३६+ |
| भोपाळ | २३-१६ | ७७ २३ | ५ ९ ३२+ |
| मद्रास | १३-६ | ८०-१५ | ५ २१-०+ |
| मुंबई | १८ ५४ | ७२ ५० | ४ २१-२०+ |
| रंगून | १० ४५ | ९६ ० | ६ २४ ०+ |
| रावळपिन्डी | ३३ ३७ | ७३ ४ | ४ ५२ १६+ |
| लखनौ | २६ ५१ | ८० ५५ | ५-२३-४०+ |
| वॉशिंगटन डी सी | ३८ ५५ | ७७ ४ | ५ ८ १६- |
| शेलाग | २५ ३४ | ९१ ५४ | ६ ७-३६+ |